# प्रस्तावना.

व्याकरण शिकण्यास प्रारंभ करणाऱ्या विद्यार्थ्यांचे उपयोगाकरितां व्याकरण प्रवेशिका हें पुस्तक आम्हीं प्रथम सन १९२४ चे आगष्ट महिन्यांत प्रसिद्ध केलें. तें १९२५ फेब्रुवारी महिन्यांत मध्यप्रांतांत क्रमिक पुस्तक म्हणून मंजूर होऊन आतांपर्यंत त्याच्या दोन आवृत्ति खपून जाऊन तिसरी आवृत्ति काढावी लागत आहे; यावरून तें पुस्तक शिक्षकवर्ग आणि विद्यार्थी यांस प्रिय झालें आहे असें मानण्यास हरकत नाहीं. मुंबई इलाखा व निजामहैद्राबाद या भागांतही हें पुस्तक लवकरच मंजूर होईल अशी आशा आहे.

ईश्वरकृपेनें व्याकरण-प्रवेशिका. द्वितीय पुस्तक विद्यार्थ्यांचे हातीं देण्याचा सुयोग आज प्राप्त झाला आहे. 'बालबोध व्याकरण, पुस्तक दुसरें यांत असलेला सर्व भाग या पुस्तकांत आला आहे. हें पुस्तकसुद्धां तयार करते-वेळीं आम्ही प्रत्येक धडा प्रथम निरनिराळ्या विद्यार्थ्यांस शिकवून पाहून ज्या पद्धतीचे योगानें विद्यार्थ्यांस व्याकरणासंबंधानें आवड उत्पन्न होऊन ते स्वतःच व्याकरणाविषयक नियम शोधून काढण्यास किंवा एखादा नियम कितपत खरा आहे तें ठरविण्यास समर्थ होतील त्या पद्धतीचाच यांतही अवलंब केला आहे. विद्यार्थ्यांनी या पुस्तकाचा उपयोग केल्यास त्यांना व्याकरणांत गोडी तर वाटेलच शिवाय त्यांची निरीक्षणशक्ति व उदाहरणांवरून नियम काढण्याची पात्रता ही विशेषेंकरून वाढतील अशी आम्हांस उमेद आहे. आमचें हें म्हणणें कितपत खरें आहे हें प्रत्यक्ष अनुभवानें शिक्षकवर्ग ठरवील.

व्याकरण-प्रवेशिकेच्या प्रथम पुस्तकामध्यें शब्दांच्या आठ जाती, त्यांचें वर्गीकरण व विकरण, आणि कांहीं शब्दांचा वाक्यांतील इतर शब्दांशीं संबंध इतक्या गोष्टी आल्या. या द्वितिय पुस्तकाची मांडणी थोडक्यांत सांगावयाची म्हणजे खालीलप्रमाणें आहे. प्रथम ''भाषा आणि व्याकरण ' या प्रकरणामध्यें व्याकरण म्हणजे काय त्याची कल्पना देऊन नंतर वर्णविचार, शब्दविचार, वाक्यविचार आणि शब्दव्युत्पत्ति हे भाग अनुक्रमें घातले आहेत, शब्दांच्या आठ जातींचें विवरण करतांना प्रत्येक जातीची प्रथम व्याख्या, नंतर वर्गीकरण, नंतर विकरण व नंतर त्या जातीच्या शब्दांचा वाक्यांत उपयोग व त्यांचें

व्याकरण करणें याप्रमाणें नाम सर्वनाम वगैरे निरनिराळ्या जातींच्या शब्दांची व्यवस्था लाविली आहे. केवळ अनुक्रमणिकेकडे एकदां नजर फेंकल्यानें ही गोष्ट सहज ध्यानीं येणारी आहे. नामांच्या जाती, लिंग, वचन व विभक्ति ही अगोदर सांगून कारकविचार तेवढा पुस्तकाच्या अगदीं शेवटीं ठेवण्यामध्यें विद्यार्थ्यांची कोणत्याही प्रकारची सोय नसून त्यांना सबंध पुस्तक संपल्याखेरीज नामांचें व्याकरण करतां येत नाहीं ही गैरसोय मात्र सोसावी लागते. या नवीन पुस्तकामध्यें शिक्षणशास्त्राचे नियमांस अनुसरून त्या त्या जातींच्या शब्दांचा वाक्यांतील इतर शब्दांशीं संबंध त्या त्या वेळींच सांगितला असल्यामुळें वर दर्शविलेली गैरसोय दूर झाली आहे.

वाक्यविचारामध्यें विषयाची मांडणी इतर पुस्तकांहून या पुस्तकांत निराळ्या रीतीनें केली असल्यामुळें तीबद्दल दोन शब्द लिहिले पाहिजेत. वाक्यपृथक्करण हें दोन प्रकारें होऊं शकतें. व्याकरणशास्त्रदृष्ट्या वाक्याचें पृथक्करण करावयाचें म्हटलें म्हणजे वाक्याचे निरनिराळे भाग म्हणजे कर्ता, कर्म, पूरक, क्रियापद आणि यांपैकीं प्रत्येकावर अवलंबून असलेले शब्द याप्रमाणें होईल. कर्ता, कर्म, वगैरे संज्ञा व्याकरणशास्त्रांतील आहेत. कोणत्याही वाक्याचा अर्थ करतांना त्यांतील क्रियापद कोणतें, कर्ता कोणता, कर्म कोणतें, पूरक शब्द कोणता, कर्तृविशेषणें कोणतीं, कर्मविशेषणें कोणतीं, पूरकविशेषणें व क्रियाविशेषणें कोणतीं हें समजलें म्हणजे त्या वाक्याचा अर्थ समजण्यास फार मदत होते त्याचप्रमाणें वाक्यविस्तार व वाक्यसंकोच करतांनासुद्धां या गोष्टीच्या ज्ञानाची फार आवश्यकता असते. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे वाक्याचा अर्थ समजणें व वाक्यरचना या दोन्ही गोष्टींकरितां कर्ता, कर्म वगैरे वाक्याचे निरनिराळे भाग ओळखणें अत्यंत महत्वाचें असतें. कर्ता, कर्म, वगैरे संज्ञा व्याकरणशास्त्रांतील असल्यामुळें व्याकरणशास्त्राचे ज्ञानानें वाक्याचे हे निरनिराळे भाग ओळखतां येणारे असल्यामुळें वाक्याचे याप्रमाणें निरनिराळे भाग सांगणें हें वाक्याचें व्याकरणदृष्ट्या पृथक्करण करणेंच आहे

न्यायशास्त्रदृष्ट्याही वाक्यपृथक्करण होऊं शकतें. प्रत्येक विधानार्थक (assertive) वाक्यामध्यें कोणत्या तरी वस्तुबद्दल अथवा व्यक्तिबद्दल विधान केलेलें असतें. ज्या वस्तुबद्दल अथवा व्यक्तीबद्दल विधान केलेलें असतें ती व्यक्ति किंवा वस्तु दर्शविणारे शब्द हा वाक्याचा एक भाग, व जें कांहीं विधान केलेलें

असते तें व्यक्त करणारे शब्द हा त्या वाक्याचा दुसरा भाग, पहिल्या भागास उद्देश्य असें नांव असून दुसऱ्या भागास विधेय असें म्हणतात. आतां या संज्ञा व्याकरण-शास्त्रांतील नसून त्या न्यायशास्त्रांतील आहेत. केवळ व्याकरणशास्त्राच्या ज्ञानानेंच एखाद्या वाक्यांतलि उद्देश्य व विधेय शोधून काढणें शक्य नसतें. "रामानें रावणाला मारिलें." या वाक्याचे कर्ता, कर्म, व क्रियापद या भागांत व्याकरण-शास्त्राचे ज्ञानानें पृथक्करण करतां यईल; परंतु या वाक्यांत विधान कोणाबद्दल केलें आहे तें रामाबद्दल आहे, कीं रावणाबद्दल आहे, कीं मारणें या क्रियेबद्दल आहे हें केवळ व्याकरणशास्त्राचे ज्ञानानेंच सांगतां यावयाचें नाहीं. व्याकरणशास्त्राचे ज्ञानाव्यतिरिक्त इतर गोष्टींचे साहाय्यानें विधान कोणाबद्दल केलें आहे हें आपण ठरवितों.

वरील विवेचनावरून ही गोष्ट स्पष्टपणें दिसून येईल कीं, वाक्याचें उद्देश्य व विधेय या भागांत पृथक्करण करणें हें काम व्याकरणशास्त्राचें नसून तें न्यायशास्त्राचें (Logic) आहे. फार तर इतकेंच म्हणतां येईल कीं, हा भाग व्याकरणशास्त्र व न्यायशास्त्र यांचे सरहद्दीवरील प्रांत असुन तो वास्तविक न्यायशास्त्राचे कक्षेंतील आहे. या पृथक्करणानें निदान मराठी भाषेच्या व्याकरणास कोणत्याहि प्रकारची मदत होत नसल्यामुळें तें मराठी व्याकरणांतुन अजीबात काढून टाकलें तरी चाल ण्यासारखें आहे. परंतु उद्देश्य व विधेय या संज्ञा रा. रा. जोशी यांचे व्याकरणामुळें सध्यां बऱ्याच रूढ झाल्या असल्यामुळें त्यांना निरुपद्रवी करून ठेवून व्याकरणांत स्थान दिल्यास त्यापासुन तोटाही नाहीं. याच कारणाकरितां वाक्यविचारामध्यें आधीं व्याकरणशास्त्रदृष्ट्या वाक्यांचें पृथक्करण करून नंतर शेवटीं एका धड्यामध्यें उद्देश्य व विधेय यांमध्यें वाक्याचें पृथक्करण करून दाखविलें आहे हा धडा प्रौढ विद्यार्थ्यांनाच शिकवावा.

व्युत्पत्तिविचारामध्यें पुष्कळ नियम दिल्यानें विषयास क्लिष्टपणा येतो असा आमचा अनुभव असल्यामुळें स्वरूप व अर्थ यांचे बाबतींत असलेल्या साम्याचें निरीक्षण करून त्यावरून व्युत्पत्ति शिकविण्याचा प्रयत्न केला आहे. तो कितपत यशस्वी झाला आहे तें ठरविणें शिक्षकवर्गाकडेच आहे.

आम्हांला कै. दामले यांचीच व्याकरणविषयक मतें प्रामुख्यानें मान्य असल्या-मुळें विशेषेंकरून त्यांच्याच व्याख्या व मतें विद्यार्थ्यांस सुलभ होतील अशा रीतीनां शिक्षणशास्त्राचे नियमास अनुसरून या पुस्तकांत मांडली आहेत. दामले यांनी

शास्त्रीय व्याकरण सन १९११ साली प्रथम प्रसिद्ध झालें. त्याला कै. विष्णु मोरेश्वर महाजनी, रा. रा. राजवाडे इत्यादि विद्वानांची मान्यता मिळा-ल्यावरही त्याची मतें व व्याकरण प्रचारांत आणण्यास सुरवात १५ वर्षांनी व्हावी यापेक्षां आमच्या गतानुगतिकत्वाचें व विचाराशिथिलतेचें दुसरें वाईट उदाहरण कोणतें असूं शकेल ? व्याकरण-प्रवेशिका प्रथम व द्वितीय पुस्तक हीं पुस्तकें लिहून आम्ही दामले यांच्या ऋणांतून अंशतः तरी मुक्त झालों असें समजतों.

हें पुस्तक लिहिण्यामध्यें शास्त्रीय व्याकरणाखेरीज रा. भि. जोशी यांचीं बालबोध व प्रौढबोध व्याकरणें, खेर यांचें व्याकरण, गोडबोले यांचें नवीन व्याकरण व चिपळूणकरांचे व्याकरणावरील निबंध या पुस्तकांचें आम्हाला फार सहाय्य मिळालें आहे; म्हणून त्या त्या ग्रंथकर्त्यांचे आम्ही फार ऋणी आहों.

नागपूर,
ता. १५ मार्च १९२६

वि. गो. भावे.
स. ना. कुळकर्णी.

# अनुक्रमणिका.

### नामांचे संबंध.



## खंड चवथें – सर्वनामविचार.



## खंड पांचवें – विशेषणविचार.



## खंड सहावें – क्रियापदविचार.

### प्रकरण पाहिलें सिद्ध धातु.



### प्रकरण दुसरें—साधित धातु.

### प्रकरण तिसरें—संयुक्तधातु.



### प्रकरण चवथें—प्रयोगविचार.



## खंड सातवें—अव्ययविचार.



## खंड आठवें—वाक्यविचार.



## खंड नववें—व्युत्पत्तिविचार.

### प्रकारण पहिलें—प्रत्ययघटित, उपसर्गघटित व अभ्यस्त शब्द.

## प्रकरण दुसरें—समासविचार.



## परिशिष्टें.

वाक्यें चार प्रकारचीं असतात:— ( १ ) विधानार्थक, ( २ ) प्रश्नार्थक, ( ३ ) आज्ञार्थक, ( ४ ) इच्छाप्रदर्शक.

( १ ) ज्या वाक्यांचे योगानें कांहीं माहिती आपण दुसऱ्याला देतों त्या वाक्यांना विधानार्थक वाक्यें असें म्हणतात; जसें:-पृथ्वी वाटोळी आहे. आगगाडीचें एंजीन वाफेनें चालतें. लंडन इंग्लंडची राजधानी आहे.

( २ ) ज्या वाक्याचे योगानें कांहीं माहिती आपण दुसऱ्याला विचारतों त्या वाक्यांना प्रश्नार्थक वाक्यें असें म्हणतात; जसें:—आज सुटी आहे काय? मुंबई येथून किती लांब आहे? तुझें नांव काय?

( ३ ) ज्या वाक्यांचे योगानें आपण दुसऱ्याला कांहीं आज्ञा करतों त्या वाक्यांना आज्ञार्थक वाक्यें असें म्हणतात; जसें:—हा आंबा खा. आतां खेळूं नका. तें पुस्तक इकडे आण.

( ४ ) ज्या वाक्यांचे योगानें मनांतली कोणती तरी इच्छा आपण प्रगट करतों त्या वाक्यांना इच्छाप्रदर्शक वाक्यें असें म्हणतात; जसें:—देव तुझें कल्याण करो. हा मुलगा सद्गुणी होवो. ही बातमी खरी ठरो.

**भाषा** या शब्दाचा मूळ अर्थ बोलणें असा आहे हें आपण वर पाहिलेंच आहे. माहिती सांगणें, माहिती विचारणें, आज्ञा करणें किंवा मनांतली एखादी इच्छा प्रगट करणें यांपैकीं एखादी गोष्ट आपणांस करावयाची झाल्यास आपण ती बोलून करतों; मुका मनुष्य तीच गोष्ट खुणांचे योगानें करूं शकेल. खुणा ही मुक्या मनुष्याची एक प्रकारची भाषाच होय. परंतु व्याकरणामध्यें आपल्याला खुणांनीं बनविलेल्या भाषेचा विचार करावयाचा नसून शब्दांनीं बनलेल्या भाषेचा विचार करावयाचा असतो.

शब्दांनीं बनलेली भाषा **तोंडी व लेखी** अशी दोन प्रकारची असते. जवळच्या मनुष्याला कांहीं सांगावयाचें झाल्यास आपण तें तोंडानें शब्द उच्चारून सांगतों; परंतु तो मनुष्य जर लांब दुसऱ्या एखाद्या गांवीं रहात असेल तर त्याला हातानें आपण शब्द लिहून तें कळवितों.

भाषा पुष्कळ असतात; निरनिराळ्या देशांतील लोक निरनिराळ्या भाषा बोलतात. आपण मराठी भाषा बोलतों; बंगाल प्रांतांतील लोक बंगाली भाषा बोलतात; इंग्रज लोक इंग्लिश भाषा बोलतात; मुसलमान लोक उर्दू भाषा बोलतात.

या पुस्तकामध्यें आपल्याला मराठी भाषेचें निरीक्षण करावयाचें आहे. **ज्या शास्त्रामध्यें भाषेचें निरीक्षण करून तिच्यासंबंधानें नियम काढले असतात त्या शास्त्रास व्याकरणशास्त्र असें म्हणतात.**

## अभ्यास.

**[१] विधानार्थक, प्रश्नार्थक, आज्ञार्थक, व इच्छाप्रदर्शक वाक्यांचीं पांचपांच उदाहरणें द्या.**

**[२] तुमच्या वाचनपुस्तकांतील पहिल्या धड्यांतील पहिल्या पंधरा ओळींतील वाक्यें कोणत्या प्रकारचीं आहेत तें सांगा.**

**[३] आपल्याला भाषेचा उपयोग काय ?**

## धडा दुसरा.

## वाक्य आणि त्यांतील शब्द.

दुसऱ्याला कांहीं माहिती सांगणें, कांहीं माहिती विचारणें, आज्ञा करणें किंवा इच्छा प्रदर्शित करणें यांतून एखादी गोष्ट जेव्हां शब्दांनीं केली जाते तेव्हां त्या शब्दसमुदायास वाक्यें असें म्हणतात. ही गोष्ट

आपण मागीळ धड्यांत पाहिली. वाक्यामध्यें येणाऱ्या शब्दांचें निरीक्षण करून ते किती प्रकारचे असतात तें आपल्याला या धड्यांत पहावयाचें आहे.

खालीं विधानार्थक, प्रश्नार्थक, आज्ञार्थक व इच्छाप्रदर्शक यांपैकीं प्रत्येक प्रकारचें एक एक वाक्य दिलें आहे. त्यामध्यें माहिती सांगण्याचें, विचारण्याचें, आज्ञा करण्याचें व इच्छा प्रदर्शित करण्याचें काम कोणत्या शब्दांनीं झालें आहे तें पहा.

( १ ) घोडा गवत खातो. **विधानार्थक.**

( २ ) मी हें पुस्तक वाचूं? **प्रश्नार्थक.**

( ३ ) चांगलीं पुस्तकें वाचा. **आज्ञार्थक.**

( ४ ) वेळेवर पाऊस पडो. **इच्छाप्रदर्शक.**

वरील वाक्यामध्यें **खातो, वाचूं, वाचा** व **पडो** या शब्दांमुळेंच माहिती सांगणें, माहिती विचारणें, आज्ञा करणें व इच्छा प्रदर्शित करणें हीं कामें अनुक्रमें झालीं आहेत. हे शब्द जर वाक्यांत नसते तर वर सांगितलेल्या चार गोष्टींपैकीं कोणती गोष्ट करावयाची होती ते कांहींच समजलें नसतें. [हे शब्द वगळून पहा.] वाक्यार्थ पुरा करण्याचें काम याच शब्दांनीं झालें आहे. म्हणून हेच शब्द वाक्यांतील मुख्य शब्द आहेत असें म्हटलें पाहिजे अशा शब्दांस क्रियापदें म्हणतात.

**व्याख्याः--वाक्यांतील ज्या शब्दाच्या योगानें माहिती सांगण्याचें, विचारण्याचें, आज्ञा करण्याचें किंवा इच्छा प्रदर्शित करण्याचें काय होऊं शकतें म्हणजे ज्या शब्दाचे योगाने वाक्यार्थ दर्शविला जातो त्या शब्दास क्रियापद असें म्हणतात.**

क्रियापदाशिवाय वाक्य होऊं शकत नाहीं. प्रत्येक वाक्यांत क्रियापद हें असलेंच पाहिजे.

क्रियापदाचे योगानें वाक्यार्थ दर्शविण्याचें कार्य ज्याप्रमाणें होतें त्याचप्रमाणें प्रत्येक क्रियापदाचे योगानें कोणत्या तरी क्रियेचा बोध होत असतो. **खातो** या क्रियापदाचे योगानें खाणें या क्रियेचा, **वाचूं** व **वाचा** या क्रियापदांचे योगानें **वाचणें** या क्रियेचा, व **पडो** या क्रियापदाचे योगानें **पडणें** या क्रियेचा बोध झाला आहे.

**वाचणें, खाणें, पडणें, उठणें, बसणें** हे व यांसारखे इतर शब्द क्रियापदांत दर्शविलेल्या क्रियेचाच केवळ बोध करितात. यांचे शेवटीं **णें** हा क्रियादर्शक प्रत्यय आहे तो काढून टाकला म्हणजे **वाच, खा, पड, उठ, बस** अशीं रूपें शिल्लक राहतात. या रूपांस धातु असें म्हणतात.

क्रियापदाचे योगानें कोणती ना कोणतीतरी क्रिया दर्शविली जाते; क्रिया म्हटली कीं ती करणारा कोणी तरी पाहिजे. घोडा गवत खातो या वाक्यांत खाण्याची क्रिया करणारा म्हणजे खाणारा घोडा आहे. अशा शब्दास **कर्ता** असें म्हणतात.

**व्याख्याः—धातूनें दर्शविली जाणारी क्रिया जो करतो त्याचा उल्लेख ज्या शब्दानें होतो, त्या शब्दांस त्या धातूचा कर्ता असें म्हणतात.**

(१) घोडा गवत खातो. या ठिकाणीं खाणारा घोडा आहे.

(२) मी पुस्तक वाचूं ? या ठिकाणीं वाचणारा मी आहें.

(३) तुम्ही चांगलीं पुस्तकें वाचा. या ठिकाणीं वाचणारे तुम्ही (ज्यांचे जवळ आपण बोलतों ते) आहांत.

(४) फळें लवकर पिकोत. या ठिकाणीं पिकणारीं फळें आहेत. म्हणून **घोडा, मी, तुम्ही** व **फळें** हे शब्द खातो, वाचूं, वाचा व पिकोत या क्रियापदांचे अनुक्रमें कर्ते आहेत.

यापैकीं घोडा हा शब्द एका जातीच्या प्राण्याचें नांव असून फळ हा शब्द एक प्रकारच्या वस्तुचें नांव आहे. अशा शब्दांना नामें म्हणतात.

मी व तुम्ही हे शब्द कशाचींही नांवें नाहीत, परंतु त्यांचे योगानें बोलणाऱ्या व्यक्तीचा व ज्यांचेजवळ बोलावयाचे त्या व्यक्तींचा बोध झाला अशा शब्दांस सर्वनामें असें म्हणतात.

**व्याख्याः—(१) ज्या शब्दांचा उपयोग वस्तूंना नांवें देण्याचे कामीं होतो त्या शब्दांस नामशब्द अथवा नामें असें म्हणतात. जसें:—टेबल, खुर्ची, खिडकी, घोडा, वगैरे.**

**(२) जे शब्द वास्तविक कशाचींही नांवें नसून ज्यांना निरनिराळ्या वाक्यांत निरनिराळ्या नामशब्दांचा अर्थ येतो त्या शब्दांना सर्वनामें असें म्हणतात. जसें:—मी, तूं, तो, इत्यादि.**

**टीपः**—कर्त्याचे ठिकाणीं नामें येऊं शकतात.

'तुम्ही चांगलीं पुस्तकें वाचा' या वाक्यांत 'चांगलीं' हा शब्द गाळून नुसतें 'तुम्ही पुस्तकें वाचा' असें म्हटलें असतें तर त्याचा अर्थ चांगलीं वाईट कोणत्याही प्रकारचीं पुस्तकें वाचा असा झाला असता. 'पुस्तक' हें नाम जेवढ्या वस्तूंना लागूं शकतें तितक्या वस्तूंना 'चांगलें पुस्तक' हा शब्दसमुच्चय लागूं शकत नाहीं. जेवढीं पुस्तकें चांगलीं असतील तेवढ्याच पुस्तकांतून प्रत्येकाला 'चांगलें पुस्तक' हा शब्दसमुच्चय लागूं शकतो. 'पुस्तक' या नामाच्या मागें 'चांगलें' हा शब्द आल्यामुळें 'पुस्तक' या नामाची व्याप्ति कमी झाली.

**व्याख्याः—नामाची व्याप्ति कमी करणारा जो शब्द त्यास विशेषण असें म्हणतात.**

आतांपर्यंत आरंभींच्या वाक्यांचें आपण जें निरीक्षण केलें त्यांवरून आपल्याला खालील गोष्टी दिसून आल्या.

(१) प्रत्येक वाक्यामध्यें **क्रियापद** असून क्रियापदानें दर्शविल्या जाणाऱ्या क्रियेचा कर्ता दाखविणारा शब्द असतो.

(२) कर्ता हा नाम किंवा सर्वनाम असूं शकतो.

(३) वाक्यांत जीं नामें येतात त्यांची व्याप्ति कमी करावयाची असल्यास तें कार्य विशेषणाचे योगानें होतें.

**खातो** या क्रियापदांतील मूळ धातु **खा** असा आहे. या धातूचीं **खातो, खाईल, खाल्लें, खावें** अशीं निरनिराळीं रूपें निरनिराळ्या वाक्यांत येतात. (वाक्यें करून पहा.)

**घोडा** या नामाचीं **घोड्यास, घोड्यानें, घोडे,** अशीं निरनिराळीं रूपें निरनिराळ्या वाक्यांत येतात.

**तूं** या सर्वनामाचीं **तुला, तुझा, तुम्ही** अशीं निरनिराळीं रूपें निरनिराळ्या वाक्यांत येतात.

**चांगला** या विशेषणाचीं **चांगलें, चांगली, चांगल्या** अशीं निरनिराळीं रूपें निरनिराळ्या वाक्यांत येतात

या निरनिराळ्या रूपांना **विकार** असें व्याकरणांत नांव असून ज्या मूळशब्दाचीं तीं रूपें आहेत त्या शब्दांना **विकारी शब्द** असें म्हणतात.

नाम, सर्वनाम, विशेषण व धातु हे विकारी शब्द आहेत. क्रियापदें हे धातूंना झालेले विकार होत.

याखेरीज असे कित्येक शब्द वाक्यांत येतात कीं त्यांना कोणतेही विकार होत नाहीत; जसें:—मी तुला **लवकर** भेटेन. तो **हळूहळू** बोलतो. मी **दररोज** संध्याकाळीं फिरावयास जातों. या वाक्यांत आलेल्या **लवकर, हळूहळू, दररोज** या शब्दांना कोणत्याही प्रकारचा विकार होत नाहीं. अशा शब्दांना अविकारी शब्द अथवा अव्ययें असें म्हणतात.

या अव्ययांना क्रियापदानें दर्शविलेल्या क्रियेबद्दल कांहीं माहिती सांगितली असल्यामुळें त्यांना **क्रियाविशेषण अव्ययें** असें म्हणतात.

याप्रमाणें वाक्यांत क्रियापद, नाम किंवा सर्वनाम, विशेषण व क्रियाविशेषण हे शब्द वाक्याचे निरनिराळे स्वतंत्र भाग म्हणून येऊं शकतात. यांखेरीज खालील शब्दही वाक्यांत येतात; परंतु ते वाक्यांतील स्वतंत्र भाग या नात्यानें येत नाहींत.

(१) कित्येक अव्ययें नाम किंवा सर्वनाम, यांचे पुढें येऊन दोघें मिळून एक शब्द होतो; जसें:—ह्या पावसामुळें फार नुकसान होईल. माझ्याकडून ही गोष्ट होणार नाहीं. याठिकाणीं **मुळें** हें अव्यय **पाऊस** या नामाला लागलें असून **कडून** हें अव्यय **मी** या सर्वनामाला लागलें आहे. अशा अव्ययांना **शब्दयोगी अव्ययें** असें म्हणतात.

(२) कित्येक अव्ययें वाक्यांत येणारीं नसतात; तीं वाक्याचे बाहेर राहून दोन वाक्यें केवळ एकमेकांना जोडण्याचें कार्य करितात. जसें:—मी काल तुमचे घरीं आलों होतों; **परंतु** तुम्ही घरीं नव्हतां. या ठिकाणीं **परंतु** या अव्ययाचे योगानें 'मी काल तुमचे घरीं आलों होतों' व 'तुम्ही घरीं नव्हतां' हीं दोन वाक्यें जोडलीं गेलीं अशा अव्ययांना **उभयान्वयी अव्ययें** असें म्हणतात.

(३) वाक्याचे बाहेर राहणारीं आणखीही एक प्रकारचीं अव्ययें आहेत. तीं उभयान्वयी अव्ययांप्रमाणें दोन वाक्यें जोडीत नाहींत, तर बोलणाऱ्याचे मनांत आनंद, दुःख राग असे जे निरनिराळे विकार बोलतांना उद्भवतात ते दर्शविण्याकरितांच केवळ त्यांचा उपयोग होतो. जसें:—**वा!** हें फार चांगलें झालें. **अरेरे!** किती वाईट गोष्ट झाली ही! या ठिकाणीं **वा!** आणि **अरेरे!** हीं अव्ययें वाक्याचे बाहेरच आहेत, म्हणजे वाक्यांतील कोणत्याहि शब्दाशीं त्यांचा संबंध आलेला नाहीं.

त्याचे योगानें हर्ष व दुःख हे मनोविकार मात्र दाखविले गेले आहेत. अशा अव्ययांना केवलप्रयोगी अव्ययें असें म्हणतात.

## या धड्यात आपण काय शिकलों ?

( १ ) नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद, क्रियाविशेषण अव्यय, शब्दयोगी अव्यय, उभयान्वयी अव्यय, व केवलप्रयोगी अव्यय अशा शब्दांच्या आठ जाती आहेत.

( २ ) यापैकीं नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद, व क्रियाविशेषण अव्यय हे शब्द वाक्यातील स्वतंत्र शब्द म्हणून येऊं शकतात, व त्यांचा वाक्यातील इतर शब्दांशीं कोणता तरी संबंध असतो.

( ३ ) शब्दयोगी अव्यय वाक्यात येऊं शकतें; परंतु वाक्यांतील स्वतंत्र शब्द म्हणून तें येत नाहीं. त्याचा नामाशीं किंवा सर्वनामाशीं संयोग होऊन त्या दोहोंमिळून जो एक शब्द बनतो तो मात्र वाक्यांतील स्वतंत्र भाग होतो.

( ४ ) उभयान्वयी अव्यय हें वाक्यात येतच नाहीं; तें वाक्याचे बाहेर राहून दोन वाक्यें एकमेकांस जोडतें.

( ५ ) केवलप्रयोगी अव्ययही वाक्याचे बाहेरच रहातें; म्हणजे वाक्यांतील कोणत्याही शब्दाशीं त्याचा संबंध नसतो.

## अभ्यास.

( १ ) क्रियापद वाक्यांत येण्याचें कारण काय ?
( २ ) नाम किंवा सर्वनाम हीं वाक्यांत येण्याचें कारण काय ?
( ३ ) विशेषण वाक्यांत येण्याचें कारण काय ?
( ४ ) क्रियाविशेषण वाक्यांत येण्याचें कारण काय ?
( ५ ) उभयान्वयी अव्ययांचा उपयोग काय ?

(६) शब्दयोगी व केवलप्रयोगी अव्ययें यांचा उपयोग काय ?

(७) विकारी शब्द व अविकारी शब्द म्हणजे काय ? उदाहरणें द्या.

(८) धातु व क्रियापद यांमध्यें फरक काय ?

(९) कोणतीं अव्ययें वाक्याचे आंत येतात व कोणतीं बाहेर राहतात ?

---

## धडा तिसरा.

## व्याकरण म्हणजे काय ? *

व्याकरण हें शब्दांनीं बनलेल्या भाषेचा अभ्यास करणारें शास्त्र आहे. आपली भाषा ही पुष्कळ वाक्यांची मिळून बनलेली असते; व वाक्य हें एका किंवा पुष्कळ शब्दांचें मिळून झालेलें असतें. म्हणून व्याकरणशास्त्रामध्यें शब्दाचा व त्यांनीं बनलेल्या वाक्याचा अभ्यास करावयाचा असतो.

### शब्दांचा अभ्यास करावयाचा म्हणजे काय करावयाचें ?

(१) वाक्यांत येणारे शब्द किती प्रकारचे आहेत तें पहावयाचें म्हणजे त्या शब्दाचे किती वर्ग होतात तें सांगावयाचे. शब्दांचे नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद, क्रियाविशेषण अव्यय, शब्दयोगी अव्यय, उभयान्वयी अव्यय व केवलप्रयोगी अव्यय, असे आठ प्रकार होतात ही गोष्ट आपण मागच्या धड्यांत पाहिलीच आहे. त्या धड्यांत आपण शब्दांचे आठ वर्ग केले. वर्ग करणें याला वर्गीकरण असा एक शब्द आहे.

---

* हा धडा अगदीं शेवटीं पुन्हां शिकवावा.

शब्दाचें आठ भागांत वर्गीकरण केल्यानंतर पुन्हां नामें सर्वनामें वगैरे मुख्य वर्गांचे सामान्यनामें, विशेषनामें वगैरे किती वर्ग होतात तेंही पहावें लागतें. याला **उपवर्गीकरण** असें म्हणतात.

(२) जे शब्द विकारी असतील **त्यांना कोणकोणते विकार होतात,** व ते कोणत्या नियमांनीं होतात ही गोष्ट सुद्धां व्याकरण-शास्त्रांत पहावी लागते; किंवा शब्दांच्या विकरणाचाही आपल्याला अभ्यास करावा लागतो, **विकरण** म्हणजे **विकार** होणें.

(३) वाक्यांत येणाऱ्या शब्दांचा **एकमेकांशीं कोणता संबंध असतो** त्याचाही व्याकरणशास्त्र विचार करितें.

तेव्हां शब्दांचा अभ्यास करावयाचा म्हणजे ( १ ) शब्दांचें वर्गीकरण व उपवर्गीकरण करावयाचें, ( २ ) शब्द विकारी असल्यास त्याला विकरण कसें व कोणत्या नियमांनीं होतें तें पहावयाचें, व ( ३ ) वाक्यांत येणाऱ्या शब्दांचे एकमेकांशीं कोणते संबंध असतात तें ओळखावयाचें, शब्दाचा अभ्यास करणें यामध्यें वरील तीन गोष्टींचा अंतर्भाव प्रामुख्यानें होतो.

टीपः—याखेरीज दुसऱ्या रीतींनींही शब्दांचा अभ्यास होऊं शकतोः—(१) शब्द कसे उच्चारले जातात व लिहिले जातात, म्हणजे त्यांमध्यें कोणती अक्षरें असतात, त्याचप्रमाणें (२) अमुक एक शब्द भाषेंत मूळचाच आहे किंवा तो दुसऱ्या एखाद्या शब्दापासून झालेला आहे या प्रश्नाचा विचार करणे म्हणजे शब्दांचाच एक प्रकारें अभ्यास करणें होय. याच कारणाकरितां वर्णविचाराचा व शब्दांच्या व्युत्पत्तीचा अंतर्भाव व्याकरणांत होतो.

## वाक्याचा अभ्यास करावयाचा म्हणजे काय करावयाचें ?

( १ ) वाक्यांची व्याख्या करावयाची.

( २ ) वाक्यांतील मुख्य भाग कोणते तें पहावयाचें.

(३) वाक्यांचें वर्गीकरण करावयाचें.

(४) एका वाक्याचा दुसऱ्या वाक्याशीं कोणता संबंध असतो तें पहावयाचें.

या पुस्तकांत आपण प्रथम शब्दांचा अभ्यास करून नंतर वाक्यांचा विचार करूं.

शब्दांचे नाम, सर्वनाम वगैरे आठ प्रकार होतात हें आपण पाहिलेंच आहे. या आठ प्रकारांपैकीं प्रत्येक प्रकार घेऊन त्याचा आपण ( १ ) वर्गीकरण ( २ ) विकरण व ( ३ ) वाक्यांतील इतर शब्दांशीं संबंध या क्रमानें प्रथम अभ्यास करूं; व नंतर वाक्यांचा अभ्यासही वर दाखविलेल्या क्रमानेंच करूं.

# खंड दुसरें.

## वर्णविचार.

---

### भाग पहिला.

### अक्षरें.

आपल्या बोलण्यांत येणारे शब्द हे अक्षरांचे बनलेले असतात. जसें:—आपल्या हा शब्द आ, प आणि ल्या या तीन अक्षरांचा झालेला आहे त्यांतील आ आणि प हीं अक्षरें साधीं असून ल्या हें जोडाक्षर आहे. बोलण्यांत हा शब्द बो, ल, ण्यां, आणि त अशा चार अक्षरांचा झालेला आहे. अक्षरें हीं तोंडानें उच्चारतां येतात व कागदावर लिहितां येतात.

शब्दाच्या आरंभीच्या अक्षराला आद्याक्षर असें नांव असून शेवटच्या अक्षराला अन्त्याक्षर असें म्हणतात. जसें:—बोलण्यांत या शब्दाचें बो हें आद्याक्षर असून त हें अन्त्याक्षर आहे. आद्य म्हणजे पहिलें व अन्त्य म्हणजे शेवटचें.

शब्दाच्या अन्त्याक्षराच्या मागच्या अक्षराला उपान्त्याक्षर असें म्हणतात; जसें:—बोलण्यांत या शब्दामध्यें ण्यां हें अक्षर त या अन्त्याक्षराच्या मागचें आहे, म्हणून ण्यां हें अक्षर बोलण्यांत या शब्दामध्यें उपान्त्याक्षर झालें. उप म्हणजे जवळचें.

शब्दांतील अक्षरावर असलेल्या टिंबास अनुस्वार असें म्हणतात; जसें:—करणें, गंगा या शब्दांत णें व गं या अक्षरांवर अनुस्वार आहे.

## अभ्यास.

(१) खालील वाक्यांतील प्रत्येक शब्द किती अक्षरांचा आहे तें सांगून त्याचें आद्य, अन्त्य व उपान्त्य अक्षर सांगा.

(१) मोरोपंताची कविता वाचून मनाला अत्यानंद होतो.

(२) ह्या संकटांतुन ईश्वर आमची मुक्तता करो.

(३) जो मुलगा नियमितपणें अभ्यास करतो त्याला पश्चाताप करण्याचा प्रसंग येत नाहीं.

(२) दोन अक्षरांचे, तीन अक्षराचे, चार अक्षरांचे व एक अक्षराचे पांच पांच शब्द सांगा.

---

### धडा दुसरा.

## वर्ण—स्वर आणि व्यंजनें.

आपल्या बोलण्यांत येणारे शब्द अक्षरांचे बनलेले असतात ही गोष्ट आपण मागील धड्यांत पाहिली. या अक्षरांबद्दल जर आपण सूक्ष्मपणें विचार केला तर असें दिसून येतें कीं हीं अक्षरें सुद्धा मूळचीं नसून त्यांचेंही आणखी पृथक्करण करतां येतें. जसें, **विनायक** या शब्दामधील **वि** हें अक्षर घ्या. हें मूळचेंच असावें असें आरंभाला वाटतें खरें; परतु तें **व्** आणि **इ** या दोन उच्चारांचें बनलेलें आहे. **चित्र** या शब्दांतील **चि** हें अक्षर **च्** आणि **इ** या दोन उच्चारांचें बनलेलें आहे. **अग्नि** या शब्दांतील **ग्नि** हें अक्षर **ग्** **न्** आणि **इ** या तीन उच्चारांचें बनलेलें आहे.

**वि** हा ध्वनि आहे. त्याचें पृथक्करण केलें असता त्यांत **व्** आणि **इ** हे दोन ध्वनि सांपडतात.

**चि** हा ध्वनि आहे. त्याचें पृथक्करण केलें असतां त्यांत **च्** आणि **इ** हे ध्वनि सांपडतात.

ग्नि हा ध्वनि आहे. त्याचें पृथक्करण केलें असतां ग्, न् आणि इ् हे ध्वनी सांपडतात.

व्, च्, ग्, न् आणि इ् हेही ध्वनीच आहेत. परंतु त्यांचें इतर ध्वनींमध्यें पृथक्करण करतां येत नाहीं. अशा मूळध्वनींना वर्ण असें म्हणतात.

वरील वर्णांपैकीं व्, च्, ग्, आणि न् हे वर्ण असे आहेत कीं त्यांचा उच्चार स्वतंत्रपणें होत नाहीं. उच्चार होण्याकरितां त्या शब्दांमध्यें इ या वर्णाचें साहाय्य घ्यावें लागलें. परंतु इ या वर्णाचा उच्चार मात्र इतर वर्णांच्या साहाय्यावांचून स्वतंत्रपणें होऊं शकतो.

**व्याख्याः—(१) ज्या वर्णांचा उच्चार स्वतंत्रपणें म्हणजे दुसऱ्या वर्णांच्या साहाय्यावांचून होतो त्या वर्णांस स्वर असें म्हणतात.**

अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ए, ऐ, ओ, औ, हे स्वर आहेत. त्यांपैकीं अ, इ, उ, ऋ, व ऌ, यांना **र्‍हस्व स्वर** असें नांव असून बाकीच्यांना **दीर्घ स्वर** असें म्हणतात.

**(२) ज्या वर्णांचा उच्चार स्वतंत्रपणें म्हणजे दुसऱ्या वर्णांच्या साहाय्यावांचून होत नाहीं त्यांस व्यंजनें असें म्हणतात.**

व्यंजनें एकंदर ३४ आहेत. हीं सर्व खालीं लिहून दाखविलीं आहेत.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| क् | ख् | ग् | घ् | ङ् |
| च् | छ् | ज् | झ् | ञ् |
| ट् | ठ् | ड् | ढ् | ण् |
| त् | थ् | द् | ध् | न् |
| प् | फ् | ब् | भ् | म् |

य् र् ल् व्

श् ष् स्

ह् ळ्

(१) वरील व्यंजनांपैकीं क्, ख्; च्, छ्; ट्, ठ्; त्, थ्; प्, फ्; श्, ष् आणि स् यांना कठोर व्यंजनें असें म्हणतात. तीं जाड अक्षरांनी लिहून दाखविलीं आहेत.

(२) बाकीच्या व्यंजनांना मृदु व्यंजनें असें म्हणतात.

## अभ्यास.

(१) खालीं विश्वनाथ या शब्दाचें अक्षरांत व अक्षरांचें वर्णांत पृथक्करण करून दाखविलें आहे; त्याचें नीट निरीक्षण करा.

विश्वनाथ,
=वि+श्व+ना+थ [ अक्षरें ]
=व् + इ + श् + व् + अ + न् + आ + थ् + अ. [ वर्ण ]

याप्रमाणें पुढील शब्दांचें पृथक्करण करून दाखवा. व्याकरण, जगन्निवास, ईश्वर, हनुमंत, अरविन्द, केशव.

(२) वरील शब्दांमध्यें आलेल्या व्यंजनांपैकीं कठोर व्यंजनें कोणतीं व मृदु कोणतीं ते सांगा.

(३) मृदु व्यंजनें किती आहेत? त्यांचीं नांवें सांगा.

---

## धडा तिसरा.

## वर्णांचें स्थानदृष्ट्या वर्गीकरण.

प, फ, ब, भ आणि म हीं अक्षरें म्हणा.

आतां हंसतांना ओंठ जसे एकमेकांपासून दूर होतात तसे ते दूर करून प, फ, ब, भ, आणि म हीं पुन्हा म्हणण्याचा प्रयत्न करा. तुम्हांला तीं म्हणतां येणार नाहींत. आतां ओंठ तसेच एकमेकांपासून लांब ठेवून त, थ, द, ध, न, क, ख, ग, घ, ङ, हीं अक्षरें म्हणून पहा तीं तुम्हांला म्हणतां येतील. प, फ, ब, भ, म हीं अक्षरें ओंठ

एकमेकांपासून दूर ठेवून म्हणता येत नाहींत. याचें कारण असें आहे कीं, प्, फ्, ब्, भ्, व म् या व्यंजनांचा उच्चार होण्याकरितां ओठ एकमेकांना लागणें जरूर असतें. प हें अक्षर प् व्यंजन आणि अ स्वर यांनीं मिळून झालेलें आहे हें लक्षात ठेवा. अ हा स्वर ओठ एकमेकांना लागूं दिल्याशिवाय उच्चारता येतो. ( उच्चारून पहा ) प्, हें व्यंजन मात्र तसें उच्चारतां येत नाहीं. प्, फ्, ब् भ्, म्, या वर्णांचा उच्चार ओठापासून होतो म्हणून यांना **ओष्ठस्थानचे वर्ण** असें म्हणतात.

आतां त्, थ्, द् ध्, न्, हीं अक्षरें उच्चारून पहा. हीं अक्षरें उच्चारतांना जिभेचा शेंडा दातांना लागतो असें तुम्हाला आढळून येईल. त्, थ्, द्, ध्, न्, या वर्णांचा उच्चार करतांना जीभ दातांना लावावी लागते म्हणून याना **दन्तस्थानचे वर्ण** असें म्हणतात.

त्याचप्रमाणें ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, या व्यंजनांचा उच्चार करतांना जिभेचा शेंडा अगदीं वर आटाळ्याला लागतो असें दिसून येईल. ज्या वर्णांचा उच्चार करतांना जीभ याप्रमाणें अगदीं आटाळ्याला लावावी लागते त्या वर्णांना **मूर्धस्थानचे वर्ण** असें व्याकरणकारांनीं नांव दिलें आहे.

याप्रमाणें आपल्या मुखावाटे बाहेर पडणारा प्रत्येक वर्ण मुखाच्या कोणत्या भागातून उच्चारला जातो त्याचें व्याकरणकारांनीं सूक्ष्म निरीक्षण केलें; तेव्हां त्यांना असें आढळून आलें कीं कंठ, **मूर्धा**, **तालु**, **दांत** व **ओठ** या पांच स्थानांतून निरनिराळे वर्ण निघतात. कोणते वर्ण कोणत्या स्थानांतून निघतात तें पुढील कोष्टकांत दाखविलें आहे. प्रत्येक वर्ण तुम्ही स्वतः उच्चारून तो सांगितलेल्या स्थानांतून निघतो याबद्दल आपली खात्री करून घ्या.

| स्थानांचीं नांवें. | व्यंजनें. | स्वर. |
|---|---|---|
| कंठस्थान. | क्, ख्, ग्, घ्, ङ्, ह्, | अ, आ. |
| मूर्धस्थान. | ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, र्, ष्, ळ्, | ऋ, ॠ. |
| तालुस्थान. | *च्, छ्, ज्, झ्, ञ्, य्, श्, | इ, ई. |
| दन्तस्थान. | त्, थ्, द्, ध्, न्, ल्, स्, | ऌ. |
| ओष्ठस्थान. | प्, फ्, ब्, भ्, म्, | उ, ऊ. |
| नासिकास्थान. | ङ्, ञ्, ण्, न्, म्, | |
| दन्तोष्ठस्थान. | व्, | |
| दन्ततालव्यस्थान | च्,†ज्, झ्, | |
| कंठौष्ठस्थान. | — | ओ, औ. |
| कंठतालव्यस्थान | — | ए, ऐ. |

## संधिविचार.

"शब्दाच्या शेवटच्या अक्षराला **अन्त्याक्षर** व त्याचे मागचे अक्षराला **उपान्त्याक्षर** असें म्हणतात.

या वाक्यांतील **अन्त्याक्षर** व **उपान्त्याक्षर** हे शब्द पहा. **अन्त्याक्षर** हा शब्द **अन्त्य** आणि **अक्षर** या दोन शब्दांनीं मिळून झाला आहे. परंतु तो **अन्त्यअक्षर** असा न होतां **अन्त्याक्षर** असा झाला आहे. **अन्त्यअक्षर** असें म्हणण्यापेक्षां **अन्त्याक्षर** असें म्हणणें सोपें जातें.

*चंद्र, छत्री, जित, झेप, यांतील, च्, छ्, ज्, झ्, या व्यंजनांचे उच्चार तालव्य आहेत.

†मुलाचा, जांवई, झाड, यांतील च्, ज्, व झ्, या व्यंजनांचे उच्चार दन्ततालव्य आहेत.

अन्त्य या शब्दाचे शेवटी अ हा वर्ण आहे. ( अन्त्य=अ+न्+त्+य्+अ ); व अक्षर या शब्दाचे आरंभी अ हा वर्ण आहे. अन्त्य या शब्दाचे शेवटचा वर्ण अ आणि अक्षर या शब्दातील आरंभीचा वर्ण अ या दोहोंचे ऐवजीं आ असा एकच वर्ण अन्त्याक्षर या शब्दामध्यें आला आहे. अशा प्रकारास संधि असें म्हणतात.

व्याख्याः—दोन वर्ण एकापुढें एक असे आले असतां ते सुलभ व जलद उच्चारतां यावे म्हणून त्यांना जोडण्याचा अथवा सांधण्याचा जो प्रकार आहे त्याला संधि करणें असें म्हणतात.

संधिचे ( १ ) स्वरसंधि, ( २ ) व्यंजनसंधि, ( ३ ) विसर्गसंधि असे तीन प्रकार आहेत. याचे मुख्य मुख्य नियम खालीं कोष्टकामध्यें उदाहरणें दिलीं आहेत त्यांवरून कळून येतील.

---

धडा पहिला.

## स्वरसंधि.

खालील कोष्टकांत दिलेल्या शब्दांचें व त्यांच्या संधींचें निरीक्षण करा.

### कोष्टक पहिलें.

| उदाहरणें. | निरीक्षण. | नियम. |
|---|---|---|
| ईश्वर+अधीन=ईश्वराधीन. | अ+अ=आ | ( १ ) अ किंवा आ या स्वरांपुढें अ किंवा आ हे स्वर आल्यास दोहोंबद्दल आ हा स्वर येतो. |
| सर्व+आधार=सर्वाधार. | अ+आ=आ | |
| माया+अवतार=मायावतार. | आ+अ=आ | |
| मिथ्या+आरोप=मिथ्यारोप. | अ+आ=आ | |
| हरी+इच्छा=हरीच्छा. | ई+इ=ई | ( २ ) इ किंवा ई या स्वरांपुढें इ किंवा ई हे स्वर आल्यास दोहोंबद्दल ई हा दीर्घ स्वर येतो. |
| मुनि+ईश्वर=मुनीश्वर. | इ+ई=ई | |
| नदी+ईश=नदीश. | ई+ई=ई | |
| भानु+उदय=भानूदय. | उ+उ=ऊ | (३) उ किंवा ऊ या स्वरांपुढें उ किंवा ऊ हे स्वर आले असतां दोहोंबद्दल ऊ हा दीर्घ स्वर येतो. |
| वधू+उत्साह=वधूत्साह. | ऊ+उ=ऊ | |

अ किंवा आ या स्वरापुढें अ व आ हे स्वर खेरीज करून बाकीचे स्वर आले असता संधि कसे होतात ते खालील कोष्टकांत पहा.

## कोष्टक दुसरें.

| उदाहरणें. | निरीक्षण. | नियम. |
| --- | --- | --- |
| सुर+इंद्र=सुरेंद्र. | अ+इ=ए | अ अथवा आ या स्वरापुढें:- (४) इ अथवा ई हे स्वर आले असतां दोहोंबद्दल ए हा स्वर येतो. |
| राम+ईश्वर=रामेश्वर. | अ+ई=ए | |
| रमा+ईश=रमेश. | आ+ई=ए | |
| प्रश्न+उत्तर=प्रश्नोत्तर. | अ+उ=ओ | (५) उ किंवा ऊ हे स्वर आले असता दोहोंबद्दल ओ हा स्वर येतो. |
| गंगा+उदक=गंगोदक | आ+उ=ओ | |
| सागर+ऊर्मि=सागरोर्मि. | अ+ऊ=ओ | |
| जल+ओघ=जलौघ. | अ+ओ=औ | (६) ओ किंवा औ हे स्वर आले असता दोहोंबद्दल औ हा स्वर येतो. |
| कर्ण+औदार्य=कर्णौदार्य. | अ+औ=औ | |
| गंगा+ओघ=गंगौघ. | आ+ओ=औ | |
| चित्त+एकाग्रता=चित्तैकाग्रता. | अ+ए=ऐ | (७) ए किंवा ऐ हे स्वर आले असतां दोहोंबद्दल ऐ हा स्वर येतो. |
| सदा+एव=सदैव. | आ+ए=ऐ | |
| मत+ऐक्य=मतैक्य. | अ+ऐ=ऐ | |
| देव+ऋषि=देवर्षि. | अ+ऋ=अर् | (८) ऋ हा स्वर आला असतां दोहोंबद्दल अर् येतो. |
| महा+ऋषि=महर्षि. | आ+ऋ=अर् | |

इ, ई, उ, ऊ, या स्वरांपुढें इ, ई, उ, ऊ, हेच स्वर आले असतां संधि कसा होतो तें आपण पहिल्या कोष्टकांत पाहिलेंच आहे. ह्यांचे पुढें इतर स्वर आले असतां संधि कसे होतात तें खालील कोष्टकावरून समजून येईल.

## कोष्टक तिसरें.

| उदाहरणें. | निरीक्षण. | नियम. |
| --- | --- | --- |
| अति+अल्प=अत्यल्प.<br>अति+आचार=अत्याचार.<br>नीति+उपदेश=नित्युपदेश.<br>प्रति+एक=प्रत्येक.<br>नदी+ऐश्वर्य=नद्यैश्वर्य.<br>शाली+ओदन=शाल्योदन.<br>हरी+औदार्य=हर्यौदार्य. | इ+अ=य(य्+अ)<br>इ+आ=या(य्+आ)<br>इ+उ=यु(य्+उ)<br>इ+ए=ये(य्+ए)<br>ई+ऐ=यै(य्+ऐ)<br>ई+ओ=यो(य्+ओ)<br>ई+औ=यौ(य्+औ) | (९) इ अथवा ई या स्वरापुढें इ अथवा ई खेरीज करून कोणताही स्वर आला असतां मागील इ अथवा ई या स्वराबद्दल य् हा वर्ण येतो; व तो पुढील स्वराशीं मिळून जातो. |
| अनु+अर्थक=अन्वर्थक.<br>गुरु+आज्ञा=गुर्वाज्ञा.<br>लघु+इतिहास=लघ्वितिहास.<br>वधु+ईर्षा=वध्वीर्षा.<br>प्रभु+ऐश्वर्य=प्रभ्वैश्वर्य.<br>मधु+औषधि=मध्वौषधि.<br>गुरु+औदार्य=गुर्वौदार्य. | उ+अ=व(व्+अ)<br>उ+आ=वा(व्+आ)<br>उ+इ=वि(व्+इ)<br>ऊ+ई=वी(व्+ई)<br>उ+ऐ=वै(व्+ऐ)<br>उ+ओ=वो(व्+ओ)<br>उ+औ=वौ(व्+औ) | (१०) उ अथवा ऊ या स्वरापुढें उ अथवा ऊ खेरीज करून कोणताही स्वर आला असतां उ अथवा ऊ या स्वराबद्दल व् हा वर्ण येतो व तो पुढील स्वराशीं मिळून जातो. |
| पितृ+अर्थ=पित्रर्थ.<br>पितृ+आज्ञा=पित्राज्ञा.<br>पितृ+इच्छा=पित्रिच्छा.<br>इत्यादि | ऋ+अ=र(र्+अ)<br>ऋ+आ=रा(र्+आ)<br>ऋ+इ=रि(र्+इ)<br>इत्यादि. | (११) ऋ या स्वरापुढें ऋ अथवा ॠ खेरीज करून कोणताही स्वर आला असतां मागील ऋ या स्वराबद्दल र् हा वर्ण येतो; व तो पुढील स्वराशीं मिळून जातो. |

## अभ्यासाकरितां प्रश्न.

**(१) संधि करा.**

**पुरुष+अभ्यास.**
**धन+इच्छा.**
**लघु+आकार.**
**रवि+उदय.**
**दशरथ+आत्मज.**

हित+ऐक्य.
उत्तर+उत्तर.
महत्व+आकांक्षा.
अति+उत्तम.
सु+आगत.

द्रव्य+उत्पत्ति.
साधु+उक्ति.
मिथ्या+आभास.
ब्राम्हण+इतर.
मित्र+उपदेश.

(२) खालील शब्दांतील संधि सोडवून मूळ शब्द सांगा.

| | | | |
|---|---|---|---|
| सुर्यास्त. | रघूत्तम. | मृगेंद्र. | कवीश्वर. |
| गरुडेश. | बालार्क. | पुरुषोत्तम. | नृपाज्ञा. |
| हस्ताक्षर. | सुखेंदु. | देशाधिपति. | गणेशोत्सव. |
| शीतोष्ण. | दीर्घाक्षर. | गवोक्ति. | अभ्युदय. |
| सर्वैत्र. | उष्णोर्वेधि. | दीर्घायु. | मन्वंतर. |

(३) वरील शब्दांतील एक एक शब्द घेऊन त्यांतील संधि कोणत्या नियमाप्रमाणें झाला तें सांगा.

---

## धडा दुसरा.

## व्यंजनसंधि.

व्यंजनापुढें व्यंजन अथवा स्वर आला असतां संधि कसे होतात तें पुढील कोष्टकावरून दिसून येईल.

### कोष्टक पहिलें.

क्, च्, ट्, त्, प्, या व्यंजनापुढें स्वर अथवा मृदु व्यंजन आलें असतां संधि कसे होनात तें खालील कोष्टकांत पहा.

| उदाहरणें. | निरीक्षण. | नियम. |
|---|---|---|
| वाक्+ईश=वागीश.<br>वाक्+देवी=वाग्देवी | क्+ई=ग्+ई<br>क्+द्=ग्+द् | (१) अन्त्य क्, च्, ट्, त्, प्, यांचे पुढें एखादा स्वर अथवा मृदु व्यंजन आलें असतां क्, च्, ट्, त्, प्, यांचे ठिकाणीं त्याच वर्गांतील तिसरीं व्यंजनें म्हणजे ग्, ज्, ड्, द्, ब्, हीं अनुक्रमें येतात. |
| अच्+अन्त=अजन्त.<br>सच्(त्)+जन=सज्जन. | च्+अ=ज्+अ<br>च्+ज=ज्+ज् | |
| षट्+आनन=षडानन.<br>षट्+रिपु=षड्रिपु. | ट्+आ=ड्+आ<br>ट्+र्=ड्+र् | |

| उदाहरणें. | निरीक्षण. | नियम. |
|---|---|---|
| भगवत्+इच्छा=भगवदिच्छा | त्+इ=द्+इ | (१) |
| भगवत्+गीता=भगवद्गीता | त्+ग्=द्+ग् | |
| सुप्+अंत=सुबंत | प्+अ=ब्+अ | |
| अप्+द=अब्द | प्+द्=ब्+द् | |

## कोष्टक दुसरें.

क्, च्, ट्, त्, प् या व्यंजनांपुढें स्वर अथवा मृदु व्यंजन आलें असतां ग्, ज्, ड्, द्, ब् हीं व्यंजनें अनुक्रमें त्यांचे ऐवजीं येतात हें आपण वरील कोष्टकांत पाहिलें. आतां ग्, ज्, ड्, द्, ब्, यांचे पुढें कठोर व्यंजनें आलीं असतां संधि कसे होतात तें खालील कोष्टकांत दाखविलें आहे.

| उदाहरणें. | निरीक्षण. | नियम. |
|---|---|---|
| वाग्+चातुर्य=वाक्चातुर्य | ग्+च्=क्+च् | (२) ग्, ज्, ड्, द्, ब् यांचे पुढें कठोर व्यंजन आलें असतां ग्, ज्, ड्, द्, ब् यांचे ऐवजीं त्याच वर्गांतील पहिलीं व्यंजनें म्हणजे क्, च्, ट्, त्, प् हीं अनुक्रमें येतात. |
| सज्+चरित्र=सच्चारित्र | ज्+च्=च्+च् | |
| षड्+पाद=षट्पाद | ड्+प्=ट्+प् | |
| विपद्+काल=विपत्काल | द्+क=त्+क | |
| सुब्+प्रत्यय=सुप्प्रत्यय | ब्+प=प्+प् | |

## कोष्टक तिसरें.

दन्तस्थानांतील व्यंजनांपुढें (त्, थ्, द्, ध्, न्, म्) तालुस्थानांतील (च्, छ्, ज्, झ्, ञ्, श्,) किंवा मूर्धस्थानांतील (ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, ष्) व्यंजन आलें असतां संधि कसे होतात तें खालील कोष्टकांत दाखविलें आहे.

| उदाहरणें. | निरीक्षण. | नियम. |
| --- | --- | --- |
| सत्+चरित्र=सच्चरित्र<br>भवत्+छत्र=भवच्छत्र<br>विपद्+जलधि=विपज्जलधि<br>शरद्+झंझावत=शरज्झंझावात<br>तत्+टीका=तट्टीका<br>भगवत्+डमरू=भगवड्डमरू | त्+च्=च्+च्<br>त्+छ्=च्+छ्<br>द्+ज्=ज्+ज्<br>द्+झ=ज्+झ्<br>त्+ट्=ट्+ट्<br>त्+ड्=ड्+ड् | [३] तवर्गातील व्यंजना पुढें चवर्गातील व्यंजनें आल्यास तवर्गातील व्यंजनाऐवजीं चवर्गातील त्याच क्रमाचें व्यंजन येत व टवर्गातील व्यंजन आल्यास तवर्गातील व्यंजनाऐवजीं टवर्गातील व्यंजन येतें. |
| पुरस्+चरण=पुरश्चरण<br>मनस्+चक्षु=मनश्चक्षु | स्+च्=श्+च्<br>स्+च्=श्+च् | [४] स् या व्यंजनापुढें च् हें व्यंजन आलें असतां मागील स् चे ऐवजीं श् हें व्यंजन येतें. |

## कोष्टक चवथें.

| उदाहरणें. | निरीक्षण. | नियम. |
| --- | --- | --- |
| वाक्+निश्चय=वाङ्निश्चय<br>षट्+मास=षण्मास<br>भगवत्+नाम=भगवान्नाम | क्+न=ङ्+न्<br>ट्+म्=ण्+म्<br>त्+न्=न्+न् | (५) क् ट् त् यांचेपुढें म्, न् हीं व्यंजनें आलीं असतां क्,ट्,त्, यांचे जागीं ङ्, ण्, न् हीं व्यंजनें अनुक्रमें येतात. |
| सम्+कर=संकर, सङ्कर<br>सम्+चय=संचय, सञ्चय<br>सम्+तोष=संतोष, सन्तोष<br>सम्+पूर्ण=संपूर्ण, सम्पूर्ण | म्+क्=ङ्+क्<br>म्+च्=ञ्+च्<br>म्+त्= +त्<br>म्+प्=म्+प् | (६) म् या व्यंजनापुढें एखादें व्यंजन आल्यास म् चा अनुस्वार होतो, किंवा पुढील व्यंजनाचे वर्गातील अनुनासिक म् चे जागीं येतें. |

## अभ्यास.

**१. पुढील शब्दांतील संधि सोडवा.**

मन्मती, सज्जन, तन्निधन, जगन्निवास, मद्भुज, भवच्चरण, सदाचार, सद्गति, सदसद्विवेक.

**२. पुढील शब्द संधींनीं जोडा.**

मत्+जन्म, भगवत्+प्राप्ति; षड्+पाद; जगद्+जीवन; अस्मत्+गृह; जगत्+नाथ; हृत्+मंदिर; सत्+गुण; विपद्+जलधि.

**३. पहिल्या व दुसऱ्या प्रश्नांतील संधि ज्या नियमांनीं झाले ते नियम सांगा.**

**४. स्वरसंधींचीं वीस उदाहरणें व व्यंजनसंधींचीं दहा उदाहरणें शोधून घरून लिहून आणा.**

---

## धडा तिसरा.

## विसर्गसंधि.

### कोष्टक पहिलें.

विसर्गामागें अ व पुढें मृदु व्यंजन आल्यास संधि कसा होतो तें पुढील कोष्टकांत पाहून सांगा.

| उदाहरणें. | निरीक्षण. |
|---|---|
| मनः+रथ=मन+उ+रथ=मनोरथ. | अः+र्=अ+उ+र्=ओ+र् |
| यशः+धन=यश+उ+धन=यशोधन. | अः+ध्=अ+उ+ध्=ओ+ध् |
| नभः+मंडल=नभ+उ+मंडल=नभोमंडल | अः+म्=अ+उ+म्=ओ+म् |
| तपः+बल=तप+उ+बल=तपोबल. | अः+ब्=अ+उ+ब्=ओ+ब् |

(१) नियमः—विसर्गापूर्वी अ, व पुढें मृदु व्यंजन आलें असतां विसर्गाचा उ होतो; आणि तो उ व मागील अ मिळून ओ असा दोहोंचा संधि होतो.

## कोष्टक दुसरें.

विसर्गापूर्वी अ, आ, खेरीज करून कोणताही स्वर असून पुढें मृदु व्यंजन किंवा एखादा स्वर आला असतां संधि कसे होतात तें पुढील कोष्टक पाहून सांगा.

| उदाहरणें | निरीक्षण. |
| --- | --- |
| आशी:+वाद=आशीर्वाद. | ई:+वा=ईर्+वा. |
| धनु:+बाण=धनुर्बाण, | उ:+बा=उर्+बा. |
| दु:+आग्रह=दुराग्रह, | उ +आ=उर्+आ. |
| नि:+अक्षर=निरक्षर, | इ:+अ=इर्+अ. |

नियमः—विसर्गापूर्वी अ, आ खेरीजकरून कोणताही स्वर असून पुढें मृदु व्यंजन अथवा स्वर आल्यास विसर्गाचा र् होतो.

## कोष्टक तिसरें.

विसर्गापुढें च्, ट् त् हीं कठोर व्यंजनें आलीं असतां संधि कसे होतात तें खालील कोष्टकांत पहा.

| उदाहरणें. | निरीक्षण व नियम. |
| --- | --- |
| दु:+चिन्ह=दुश्चिन्ह.<br>नि:+चित=निश्चित.<br>नि:+तेज=निस्तेज.<br>अध:+तल=अधस्तल.<br>दु +टीक=दुष्टीक | नियमः—(३) विसर्गापुढें च्, ट्, त् हीं कठोर व्यंजन आल्यास विसर्गाबद्दल श्, ष्, स्, हीं व्यंजनें अनुक्रमें येतात. |

## अभ्यास.

**(१) पुढील संधि सोडवा:—**

मनोराज्य; दुर्वर्तन; धनुर्विद्या; निर्गुण; अधोगति; पयोमुख; यशोधन; तपोधन.

**(२) पुढील संधि करा:—**

तप:+चर्या; शुचि :+भूत; नि:+उत्तर; दु:+बोध; हवि:+भाग; नभ:+तल; पुर:+गामी.

# खंड तिसरें.

## नामविचार.

### धडा पहिला.

### नामांच्या जाति.

**नाम म्हणजे काय ?**

ज्या विकारी शब्दांचा वस्तूंना नांवें देण्याचे कामीं उपयोग होतो त्या शब्दांना नामें* असें म्हणतात; जसें:—रामा, घर, फूल, पांखरूं.

( अ ) वरील व्याख्येचा नीट विचार करा.

( १ ) नाम हा शब्द आहे. 'परंतु', 'आणि' हेही शब्दच आहेत; हे सर्व शब्द नामेंच आहेत काय ?

( २ ) इतर जातींच्या शब्दांपासून नाम निराळें दाखविण्याकरितां नाम हा शब्द एक विकारी शब्द आहे असें म्हटलें आहे. आण, ये, हे शब्दही विकारी आहेत; मग हीं नामेंच आहेत काय ?

( ३ ) इतर विकारी शब्दांपासून नाम निराळें दाखविण्याकरितां ज्या विकारी शब्दांचा वस्तूंना नांवें देण्याचे कामीं उपयोग होतो, त्या शब्दांना नामें असें म्हणतात, अशी व्याख्या केली आहे.

---

*नाम हा शब्द संस्कृत भाषेंतील असून त्याचा अर्थ नांव असा आहे.

( आ ) वरील व्याख्येमध्यें **वस्तु** हा शब्द कोणत्या अर्थानें वापरला आहे त्याचा विचार करा.

( १ ) आपल्या साध्या बोलण्यामध्यें आपण **वस्तु** हा शब्द बहुतकरून डोळ्यांना दिसणारे पदार्थ या अर्थानें वापरतो. परंतु,

( २ ) वरील व्याख्येमध्यें आपण **वस्तु** या शब्दाला पुष्कळ मोठा अर्थ दिलेला आहे. **वस्तु** या शब्दाच्या अर्थामध्यें सर्व पदार्थ, प्राणी व त्यांचे ठिकाणीं असणारे गुण किंवा धर्म या सर्वांचा अंतर्भाव होतो. व्याकरणशास्त्रामध्यें **सोनें, उंट, हवा, आकाश, साखर, गोडी, पांढरेंपणा, स्वच्छता, मेंदू, मन,** इत्यादि सर्व शब्द **वस्तूंचींच** नांवें आहेत असें मानितात.

## अभ्यास.

**( १ ) खालीलप्रमाणें नामांच्या व्याख्या केल्या तर त्यांत कोणत्या शब्दांचा अंतर्भाव होईल व कोणत्या शब्दांचा होणार नाहीं ?**

( अ ) नाम म्हणजे शब्द. ( ब ) नाम म्हणजे विकारी शब्द.

**( २ ) दहा दृश्य वस्तूंचीं नामें सांगा.** दहा अदृश्य **वस्तूंचीं,** व **दहा गुणांचीं नांवें सांगा.**

## नामांचें वर्गीकरण.

नामांचे मुख्य दोन प्रकार आहेतः—[ १ ] **धर्मिवाचक** अथवा **वस्तुवाचक नामें** व [ २ ] **धर्मवाचक** अथवा **भाववाचक नामें.**

**१. ज्या नामांचा वस्तूंचे किंवा पदार्थांचे ठिकाणीं असलेल्या गुणांना किंवा धर्मांना नांवें देण्याचे कामीं उपयोग होतो त्या नामांना धर्मवाचक नामें किंवा भाववाचक नामें असें म्हणतात.**

जसेंः—**चांगुलपणा, उंची, गोडी, दया, स्वच्छता.**

(२) ज्या नामांचा वस्तूंना किंवा पदार्थांना नांवें देण्याचे कामीं उपयोग होतो, त्या नामांना धर्मिवाचक* अथवा वस्तुवाचक नामें म्हणतात; जसें:—रामा, कृष्णा, बैल, घर.

टीपः—वरील व्याख्येचा नीट विचार करा.

(अ) नामाचा उपयोग वस्तूंना नावें देण्याच्या कामीं होतो.

(ब) 'वस्तु' या शब्दाला व्याकरणशास्त्रांत दिलेल्या व्यापक अर्थानें वस्तूंचे धर्मी आणि धर्म असे दोन भेद होतात.

(क) धर्मींना नावें देण्याचें कामीं उपयोग होणाऱ्या नामांना धर्मिवाचक नामें अशी संज्ञा देऊन धर्मांना नावें देण्याचें कामीं उपयोग होणाऱ्या नामांना धर्मवाचक नामें अशी संज्ञा दिली आहे. याप्रमाणें वस्तूंच्या दोन भेदांस अनुसरून नामांचें दोन भेद केले आहेत.

(३) धर्मिवाचक नामांचे सामान्यनाम व विशेषनाम असे दोन प्रकार आहेत.

एखादी वस्तु अमुक जातीची किंवा अमुक प्रकारची आहे म्हणून तिला जें नांव दिललें असतें त्या नांवाला सामान्यनाम असें म्हणतात; जसें:—दिवा, पुस्तक, मनुष्य, पोपट.

एकाच जातीच्या पुष्कळ वस्तूंहून अमुक एक वस्तु निराळी ओळखतां यावी म्हणून त्या वस्तुला जें स्वतंत्र नांव दिलेलें असतें त्या नांवाला विशेषनाम असें म्हणतात;जसें:-कृष्णा, इंग्लंड, नागपूर.

सामान्यनाम व विशेषनाम यांचेमध्यें असलेलें साम्य व फरक कोणते आहेत ते सांगा व ते बरोबर आहेत कीं नाहींत तें खालील कोष्टकाशीं ताडून पहा.

---

*या व्याख्येमध्यें धर्मी हा शब्द थोडा कठीण आहे, ज्याचे ठिकाणीं किंवा ज्याला लोभ आहे तो लोभी; तसेंच ज्याचे ठिकाणीं किंवा ज्याला धर्म म्हणजे गुण आहेत तो धर्मी. धन, धनी; मान, मानी; पाप, पापी; या जोड्याप्रमाणेंच धर्म, धर्मी; ही सुद्धां एक जोडी आहे.

| सामान्यनाम. | विशेषनाम. |
| --- | --- |
| (१) सामान्यनाम **धर्मिवाचक** असतें. | (१) विशेषनामही **धर्मिवाचक** असतें. |
| (२) सामान्यनाम हें जातिवाचक आहे; म्हणजे तें एकाच जातीच्या वस्तूंना दुसऱ्या जातीच्या वस्तूंहून भिन्न करून दाखविण्याकरितां दिलेलें असतें. | (२) विशेषनामही हें **व्यक्तिवाचक** आहे; म्हणजे तें एका वस्तूला त्या जातीच्या दुसऱ्या वस्तूंहून भिन्न करून दाखविण्याकरितां दिलेलें असतें. |
| (३) सामान्यनामाचें **अनेकवचन होऊं शकतें.** | (३) विशेषनामाचें **अनेकवचन होऊं शकत नाहीं.** |
| (४) एखाद्या वस्तूला सामान्यनाम देतांना ती वस्तु त्या जातीची आहे कीं नाहीं याचा विचार करावा लागतो. | (४) एखाद्या वस्तूला कोणतें विशेषनाम द्यावें हे देणाऱ्यांच्या केवळ इच्छेवर अवलंबून असतें. |

## विशेषनामांचा सामान्यनामांप्रमाणें उपयोग.

वरील कोष्टकामध्यें विशेषनामाचें अनेकवचन होऊं शकत नाहीं असें म्हटलें आहे. परंतु खालीं दाखविल्याप्रमाणें लोक पुष्कळ वेळां विशेषनामाचें अनेकवचन करितात.

(१) अमेरिकेमध्यें असले पुष्कळ **कर्ण** आहेत.

(२) या वर्गांत एकंदर पांच **विष्णु** आहेत; त्यांतला तुला कोणता पाहिजे ?

वरील उदाहरणांपैकीं पहिल्या उदाहरणामध्यें **कर्ण** याचा अर्थ काय? **कर्ण** हें नांव ज्याला होतें त्याचे अंगीं असलेला उदारपणा ज्या ज्या पुरुषांचे अंगीं असेल त्या त्या सर्व पुरुषांना **कर्ण** असें नांव वरील वाक्यांत दिलें आहे.

**विष्णु** हें नांव विशेषनाम आहे खरें; परंतु एकाच नांवाचे जेव्हां पुष्कळ मुलगे असतात तेव्हां ते सर्व त्याच नांवानें ओळखले जात असल्यामुळें विष्णु या नामाचा अनेकवचनीं प्रयोग झाला.

याप्रमाणें विशेषनामाचें जेव्हां अनेकवचन होतें तेव्हां तें एका वस्तूचें स्वतंत्र नांव न राहतां तें त्या त्या **गुणांच्या सर्व वस्तूंना** लागतें, म्हणून अशा प्रसंगीं त्याला विशेषनाम न म्हणतां सामान्यनाम म्हटलें पाहिजे.

## सामान्यनामांचा विशेषनामांप्रमाणे उपयोग.

वरील उदाहरणांमध्यें मूळचीं विशेषनामें मागाहून सामान्यनामें बनलीं आहेत. आतां खालील उदाहरणें पहा.

(१) हिमालय (हिम+आलय) म्हणजे बर्फाचें घर. ज्या ज्या ठिकाणीं बर्फ असेल त्या त्या ठिकाणाला पूर्वी हिमालय असेंच नांव देत; परंतु कालान्तरानें तें एका पर्वताचें स्वतंत्र नांव होऊन बसलें आहे.

या प्रकारचीं दुसरीं उदाहरणें:—मध्यप्रांत, महानदी, शास्त्री, वाघमारे, फडणवीस, सुभेदार, कुसुम, कुमुद, चंपा.

हीं नामें मूळचीं सामान्यनामें होतीं. परंतु कालांतरानें त्यांचा विशेषनामांप्रमाणें उपयोग होऊं लागला.

(२) मी देवावर विश्वास ठेवतों. या वाक्यांत विश्वास हा शब्द मनाचा गुण अथवा धर्म दाखवीत असल्यामुळे तें धर्मवाचचक नाम आहे.

विश्वास चांगला मुलगा आहे. या वाक्यात विश्वास हा शब्द विशेषनाम आहे. या प्रकारचीं दुसरीं उदाहरणें:—आनंद, शांति, मुक्ति, (मुक्ताबाई) धर्म.

### अभ्यास.

(१) सामान्यनाम, भाववाचकनाम व विशेषनाम यांच्या व्याख्या सांगून प्रत्येकाचीं दहा दहा उदाहरणें द्या.

(२) सामान्यनाम व विशेषनाम यांचेमधील फरक व साम्य स्पष्ट करून दाखवा.

(३) सामान्यनामाचा व भाववाचकनामाचा विशेषनामाप्रमाण व विशेषनामाचा सामान्यनामाप्रमाणें उपयोग झाल्याचीं पांच पांच उदाहरणें द्या.

## प्रकरण दुसरें.
## नामांचे विकार.

### धडा दुसरा.
### नामांचे रूपामध्यें लिंगभेदानें होणारे विकार.

नाम हा विकारी शब्द आहे ही होष्ट आपण मागील धड्यांत पाहिली. नामांना कोणकोणते विकार होतात व ते कसे म्हणजे कोणत्या नियमांनीं होतात तें आपल्याला आतां पहावयाचें आहे.

नामांचीं वचन व विभक्ति यांस अनुसरून निरनिराळीं रूपें होतात हें आपण व्याकरण-प्रवेशिकेंत पाहिलेंच आहे. नामाला होणाऱ्या विभक्तींच्या व वचनाच्या विकारांखेरीज कांहीं नामांना तिन्ही लिंगांस अनुसरून विकार होत असतात. खालीं घोडा या नामाला होणारे विकार दाखविले आहेत त्यांवरून ही गोष्ट दिसून येईल.

**घोडा या नामाला होणारे विकार.**

| | | |
|---|---|---|
| १ | लिंगविकार | घोडा; घोडी; घोडें. |
| २ | वचनविकार | घोडा, घोडे. |
| ३ | विभक्तिविकार | घोड्यानें; घोड्यास; घोड्याला, इत्यादि. |

**घोडा या नामाला होणारे विकार.**

घोडा हें नाम पुल्लिंगी आहे. कारण घोडा या नामाचे मागें पुल्लिंगी नामांचे मागें येणारे तो हें सर्वनाम ठेवतां येतें.

**घोडी** हें नाम स्त्रीलिंगी आहे; कारण **घोडी** या नामाचे मागें स्त्रीलिंगी नामांचे मागें येणारें ती हें सर्वनाम ठेवतां येतें. **घोडी** हा शब्द स्वतंत्र नसून **घोडा** या शब्दाचें रूप आहे.

याचप्रमाणें **घोडें** हें नपुंसकलिंगी नामही **घोडा** या शब्दाचेंच रूप आहे.

**घोडा** हें नाम पुल्लिंगी आहे व त्यानें पुरुषजातीच्या प्राण्याचा बोध केला आहे.

**घोडी** हें नाम स्त्रीलिंगी आहे व त्यानें स्त्रीजातीच्या प्राण्याचा बोध केला आहे.

**घोडें** हें नाम नपुंसकलिंगी आहे, त्याचे योगाने प्राणी पुरुषजातीचा आहे कीं स्त्रीजातीचा आहे तें कांहींच कळत नाहीं.

पुल्लिंगी नामानीं पुरुषजातीच्या प्राण्यांचा बोध व्हावा, स्त्रीलिंगी नामानीं स्त्रीजातीच्या प्राण्यांचा बोध व्हावा व नपुंसकलिंगी नाम प्राणि-दर्शक असल्यास तो प्राणी पुरुषजातीचा कीं स्त्रीजातीचा आहे तें कांहींच कळूं नये हें अगदीं योग्यच आहे; परंतु निर्जीव पदार्थवाचक नामेंसुद्धा पुल्लिंगी व स्त्रीलिंगी असतात. जसें:—दिवा, दिस्तव, खांब, आंबा, फळा, टांक, हीं निर्जीव पदार्थवाचक नामें पुल्लिंगी आहेत. परंतु हीं खात्रीनें पुरुषजात दर्शवीत नाहींत. त्याचप्रमाणें पणती, विहीर, चूल, पेटी, बोंगडी, हीं नामें स्त्रीलिंगी असूनही स्त्रीजात दर्शवीत नाहींत. यांनीं दर्शविलेल्या वस्तूंचे ठिकाणीं पुरुषत्व व स्त्रीत्व केवळ मानलेलें आहे असेंच म्हटलें पाहिजे.

**घोडा** हें नाम आकारान्त आहे; त्याला ई व एं हे प्रत्यय अनुक्रमें लागले म्हणजे त्याच अर्थाचीं स्त्रीलिंगी नपुंसकलिंगी नामें तयार होतात. या प्रकारचीं आणखी कांहीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत तीं पहा.

| (१) | कुत्रा. | कुत्री. | कुत्रें. |
|---|---|---|---|
| | बकरा. | बकरी. | बकरें. |
| | कोल्हा. | कोल्ही. | कोल्हें. |
| | पोरगा. | पोरगी. | पोरगें. |
| | मुलगा. | मुलगी. | मुलगें. |

(२) कित्येक पुल्लिंगी नामांना स्त्रीलिंगाचा विकार होतांना खालीलप्रमाणें ईण हा प्रत्यय लागतो.

| | | | |
|---|---|---|---|
| वाघ. | वाघीण. | पाटील. | पाटलीण. |
| सिंह. | सिंहीण. | गवळी. | गवळीण, गवळण. |
| उंट. | उंटीण, सांडणी. | सुतार. | सुतारीण. |

(३) कित्येक आकारान्त पुल्लिंगी नामांना खालीलप्रमाणें ई हा प्रत्यय लागून त्यांचीं स्त्रीलिंगी रूपें खालीलप्रमाणें बनतात.

| | | | |
|---|---|---|---|
| देव. | देवी. | गोप. | गोपी. |
| दास. | दासी | व्याघ्र. | व्याघ्री. |
| हंस. | हंसी. | गाढव. | गाढवी. |

(४) कित्येक पुल्लिंगी नामांना आ हा प्रत्यय लागून त्यांचीं स्त्रीलिंगी रूपें खालीलप्रमाणें बनतात.

| | | | |
|---|---|---|---|
| बाल. | बाला. | क्षत्रिय. | क्षत्रिया. |
| कोकील | कोकीला | शुद्र. | शुद्रा. |

याप्रमाणे नामांस लिंगविकार होतांना जे प्रत्यय लागतात त्यांची थोडी माहिती वर दिली आहे. लिंगविकारासंबंधानें ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, वचनाचे व विभक्तिचे विकार जसे प्रत्येक नामाला होतात तसे लिंगविकार प्रत्येक नामाला होत नाहींत. प्रत्येक पुल्लिंगी नामाच्या अर्थाचें स्त्रीलिंगी नाम त्याचे रूपांत बदल होऊन बनलेंच पाहिजे असें नाहीं. खालीं पुल्लिंगी नामाच्या अर्थाचे स्त्रीवाचक शब्द दिले आहेत;

परंतु ते त्या त्या पुल्लिंगी नामांना विकार होऊनच झाले आहेत असें म्हणतां यावयाचें नाहीं.

| | | | |
|---|---|---|---|
| (५) पुरुष. | स्त्री. | रेडा. | म्हैस. |
| नवरा. | बायको. | मोर. | लांडोर. |
| बाप. | आई. | बोका. | मांजर, भाटी. |
| पुत्र. | कन्या. | खोंड. | कालवड. |
| बैल. | गाय | बोकड. | शेळी. |
| नर. | मादी. | विधुर. | विधवा. |
| वर. | वधू. | भाऊ. | बहिण. |

## अभ्यास.

(१) नामांना किती प्रकारचे व कोणकोणते विकार होतात तें उदाहरणें देऊन सांगा.

(२) पुल्लिंगी नामांना (अ) आ प्रत्यय लागून झालेलीं तीन स्त्रीलिंगी नामें; (आ) ई प्रत्यय लागून झालेलीं पांच स्त्रीलिंगी नामें व (ई) ईण प्रत्यय लागून झालेलीं दहा स्त्रीलिंगी नामें सांगा.

(३) खालीं दिलेल्या पुल्लिंगी नामांचीं स्त्रीलिंगी व स्त्रीलिंगी नामांचीं पुल्लिंगी रूपें करून दाखवा.

सासू, वधू, बोकड, पिता, बहीण, मादी, साळुणी, राणी, दीर, पत्नी, मोर.

---

### धडा तिसरा.

## वचनभेदानें नामाला होणारे विकार.

लिंगभेदानें नामाला कसकसे विकार होतात तें आपण मागील धड्यांत पाहिलें. नामानें दर्शविली जाणारी वस्तु एक आहे, पुष्कळ नाहींत, असें नामाच्या रूपावरून कळत असल्यास त्या रूपाला **एकवचनी रूप** असें नांव असून नामाच्या रूपावरून पुष्कळ वस्तु दर्शविल्या जात असल्यास त्या रूपाला **अनेकवचनी रूप** म्हणतात, हें आपण व्याकरण-प्रवेशिकेमध्यें पाहिलेंच आहे. एकवचनी नामाचें अनेकवचनी रूप कसें

होतें, किंवा वचनभेदानें नामाला कसकसे विकार होतात तें आपण या धड्यांत पाहूं.

| | |
|---|---|
| **एक पुरुष.** | **पुष्कळ पुरुष.** |
| **एक आंबा.** | **पुष्कळ आंबे.** |

**पुरुष** या नामाचें अनेकवचनीं रूप **पुरुष** असेंच होतें; परंतु **आंबा** या नामाचें अनेकवचनीं रूप मात्र **आंबे** असें होतें. **असें काय म्हणून व्हावें ?**

**पुरुष** हें नाम अकारान्त आहे. **परंतु आंबा** हें नाम मात्र आकारान्त आहे. एवढाच दोन नामामध्यें फरक दिसतो. यावरून असें दिसतें कीं अकारान्त नामांचीं अनेकवचनीं रूपें एकवचनी रूपाप्रमाणेंच राहतात आणि आकारान्त नामांचीं अनेकवचनीं रूपें एकारान्त होतात.

**पुरुष** व **आंबा** या नामांवरून असा नियम निघतो असें दिसतें खरें; परंतु **एकाच उदाहरणावरून नियम काढणें बरोबर नाहीं.** बरीचशीं अकारान्त व आकारान्त नामें घेऊन त्यांचें अनेकवचन वरील नियमाप्रमाणें होतें, इतर रीतीनें होत नाहीं असें दिसून आलें तरच वरील नियम खरा आहे, असें आपण समजूं.

खालीं अकारान्त व आकारान्त नामांचीं उभयवचनी रूपें दिलीं आहेत त्यांचें निरीक्षण करा.

| | | | |
|---|---|---|---|
| देव. | देव. | घोडा. | घोडे. |
| घर. | घरें. | बकरा. | बकरे. |
| जीभ. | जिभा. | मासा. | मासे. |
| खांब. | खांब | विद्या. | विद्या. |
| चूल. | चुली. | शाळा. | शाळा. |
| सिंह. | सिंह. | जागा. | जागा. |
| वीट. | वीटा. | कन्या. | कन्या. |

## निरीक्षण.

( १ ) वरील अकारान्त नामांपैकीं फक्त देव, खांब, व सिंह या नामांचेंच अनेकवचनी रूप एकवचनी रूपाप्रमाणें आहे. इतर नामांचीं एकारान्त, आकारान्त, एकारान्त व ईकारान्त याप्रमाणें अनेकवचनी रूपें झालीं आहेत.

यावरून अकारान्त नामांचीं अनेकवचनीं रूपें एकवचनी रूपांप्रमाणेंच असतात हा नियम खरा नाहीं हें उघड आहे. वरील उदाहरणांमध्यें ज्या अकारान्त नामांचीं अनेकवचनीं रूपें एकवचनी रूपांप्रमाणेंच झालीं आहेत, तीं सारीं नामें पुल्लिंगी आहेत. यावरून पुल्लिंगी अकारान्त नामाचीं अनेकवचनी रूपें एकवचनी रूपांप्रमाणेंच असतात हा नियम तरी निघतो काय ?

मराठी भाषेमध्यें जितकीं अकारान्त पुल्लिंगी नामें आजपर्यंतच्या सर्व व्याकरणकारांना आढळलीं तितक्या सर्वांचीं अनेकवचनीं रूपें वरील नियमांप्रमाणेंच होतात, एकही अकारान्त पुल्लिंगी नाम वरील नियमाला अपवादक असें दिसून आलें नाहीं; म्हणून हा नियम आता खरा आहे असें मानावयास हरकत नाहीं.

यावरून असें दिसून येतें कीं नामांचें अनेकवन कोणत्या नियमांनीं होतें तें ठरविण्यासाठीं ( १ ) त्या नामाचें लिंग कोणतें आहे व (२) त्या नामांचे शेवटीं कोणता स्वर आला आहे या दोन्ही गोष्टी पाहिल्या पाहिजेत. नामांचें लिंग एकच असून शेवटचे स्वर निराळे असतील तर पुरुष व आंबा या नामांप्रमाणें त्यांचीं अनेकवचनीं रूपें भिन्न प्रकारें होतील. त्याचप्रमाणें शेवटचा स्वर एकच असून नामांचीं लिंग जर निराळीं असतील तरीसुद्धां घर व जीभ या नामांप्रमाणें त्याचीं अनेकवचनी रूपें निराळीं होतील.

लिंग व शेवटचा स्वर हीं लक्षांत घेऊन पुढील नामाचें कोष्टकामध्यें वर्गीकरण करून त्यांचीं अनेकवचनी रूपें दिलीं आहेत; त्यांचें निरीक्षण करा.

## पुल्लिंगी नामें.

| एकवचन. | अनेकवचन. | अनेकवचन कसें होतें ? |
| --- | --- | --- |
| पुरुष, देव, खांब, वृक्ष, सिंह, वगैरे. अकारान्त | पुरुष, देव, खांब, वृक्ष, सिंह, वगैरे. | एकवचनप्रमाणेंच. |
| (अ) घोडा, कुत्रा, बकरा डोळा बटाटा, दिवा. आकारान्त | घोडे, कुत्रे, बकरे, डोळे, बटाटे, दिवे. | एकारान्त. |
| (आ) आजोबा, काका, मामा, दादा, बावा.* आकारान्त | आजोबा, काका, मामा, दादा, बावा, | एकवचनाप्रमाणेंच. |
| ऽकवि, गिरि, पति, ऋषि, कपि. (ऱ्हस्व) इकारान्त | कवि; कवी; गिरि, गिरी; पति, पती; ऋषि, ऋषी; | एकवचनाप्रमाणेंच किंवा (दीर्घ) ईकारान्त. |
| धोबी, माळी, हत्ती, तेली, तांबोळी. (दीर्घ) ईकारान्त | धोबी, माळी, हत्ती, तेली, तांबोळी. | एकवचनाप्रमाणेंच |
| ऽरिपु, शत्रु, गुरु, पशु. (ऱ्हस्व) उकारान्त | रिपु, रिपू; शत्रु, शत्रू; गुरु, गुरू; पशु, पशू; | एकवचनाप्रमाणेंच किंवा (दिर्घ) ऊकारान्त. |
| लाडू, गहूं, पेरू, गडू, भोंदू, साडू (दीर्घ) ऊकारान्त | लाडू, गहूं, पेरू, गडू, भोंदू, साडू. | एकवचनाप्रमाणेंच. |
| दामले, भावे, परचुरे, गोखले. एकारान्त | दामले भावे, परचुरे, गोखले. | एकवचनाप्रमाणेंच. |
| धनको, ऋणको, ओकारान्त | धनको, ऋणको. | एकवचनाप्रमाणेंच. |

### कोष्टकाचा अभ्यास

[१] कोणत्या पुल्लिंगी नामाचीं एकवचनी व अनेकवचनी रूपें सारखींच असतात ?

[२] (अ) आकारान्त पुल्लिंगी नामांचें अनेकवचन कसें होतें ?

(आ) कोणत्या प्रकारच्या आकारान्त पुल्लिंगी नामांचें अनेकवचन एकवचनाप्रमाणेंच असतें ?

*हे सर्व शब्द नातें दर्शविणारे आहेत.

ऽहे सर्व संस्कृत शब्द आहेत. ऱ्हस्व इकारान्त किंवा ऱ्हस्व उकारान्त मराठी नामें आढळत नाहींत. हीं नामें एकवचनीं ऱ्हस्व व अनेकवचनीं बहुतकरून दीर्घ लिहिण्याकडे विशेष प्रवृत्ति दिसून येते.

## स्त्रीलिंगी नामें.

| एकवचन. | अनेकवचन. | अनेकवचन कसें होतें? |
|---|---|---|
| (अ) रेघ, जीभ, सून, दाढ, चिंच, वाट, | रेघा, जिभा, सुना, दाढा, चिंचा, वाटा. | आकारान्त. |
| (आ) भिंत, पंगत, मूठ, रीत, जात, चिंहार. | भिंती, पंगती, मुठी, रिती, जाती, चिहिरी. | ईकारान्त. |
| (इ) शाळ, परात, करमणूक. (अकारान्त) | शाला किंवा शाळी, पराता, किंवा पराती, करमणुका किंवा करमणुकी. | आकारान्त किंवा ईकारान्त. |
| शाळा, भाषा, आज्ञा, निंदा, आशा. (आकारान्त) | शाळा, भाषा; आज्ञा, निंदा, आशा. | एकवचनाप्रमाणेंच. |
| मति, गति, जाति. (ऱ्हस्व) इकारान्त (संस्कृत) | मति किंवा मती, गति, किंवा गती, जाति किंवा जाती. | एकवचनाप्रमाणेंच किंवा ईकारान्त |
| (अ) नदी, काठी, चुकती, पोथी, भाजी, लेखणी, बाई. | नद्या, काठ्या, चुकत्या, पोथ्या, भाज्या, लेखण्या, बाया. | याकारान्त. |
| (आ) दासी, गोपी, युवती. | दासी, गोपी, युवती. | एकवचनाप्रमाणेंच. |
| (इ) धी, स्त्री, (एकाक्षरी) (दीर्घ) ईकारान्त | धिया, स्त्रिया. | |
| तनु, धेनु, चंचु. (ऱ्हस्व) उकारान्त (संस्कृत) | तनु, धेनु, चंचु. तनू, धेनू चंचू, | एकवचनाप्रमाणच किंवा ऊकारान्त. |
| (अ) सासू, पिसू, जळू, दारू, जाऊ, | सासु, सासवा, सास्वा; पिसु, पिसवा, पिस्वा, जावा, इत्यादि, | ऊकारान्त किंवा वाकारान्त. |
| (आ) काकू, अब्रू, चमू, वधू, ऊकारान्त. | काकू, अब्रू, चमू, वधू | एकवचनाप्रमाणच |
| आत, अकारान्त | आता, | आकारान्त. |
| तिवै, पै. ऐकारान्त | तिवया, पया, | याकारान्त. |
| बायको, ओकारान्त. | बायका, | आकारान्त. |

## प्रश्न.

(१) कोणत्या स्त्रीलिंगी नामांचीं एकवचनी व अनेकवचनी रूपें सारखींच असतात ?

(२) अकारान्त व [ दीर्घ ] ईकारान्त स्त्रीलिंगी नामांचें अनेकवचन किती प्रकारांनीं होतें ?

(३) कोणत्या स्त्रीलिंगी नामांचें अनेवकचन दोन प्रकारांनीं होतें ?

(४) [ ऱ्हस्व ] इकारान्त स्त्रीलिंगी नामांचीं पांच उदाहरणें द्या.

## नपुंसकलिंगी नामें.

| एकवचन. | अनेकवचन. | अनेकवचन कसें होतें? |
|---|---|---|
| घर, पान, वस्त्र, बोर, घड्याळ, अकारान्त. | घरें, पानें, वस्त्रें, बोरें, घड्याळें. | एंकारान्त (वर अनुस्वार) |
| आकारान्त नपुंसकलिंगी नामें मराठी भाषेत आजपर्यंत आढळून आलीं नाहींत. | | |
| मोतीं, मिरीं, ईकारान्त. [ वर अनुस्वार ] | मोत्यें, मिऱ्यें. | येंकारान्त (वर अनुस्वार) |
| [ अ ] लिंबूं, गुरूं, लेकरूं, वासरूं. | लिंबें, गुरें, लेकरें, वासरें. | एंकारान्त. (वर अनुस्वार) |
| [ आ ] तारूं, गळूं, आसूं. ऊकारान्त [ वर अनुस्वार ] | तारवें, तावें, गळवें, गळवें, आसवें, आस्वें. | वेंकारान्त (वर अनुस्वार) |
| केळें, तळें, मडकें, बोलणें, तोंडलें. एंकारान्त [ वर अनुस्वार ] | केळीं, तळीं, मडकीं, बोलणीं, तोंडलीं. | ईंकारान्त. (वर अनुस्वार) |

टीप:— एकवचनी अकारान्त नपुंसकलिंगी नामें खेरीज करून बाकीच्या सर्व नपुंसकलिंगी एकवचनी व अनेकवचनी नामांवर [ प्रथमा विभक्तीमध्यें ] अनुस्वार असतो.

## धडा चवथा.

## विभक्तिप्रत्ययांनीं नामांना होणारे विकार.

लिंग आणि वचन यामुळें नामाला कोणकोणते विकार होतात व ते कोणत्या नियमांनीं होतात हें आपण मागील धड्यांमध्यें पाहिलेंच आहे. विभक्तिप्रत्यय लागून नामाला कोणकोणते विकार होतात तें आपणाला या धड्यात पहावयाचें आहे.

**घर** हें नाम खालीं सर्व विभक्तींत चालवून दाखविलें आहे, त्याप्रमाणें **आंबा, वाघ, फळ** व **नदी**, हीं नामें चालवून दाखवा.

| विभक्तीचें नांव. | एकवचन. | अनेकवचन. |
| --- | --- | --- |
| प्रथमा | घर. | घरें. |
| [*द्वितीया] | घरास, घराला. | घरांस, घरांला, घरांना. |
| तृतीया | घरानें, घराशीं. | घरांनीं, घरांशीं. |
| चतुर्थी | घरास, घराला. | घरांस, घरांला, घरांना. |
| पंचमी | घरून, घराहून. | घरून, घरांहून. |
| षष्ठी | घराचा-ची-चें-चे-च्या-चीं. | घरांचा-ची-चें-चे-च्या-चीं. |
| सप्तमी | घरीं, घरात. | घरीं, घरांत. |
| संबोधन | अरे, घरा. | अहो घरांनों. |

*संस्कृत भाषेमध्ये प्रथमा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, सप्तमी व संबोधन अशा आठ विभक्ति असुन प्रत्येक विभक्तीचे निरनिराळे प्रत्ययही आहेत. मराठी भाषेचे आद्य व्याकरणकार दादोबा यांनींही मराठी भाषेमध्ये आठच विभक्ति मानिल्या. परंतु द्वितीया विभक्तीला स्वतःचे असे प्रत्यय नसल्यामुळे दादोबांनी अशी तोड काढली कीं चतुर्थी विभक्तीचा अर्थ जेव्हां कर्म असेल तेव्हां तिला द्वितीया विभक्ति मानावी. शास्त्रीय व्याकरणकार दामले यांचे असें म्हणणें आहे कीं विभक्ति ही नामाला होणारा विकार आहे व तो विकार प्रत्ययांनीं दर्शविला जातो. द्वितीया विभक्तीचे स्वतंत्र असे प्रत्ययच जर मराठी भाषेंत नाहींत तर द्वितीया विभक्ति मानणें ह्यांचें मतें रास्त नाहीं. या कारणाकरितां द्वितीया विभक्ति कंसात दर्शविली आहे.

## निरीक्षण.

( १ ) **घर** या नामाच्या विभक्तिरूपांचें निरीक्षण केलें असतां निरनिराळ्या विभक्तींचे प्रत्यय खालीलप्रमाणें असल्याचें दिसून येतें.

| | | |
|---|---|---|
| प्रथमा. | ( शब्दाचें मूळरूप ) | ( अनियमित, वचनविचार पहा. ) |
| ( द्वितीया ). | स, ला. | स, ला, ना. |
| तृतीया. | नें, शीं. | नीं, शीं. |
| चतुर्थी. | स, ला. | स, ला, ना. |
| पंचमी. | ऊन, हून. | ऊन, हून. |
| षष्ठी. | चा, ची, चें; चे, च्या, चीं. | चा, ची, चें, चे, च्या, चीं. |
| सप्तमी | ईं, त. | ईं, त. |

**टीप:**—सप्तमी विभक्तीचा त हा प्रत्यय लागण्यापूर्वी सामान्यरूपाच्या अन्त्याक्षरावर अनुस्वार येतो.

( २ ) **घर** या नामाचें एकवचनी सामान्यरूप **घरा** असें होतें, व अनेकवचनी सामान्यरूप **घरां** असें ( एकवचनी सामान्यरूपावर अनुस्वार येऊन ) होतें. **विभक्तिप्रत्यय लागण्यापूर्वी नामाच्या रूपांत फेरफार होऊन त्याचें जें नवें रूप होतें त्यास सामान्यरूप असें म्हणतात.**

निरनिराळ्या नामांचीं निरनिराळ्या प्रकारांनीं सामान्यरूपें होतात. नामाचें सामान्यरूप कोणत्या प्रकारें होतें तें ठरविण्यासाठीं त्या नामाचें लिंग कोणतें आहे व त्याचा अन्त्यस्वर कोणता आहे तें पहावें लागतें.

खालील कोष्टकांमध्यें लिंग व अन्त्यस्वर यांस अनुसरून नामांचें वर्गीकरण करून त्यांचीं सामान्यरूपें दिलीं आहेत त्यांचें नीट निरीक्षण करा.

# पुल्लिंगी नामांचें सामान्यरूप.

| नामें. | एकवचनी सामान्य-रूप कसें होतें ? | अनेकवचनी सामान्य-रूप कसें होतें ? |
| --- | --- | --- |
| देव, पुरुष, बाप, खांब, सिंह, वृक्ष. अकारान्त. | देवाचा, पुरुषाचा, बापाचा, खांबाचा सिंहाचा, वृक्षाचा आकारान्त. | देवांचा, पुरुषांचा, बापांचा, खांबांचा, सिंहांचा, वृक्षांचा. एकवचनी सा रूपावर अनुस्वार देऊन. |
| घोडा, कुत्रा, बकरा, डोळा, आंबा, बटाटा. (१) आकारान्त. | घोड्यानें, कुत्र्याला, बकऱ्याशीं, डोळ्याचा. याकारान्त | घोड्यांनीं, कुत्र्यांना, बकऱ्यांना, डोळ्यांचा. एकवचनी सा. रूपावर अनुस्वार देऊन. |
| दादा, मामा, बाबा, काका, (२) आकारान्त | दादाला, मामाला, बाबाला, काकाला आकारान्त. | दादांना, मामांना, बाबांना, काकांना. एकवचनी सा रूपावर अनुस्वार देऊन |
| धोबी, माळी, शास्त्री, तेली. (१) ईकारान्त. | धोब्यानें, माळ्यानें, शास्त्र्यानें तेल्यानें. याकारान्त. | धोब्यांनीं, माळ्यांनीं, शास्त्र्यांनीं, तेल्यांनीं एकवचनी सा. रूपावर अनुस्वार देऊन. |
| हत्ती, नंदी, वादी, काजी, असामी (२) ईकारान्त. | हत्तीला, नंदीला, वादीला, काजीला, असामीला. ईकारान्त. | हत्तींना, नंदींना, काजींना, वादींना असामींना. एकवचनी सा. रूपावर अनुस्वार देऊन. |
| कवि, यति. (ऱ्हस्व) इकारान्त. | कवीनें, यतीचा. (दीर्घ) ईकारान्त | कवींनीं यतींचीं. एकवचनी सा रूपावर अनुस्वार देऊन. |
| साधु, गुरु, भानु. (ऱ्हस्व) उकारान्त. | साधूला, गुरूचा, भानूनें, (दीर्घ) ऊकारान्त. | साधूंना, गुरूंचा, भानूंनीं. एकवचनी सा. रूपावर अनुस्वार देऊन. |

| नामें. | एकवचनी सामान्यरूप कसें होतें ? | अनेकवचनी सामान्यरूप कसें होतें ? |
|---|---|---|
| गंहू, भाऊ, नातू, वेळू. (दीर्घ) ऊकारान्त | गव्हास, भावाचा, नातवानें, वेळवानें. वाकारान्त | गव्हास, भावांचा, नातवांना, वेळवांनीं. एकवचनी सा. रूपावर अनुस्वार देऊन. |
| चाकू, भाऊ, वेळू. (दीर्घ) ऊकारान्त | चाकूनें, भाऊनें, वेळूनें. (दीर्घ) ऊकारान्त | चाकूंनीं, भाऊंनीं, वेळूंनीं. एकवचनी सा. रूपावर अनुस्वार देऊन. |
| दामले, साठे, देशपांडे. एकारान्त. | दामलेनें, दामल्यानें, साठेला, साठ्याला, देशपांडेचा, देशपांडयाचा. याकारान्त किंवा एकारान्त | दामल्यांनीं, साठ्यांनीं, देशपांडयांनीं. याकारान्त व वर अनुस्वार देऊन. |
| धनको, ऋणको; टाहो ओकारान्त | धनकोला, ऋणकोला, टाहोचा, ओकारान्त. | धनकोंना, ऋणकोंनीं, टाहोंचा ओकारान्त व वर अनुस्वार देऊन. |

## स्त्रीलिंगी नामांचें सामान्यरूप

| नामें. | एकवचनी सामान्यरूप कसें होतें ? | अनेकवचनी सामान्यरूप कसें होतें ? |
|---|---|---|
| जीभ, वीट, चिंच, रेघ (१) अकारान्त | जिभेला, विटेचा, चिंचेनें, रेघेहून. एकारान्त. | जिभांनीं, विटांचा, चिंचांनीं रेघांहून. आकारान्त व वर अनुस्वार. |
| भिंत, मूठ, सवत, विहीर. (२) अकारान्त | भिंतीला, मुठीनें, सवतीचा, विहिरीहून. ईकारान्त. | भिंतींना, मुठींनीं, सवतींचा, विहिरींहून. ए. व. सा. रूपावर अनुस्वार देऊन. |
| शाल, परात, तरवार. (३) अकारान्त. | शालेला, शालीला, परातीचा, परातेचा, तरवारीचा तरवारेचा. एकारान्त किंवा ईकारान्त. | शालांना, शालींना; परातांचा, परातींचा, तलवारांचा, तलवारींचा. आकारान्त किंवा ईकारान्त व वर अनुस्वार. |

| नामें. | एकवचनी सामान्यरूप कसें होतें ? | अनेकवचनी सामान्यरूप कसें होतें ? |
|---|---|---|
| माता, जिव्हा, भाषा, कथा. | मातेला, जिव्हेचा, भाषेनें, कथेत. | मातांना, जिव्हांचा, भाषांनीं, कथांत. |
| आकारान्त. | एकारान्त. | आकारान्त व अनुस्वार. |
| मति, युक्ति, भक्ति. | मतीला युक्तीने, भक्तीने. | मतींनीं युक्तींनीं, भक्तींनीं. युक्त्यांनीं |
| (ह्रस्व) इकारान्त. | (दीर्घ) ईकारान्त. | (१) ए. व. सा. रूपावर अनुस्वार देऊन; (२) कित्येक नामांचें आकारान्त व वर अनुस्वार. |
| नदी, दासी, पेटी, घोडी. | नदींत, दासीचा, पेटीला, घोडीनें. | नद्यांत, दासींचा, पेट्यांना, घोड्यांना. |
| (दीर्घ) ईकारान्त. | ईकारान्त. | याकारान्त व वर अनुस्वार (२) कित्येक नामांचें ईकारान्त व वर अनुस्वार. |
| अब्रू, काकू, चमू, वधू. | अब्रूला, काकूचा, चमूने, वधूनें. | अब्रूंना, काकूंचा, चमूंना, वधूंनीं. |
| (दीर्घ) ऊकारान्त | (दीर्घ) ऊकारान्त. | ए. व. सा. रूपावर. अनुस्वार. |
| सासू, जाऊ, जळू | (१) सासूने, जाऊनें. जळूनें. (२) सासवेने, जळवेनें, जळवेनें. (३) सास्वेनें. जळवेने. | (१) सासूंनीं, जाऊंनीं, जळूंनीं. (२) सासवांनीं, जावांनीं, जळवांनीं. (३) सास्वांनीं, जळवांनीं, |
| (दीर्घ) ऊकारान्त. | ऊकारान्त किंवा एकारान्त. | ऊकारान्त किंवा वाकारान्त व वर अनुस्वार. |
| आते. | आतेनें. | आतांनीं. |
| एकारान्त. | एकारान्त | आकारान्त व वर अनुस्वार. |
| तिवै, पै.. | तिवैनें. पैनें. | तिवयांना पयांनीं. |
| ऐकारान्त. | ऐकारान्त. | याकारान्त व वर अनुस्वार. |
| बायको. | बायकोनें. | बायकांनीं. |
| ओकारान्त. | ओकारान्त. | आकारान्त व वर अनुस्वार. |

## नपुंसकलिंगी नामांचें सामान्यरूप.

| | | |
|---|---|---|
| घर, पान, घड्याळ, अकारान्त. | घराला, पानाला, घड्याळानें, आकारान्त | घरांना, पानांचा घड्याळांनीं ए. व. सा. रूपावर अनुस्वार देऊन. |
| मोतीं, मिरीं. ईकारान्त | मोत्याचा, मिऱ्यानें. याकारान्त | मोत्यांचा मिऱ्यांनीं, ए. व. सा रूपावर अनुस्वार देऊन. |
| लिंबूं, गुरूं, लेकरूं, वासरूं, १ उंकारान्त | लिंबाला, गुराला; लेकराला; वासराला. आकारान्त | लिंबांना, गुरांना, लेकरांना, वासरांना. ए. व. सा. रूपावर अनुस्वार देऊन. |
| तारूं, असूं, गळूं, २ ऊंकारान्त | तार्वाला; तारवाला; अस्वानें; अस्वानें; गळ्वाचा, गळवाचा. वाकारान्त | तार्वांना, तारवांना; अस्वांनीं, अस्वांनीं; गळ्वांचा, गळवांचा. ए. व. सा. रूपावर अनुस्वार देऊन. |
| केळें, तळें, मडकें, घोसाळें, बोलणें, एंकारान्त | केळयाला, तळयाशीं मडक्याचा, घोसाळ्याची; बोलण्यानें. याकारान्त | केळयांना, तळयांशीं मडक्यांचा घोसाळ्यांचीं, बोलण्यांनीं ए. व. सा. रूपावर अनुस्वार देऊन. |

### अभ्यास.

१. खालील प्रश्नांचीं उत्तरें तिन्ही कोष्टकांचें निरीक्षण करून सांगा.

[१] कोणकोणत्या नामांचें एकवचनीं सामान्यरूप आकारान्त असतें ?
[२] ,, ,, ,, ,, ईकारान्त ,,
[३] ,, ,, ,, ,, ऊकारान्त ,,
[४] ,, ,, ,, ,, एकारान्त ,,
[५] ,, ,, ,, ,, ओकारान्त ,,
[६] ,, ,, ,, ,, वाकारान्त ,,
[७] ,, ,, ,, ,, याकारान्त ,,

२. कोणत्या नामांचें अनेकवचनी सामान्यरूप एकवचनी सामान्यरूपावर अनुस्वार देऊन होतें ?

[ ३ ] कोणत्या नामांचें अनेकवचनी सामान्यरूप एकवचनी सामान्यरूपाहून भिन्न असतें?

---

धडा पांचवा

## लिंग, वचन व विभक्ति यांच्या व्याख्या.

नामांना लिंग, वचन आणि विभक्ति यांचे विकार कसकसे होतात तें आपण मागील तीन धड्यांत पाहिलें. हे विकार नामांना होण्याचें कारण काय?

( १ ) नामानें दर्शविली जाणारी वस्तु एक आहे कीं त्या पुष्कळ आहेत तें दाखविण्यासाठीं नामाच्या रूपांत जो फरक होतो तो नामाला होणारा वचनविकार होय जसें:—घोडा, घोडे.

( २ ) नामानें दर्शविल्या जाणाऱ्या वस्तूचे ठिकाणीं प्रत्यक्ष अथवा काल्पनिक पुरुषत्व, स्त्रीत्व अथवा उभयभिन्नत्व दाखविण्याकरितां नामाचे रूपामध्यें जो फरक होतो तो नामाला होणारा लिंगविकार होय. जसें:—घोडा, घोडी, घोडें.

( ३ ) आतां याशिवाय नामाला जे विभक्तीचे पुष्कळ विकार होतात ते कशाकरितां? उदाहरणार्थ, घर या शब्दाला घरीं असा जो सप्तमीचा विकार झाला तो कशाकरितां?

| | |
|---|---|
| तो घरीं गेला. | या वाक्यांत घर आणि जाण्याची क्रिया यांचेमध्यें असलेला संबंध दाखविण्याकरितां घर या नामाला घरीं असा सप्तमीचा विकार झाला आहे. |
| तो शरीरानें बळकट आहे. | या वाक्यांत शरीर आणि बळकट यांचेमध्यें असलेला संबंध दर्शविण्याकरितां शरीर या नामाला शरीरानें असा विकार झाला आहे. |

वरील वाक्यांमध्यें घर व शरीर या नामांना, त्याचा अनुक्रमें गेला व कळकट या शब्दांशीं असलेला संबंध व्यक्त करून दाखविण्याकरितां घरीं व शरीरानें असे विकार झालेले आहेत. याप्रमाणें आपण इतर वाक्यांचें निरीक्षण केलें असतां आपल्याला असेंच दिसून येईल कीं नामाचा वाक्यांतील इतर शब्दांशीं संबंध दर्शविण्याकरितां नामाला विभक्तीचे विकार होत असतात.

व्याख्याः नामाचा वाक्यांतील इतर शब्दांशीं संबंध दाखविण्याकरितां नामाला जे विकार होतात त्यांना विभक्ति असें म्हणतात.

**अभ्यास.**

[ १ ] नामाला वचनविकार होण्याचें कारण काय ?
[ २ ] नामाला लिंगविकार होण्याचें कारण काय ?
[ ३ ] नामाला विभक्तिविकार होण्याचें कारण काय ?

---

## धडा सहावा.

## वाक्यांतील क्रियापदाशीं नामाचे असणारे संबंध.

**( अ ) रामानें गाईला काठीनें मारिलें.**

( १ ) या वाक्यांत **रामानें** या नामाचा **मारिलें** या क्रियापदाशीं संबंध आहे. **रामा** या नामाची **रामानें** अशी तृतीया विभक्ती करून तो संबंध व्यक्त केला आहे.

( २ ) **गाईला** या नामाचाही **मारिलें** या क्रियापदाशींच संबंध आहे **गाय** या नामाची **गाईला** चतुर्थी विभक्ति करून तो संबंध व्यक्त केला आहे.

( ३ ) **काठीनें** या नामाचाही **मारिलें** या क्रियापदाशींच संबंध आहे. काठी या नामाची **काठीनें** अशी तृतीया विभक्ति करून तो संबंध व्यक्त केला आहे.

याप्रमाणें **रामानें, गाईला** व **काठीनें** या तीनही शब्दांचे **मारिलें** या क्रियापदाशींच संबंध आहेत. हे सर्व **संबंध एकाच प्रकाराचे आहेत काय ?**

नाहींत. **रामा** हा **मारणें** या क्रियेचा कर्ता आहे. **काठी** हें **मारणें** या क्रियेचें साधन आहे. **गाय** या प्राण्यावर मारण्याची क्रिया घडली आहे. हे तीन संबंध निरनिराळ्या प्रकारचे आहेत, म्हणून त्यांना आपण **कर्तृसंबंध, कर्मसंबंध** व **करणसंबंध** अशीं नावें देऊं. खालीं रेषांचे साहाय्यानें हे संबंध स्पष्ट करून दाखविले आहेत.

रामानें　　गाईला　　काठीनें　　मारिलें

करणसंबंध

कर्मसंबंध

कर्तृसंबंध

**( ब ) रामा नागपुराहून सोमवारीं निघाला.**

( १ ) या वाक्यांत **रामा** या शब्दाचाही **निघाला** या क्रियापदाशीं कर्तृसंबंध आहे हें उघड आहे.

( २ ) **नागपुराहून** या शब्दाचाही **निघाला** या क्रियापदाशीं संबंध आहे. अशा संबंधाला **अपादानसंबंध** असें म्हणतात अपादान म्हणजे वियोग किंवा ताटातूट. **निघणें** या क्रियेमुळें **रामा** व **नागपूर** यामध्यें वियोग उत्पन्न झाला.

( ३ ) **सोमवारीं** या शब्दाचाही **निघाला** या क्रियापदाशींच संबंध आहे. **निघणें** या क्रियेची वेळ **सोमवार** या नामाच्या **सोमवारीं** या सप्तमी विभक्तीनें दाखविली गेली. अशा संबंधाला **कालाधिकरण संबंध** असें म्हणतात.

**( क ) शिक्षकांनीं रामाला शाळेंत बक्षीस दिलें.**

( १ ) **शिक्षकांनीं** या नामाचा दिलें या क्रियापदाशीं कर्तृसंबंध आहे हें उघड आहे.

( २ ) **रामाला** या शब्दाचाही दिलें या क्रियापदाशींच संबंध आहे. **रामाला** हा शब्द जरी **दिलें** या क्रियापदाचें प्रत्यक्ष कर्म नसला तरी अप्रत्यक्ष कर्म आहे. अशा प्रकारच्या संबंधाला **संप्रदानसंबंध** असें म्हणतात.

( ३ ) **शाळेंत** या शब्दाचाही **दिलें** या क्रियापदाशींच संबंध आहे. **देणें** ही क्रिया घडण्याचें स्थळ कोणतें, म्हणजे ती क्रिया कोठें घडते हें **शाळा** या नामाच्या **शाळेंत** या सप्तमीच्या रूपानें दाखविलें गेलें. अशा संबंधाला **स्थलाधिकरण संबंध** असें म्हणतात.

( ४ ) **बक्षीस** या नामाचा **दिलें** या क्रियापदाशीं **कर्मसंबंध** आहे. हें उघड आहे.

आतापर्यंत आपण तीन वाक्याचें निरीक्षण केलें. **या निरीक्षणापासून आपण काय शिकलों ?**

( १ ) वाक्यामध्यें नामाचे क्रियापदाशीं निरनिराळे संबंध असतात.

( २ ) हे संबंध व्यक्त करण्याकरितां आपण निरनिराळ्या विभक्तींचा उपयोग करतों.

( ३ ) अमुक प्रकारचा संबंध अमुक एकच विभक्ती दाखविते असें नाहीं. वरील वाक्यामध्यें **रामानें** ही तृतीया विभक्ति असून **रामा** ही प्रथमा विभक्ति आहे; परंतु दोन्ही विभक्तींनीं कर्तृसंबंधच दाखविला आहे. त्याचप्रमाणें तृतीया विभक्तीनें एकदां करणसंबंधच व एकदां कर्तृसंबंध दाखविला गेला आहे. **एकच विभक्ती निरनिराळे संबंध**

व्यक्त करूं शकते व एकच संबंध निरनिराळ्या विभक्तींनीं व्यक्त केला जातो.

## अभ्यास.

[ १ ] पुढील वाक्यांतील जाड अक्षरांत छापेलल्या नामाच क्रियापदांशीं कोणते संबंध आहेत तें सांगा.

[ १ ] रामा पाणी प्याला व शाळेंत गेला. [ २ ] मुलानें पाण्यांत दगड टाकिला. [ ३ ] विमानें आपणांस आकाशांत फिरवितात व आनंद देतात. [ ४ ] आगगाडी वाफेनें चालते. [ ५ ] गेल्या शनिवारीं परीक्षकांनी विद्यार्थ्यांस पुस्तकें वाटलीं.

[ २ ] वाक्यांतील क्रियापदाशीं येणाऱ्या नामांच्या कोणत्याही पांच संबंधांचीं नांवें सांगून उदाहरणें द्या.

[ ३ ] "एकच विभक्ति निरनिराळे संबंध व्यक्त करूं शकते, व एकच संबंध निरनिराळ्या विभक्तींनीं व्यक्त केला जातो" हें सिद्ध करण्यासाठीं तीन तीन उदाहरणें द्या.

---

## धडा सातवा.

## नामाचा संबंध फक्त क्रियापदाशींच असतो काय ?

मागील धड्यांत आपण जीं वाक्यें पाहिलीं त्यांतील नामाचे संबंध क्रियापदाशींच निरनिराळ्या प्रकारचे होते असें आपल्याला दिसून आलें. नामाचा संबंध फक्त वाक्यातील क्रियापदाशींच असतो किंवा इतर शब्दांशींही तो असूं शकतो हें आपल्याला या धड्यांत पहावयाचें आहे.

शब्दांच्या एकंदर आठ जाती आहेत; त्यांपैकीं क्रियापदें सोडून नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियाविशेषण, उभयान्वयी अव्यय, शब्दयोगी अव्यय, व केवलप्रयोगी अव्यय, यांपैकीं कोणत्या कोणत्या शब्दांशीं नामाचा वाक्यामध्यें संबंध असूं शकतो ?

आपल्या वाचनांत, बोलण्यांत किंवा ऐकण्यांत येणाऱ्या वाक्यांचें अवलोकन केलें असतां नामाचा वाक्यांतील इतर नामाशीं किंवा सर्व-नामाशीं, विशेषणाशीं किंवा क्रियाविशेषणाशीं संबंध असूं शकतो असें दिसून येतें. खालीं निरनिराळीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांचे निरी-क्षण करा.

### ( १ ) नामाचा नामाशीं किंवा सर्वनामाशीं संबंध.

माझा **भाऊ रामा** पास झाला. **गोविंदाचें पुस्तक** कोठें आहे ? नागपूरचें **मुंबईहून अंतर** सुमारें पाचशें मैल आहे. तुझी **त्याच्याशीं मैत्री** चांगली नाहीं.

वरील वाक्यामध्यें **रामा, गोविंदाचें, मुंबईहून, त्याच्याशीं,** या नामांचे व सर्वनामाचे संबंध कोणत्या शब्दांशीं आहेत ? ते क्रियापदाशीं नसून **भाऊ, पुस्तक, अंतर,** व **मैत्री,** या नामाशींच अनुक्रमें आहेत हें उघड आहे.

### ( २ ) नामाचा विशेषणाशा संबंध.

हरीण **डोळ्यानें आंधळ** होतें. ही मुलगी **लग्नाला योग्य** झाली आहे. रामा **तोंडाचा फटकळ** आहे. मी **गणितांत कच्चा आहें**. तो **गाण्याचा शोकी** आहे.

### ( ३ ) नामाचा क्रियाविशेषणाशीं संबंध.

गाडी एक **तासानें उशिरां** आली. मी अर्धा **तास लवकर** आलों.

शब्दयोगी अव्यय हें वाक्यांत स्वतंत्रपणें येत नाहीं; विभक्तिप्रत्यया-प्रमाणेच फक्त त्याचा उपयोग होतो; म्हणून नामाचा शब्दयोगी अव्ययाशीं संबंध असतो काय या प्रश्नाचा विचार करण्याचें कारणच नाहीं.

उभयान्वयी अव्यय हें वाक्यातील भाग म्हणून येत नाहीं; तें मुख्यत्वेंकरून दोन वाक्यें जोडतें. म्हणून वाक्यामध्यें नामाचा उभयान्वयी अव्ययाशीं संबंध असणें शक्य नाहीं.

केवलप्रयोगी अव्यय हें वाक्याचा भागच नसतें, त्यामुळें वाक्यामध्यें नामाचा केवलप्रयोगी अव्ययाशीं संबंध असणें शक्य नाहीं.

## या धड्यांत आपण काय शिकलों ?

[ १ ] नामाचा विभक्तीच्या योगानें ज्याप्रमाणें क्रियापदाशीं संबंध दाखविला जातो, त्याचप्रमाणें इतर नामें, किंवा सर्वनामें, विशेषणें, आणि क्रियाविशेषणें यांच्याशीही नामाचा संबंध विभक्तीचे योगानें दर्शविला जातो.

[ २ ] शब्दयोगी अव्ययें, उभयान्वयी अव्ययें व केवलप्रयोगी अव्ययें हीं वाक्यांतील स्वतंत्र शब्द म्हणून वाक्यांत येत नसल्यामुळें या शब्दांशीं नामाचा संबंध विभक्तीचे योगानें दाखविला जात नाहीं.

**व्याख्याः—**

**( १ ) वाक्यात नामाचा क्रियापदाशीं जो संबंध त्यास कारक असें म्हणतात. व विभक्ति जेव्हा नामचा क्रियापदाशीं संबंध जोडते तेव्हां त्या विभक्तीला कारकविभक्ति असें म्हणतात.**

**( २ ) विभक्ति जेव्हां क्रियापदाव्यतिरिक्त वाक्यांतील इतर शब्दाशीं संबंध जोडते, तेव्हां त्या विभक्तीला उपपदविभक्ति असें म्हणतात.**

## अभ्यास.

**( १ ) विभक्तीचे योगानें नामाचा केवलप्रयोगी अव्ययांशीं संबंध कां येऊं शकत नाहीं ?**

**( २ ) पुढील वाक्यांत जाड अक्षरांत लिहिलेल्या नामांचा संबंध कोणत्या शब्दाशीं आहे तें सांगा.**

( १ ) **श्रीपादच्या मौंजीस** आम्ही **तुम्हांस** आमंत्रण देऊं. ( २ ) मी **पांच मिनिटें** उशिरा येईन. ( ३ ) तो **शरीरानें** धिप्पाड होता. ( ४ )

दुष्टांशीं वैर नाशास कारण असतें. (५) रामाचें पुस्तक कोठें आहे ? (६) हरीण डाव्या डोळ्यानें आधळें होतें.

(२) कारकविभक्ति व उपपदविभक्ति यांमधील फरक उदाहरणें देऊन स्पष्ट करून दाखवा.

---

## धडा आठवा.

## विभक्तींचे अर्थ.

नामाचा वाक्यांमधील क्रियापदाशीं किंवा इतर शब्दांशीं विभक्तिचे योगानें संबंध जोडला जातो; क्रियापदाशीं आलेल्या नामाच्या संबंधाला कारक असें नांव असून कारकसंबंध जोडणाऱ्या विभक्तिला कारकविभक्ति असें म्हणतात, व नामाचा संबंध विभक्तिचे योगानें इतर शब्दांशीं जोडला गेला असल्यास त्या विभक्तीला उपपद-विभक्ती म्हणतात. या गोष्टी आपण मागील धड्यात पाहिल्या आहेत.

प्रत्येक विभक्तीचे योगानें नामांचे क्रियापदाशीं व इतर शब्दांशीं वाक्यांत कोणकोणते संबंध येतात तें आपणांस या धड्यांमध्यें पहावयाचें आहे. उपपदविभक्तीच्या व कारकविभक्तीच्या संबंधांना **अर्थ** असें सामान्य नांव मराठी व्याकरणांत आहे. प्रत्येक विभक्तीचे कोणकोणते अर्थ असतात तें आतां आपण पाहूं.

| | उदाहरण. | अर्थ. | स्पष्टीकरण. |
|---|---|---|---|
| १ | **रामा** घरीं गेला.<br>**हरी** आंबा खातो. | कर्ता. | मागें सांगितलेंच आहे. |
| २ | मीं **पाणी** पितों.<br>कृष्णा **पुस्तक** वाचतो. | कर्म. | ” ” ” |
| ३ | माझा भाऊ **रामा** पास झाला.<br>दशरथाचा मुलगा **राम** वनांत गेला. | उद्देश. | **रामा** या नामाचा उपयोग भाऊ या नामाला. |

| | उदाहरणें. | अर्थ. | स्पष्टीकरण. |
|---|---|---|---|
| | | | उद्देशून केला आहे. **भाऊ** कोणता तें **रामा** या नामानें स्पष्ट होतें. |
| ४ | हिंदुस्थानाहून इंग्लंड सहा हजार मैल आहे.<br>तो दोन दिवस आजारी होता. | अंतर किंवा अवधि | येथे **मैल** या नामाचा संबंध 'लांब' या अध्याहृत विशेषणाशीं आहे. **दिवस** याचा संबंध होता या क्रियापदाकडे आहे. |
| ५ | दोन **खंडी** गहूं आणा.<br>मी तीन **शेर** साखर आणली. | इयत्ता किंवा प्रमाण. | येथें **खंडी** व **शेर** या नामाचा संबंध **गहूं** व **साखर** या नामांशीं अनुक्रमें आहे. |
| ६ | आंबे तीन **रुपये** शेंकडा.<br>मिळतात. | मूल्य. | मूल्यदर्शक नामाची प्रथमा, तृतीया किंवा चतुर्थी विभक्ति घालण्याचा मराठी भाषेंत प्रघात आहे. |

## तृतीया विभक्तीचे अर्थ.

| | उदाहरणें. | अर्थ. | स्पष्टीकरण. |
|---|---|---|---|
| १ | **रामानें** रावणास मारिलें.<br>**त्यानें** पुस्तक वाचलें. | कर्ता. | स्पष्टीकरण मागें आलेंच आहे. |
| २ | **विळीनें** भाजी चिरतात.<br>**करवतीनें** लांकूड कापतात. | करण. | करण म्हणजे क्रिया करण्याचें साधन. |
| ३ | आमची नाव नदीच्या **कांठानें** गेली.<br>**रस्त्यानें** लोकांची गर्दी बरीच होती. | अधिकरण | अधिकरण म्हणजे स्थान. |
| ४ | तो **प्लेगानें** मेला.<br>तो **निष्काळजीपणानें** नापास झाला. | निमित्त. किंवा कारण | संबंध क्रियापदाशीं. या अर्थानें प्रत्यया बद्दल **मुळें** हें शब्दयोगी अव्यय येऊं शकतें. |
| ५ | ओल्या **वस्त्रानें** या.<br>तो **सैन्यानिशीं** लढाईवर गेला. | साहित्य. | अमुक एक पदार्थ बरोबर घेऊन असा अर्थ असतां तो पदार्थदाखविणाऱ्य |

| | उदाहरणें. | अर्थ. | स्पष्टीकरण. |
|---|---|---|---|
| | | | नामाची तृतीया विभक्ति होते. या ठिकाणीं **सह, बरोबर** हीं अव्ययेंही विभक्ति प्रत्ययाऐवजीं येऊं शकतात. संबंध क्रियापदाकडे. |
| ६ | तो तीन **वर्षांनीं** आला.<br>मी दोन **तासांनीं** येईन. | **अवधी.** | संबंध क्रियापदाकडे. |
| ७ | तो **घाईनें** लिहितो.<br>पैसा **काटकसरीनें** खर्चावा. | **रीति.** | संबंध क्रियापदाकडे. |
| ८ | **डोळ्यानें** अंधळा.<br>**कानानें** बहिरा. | **अंगविकार.** | संबंध अनुक्रमें अंधळा व बहिरा या विशेषणांकडे. |
| ९ | सहा **महिन्यांनीं** धाकटा.<br>पांच **इंचांनीं** लांब. | **प्रमाण** | संबंध अनुक्रमें धाकटा व लांब या विशेषणांकडे. |
| १० | माझ्या **घराशीं** एक वडाचें झाड आहे.<br>तो **लोडाशीं** बसला. | **सान्निध्य.** | संबंध क्रियापदाकडे. |
| ११ | हें **त्याच्याशीं** तोडून पहा.<br>माझी **तुझ्याशीं** तुलना होऊं शकत नाहीं. | **तुलना.** | ज्या वस्तूंशीं तुलना करावयाची असते ती वस्तू दाखविणारें नाम **शीं** प्रत्ययान्त तृतीयेंत असतें. |

## चतुर्थी विभक्तीचे अर्थ.

| | उदाहरणें. | अर्थ. | स्पष्टीकरण. |
|---|---|---|---|
| १ | **त्याला** बोलतां येतें.<br>**मला** चालवत नाहीं. | **कर्ता.** | शक्य क्रियापदाचा **कर्ता.** |
| २ | मी **त्याला** घरीं नेतों.<br>त्यानें **मुलास** धरिलें. | **कर्म.** | संबंध क्रियापदाकडे. |
| ३ | रामानें **बिभीषणास** लंकेचें राज्य दिलें.<br>मी **गुरुजींना** पत्र दिलें. | **संप्रदान.** किंवा **अप्रत्यक्षकर्म.** | संबंध क्रियापदाकडे. |

| | उदाहरणें. | अर्थ. | स्पष्टीकरण. |
|---|---|---|---|
| ४ | मुंबईस प्लेग आहे. डोक्याला पागोटें घाल. | स्थलाधिकरण. | संबंध क्रियापदाकडे. |
| | तो रात्रीस जागतो. | कालाधिकरण. | |
| ५ | तो मुंजीला गेला आहे. तो कीर्तीला झटतो. | हेतु किंवा प्रयोजन. | संबध क्रियापदाकड. |
| ६ | त्याला चार भाऊ आहेत. सिंहाला आयाळ असते. | नातें किंवा स्वामित्व. | स्वामित्ववाचक नामाची चतुर्थी असते. संबंध |
| ७ | नळाला जशी दमयंती तशी कृष्णाला रुक्मिणी. | तुलना. | अध्याहृत क्रियापदाकडे. |

## पंचमी विभक्तीचे अर्थ.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | तो घरून आला. तूं नागपुराहून केव्हां येशील ? | अपादान. | संबंध क्रियापदाकडे. |
| २ | तूं कोळशाहून काळा आहेस. हा पर्वत हिमालयाहून उंच आहे काय ? | तुलना. | संबंध अनुक्रमें काळा व उंच या विशेषणाकडे. |
| ३ | शंकर विष्णूहून निराळा नाही. जांब पेरूहून निराळा आहे. | भेद किंवा फरक. | संबंध अनुक्रमें निराळा व वेगळा या विशेषणाकडे. |
| ४ | दुधापासून साय होते. मातीपासून घट करितात. | विकार. | संबंध क्रियापदाकडे. |

## षष्टी विभक्तीचे अर्थ.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | आमचें पोहून झालें. रामाचें खाऊन झाले म्हणजे ये. | कर्ता. | अनुक्रमें पोहून झालें व खाऊन झालें या संयुक्त क्रियापदांचा. |
| २ | दिवसाचा निजूं नको. आम्ही उन्हाळ्याचे गच्चीवर निजतों. | कालाधिकरण. | संबंध क्रियापदाकडे. |
| ३ | खुर्चीचा पाय. घराचा दरवाजा. | अंगांगिभाव* | संबंध अनुक्रमें पाय व दरवाजा या नामाक.. |
| ४ | माझें पुस्तक. गोविंदाची लेखणी. | स्वामित्व. | संबंध अनुक्रमें पुस्तक व लेखणी या नामाकड. |

*अंग म्हणजे अवयव अथवा भाग; आणि अंगी म्हणजे ज्याला अंग असतें .

| | उदाहरणें. | अर्थ. | स्पष्टीकरण. |
|---|---|---|---|
| ५ | मनाचा मोकळा. हाताचा सढळ. | बाब. | संबंध अनुक्रमें मोकळा व सढळ या विशेषणाकडे. |
| ६ | लोखंडाची कांब. बोरूची लेखणी. मातीची बाहुली. | विकार. | संबंध पुढील नामाकडे. |

## सप्तमी विभक्तीचे अर्थ.

| | उदाहरणें. | अर्थ. | स्पष्टीकरण. |
|---|---|---|---|
| १ | मुले शाळेंत खेळतात. तो घरीं नाहीं. | स्थलाधिकरण. | संबंध क्रियापदाकडे. |
| २ | तारे रात्रीं प्रकाशतात. नद्या उन्हाळ्यांत आटतात. | कालाधिकरण, | ,, ,, |
| ३ | हा मुलगा गणितांत हुशार आहे. शिवाजी घोड्यावर बसण्यांत पटाईत होता. | विषय. बाब. | संबंध अनुक्रमें हुशार व पटाईत या विशेषणांकडे. |
| ४ | तो सर्वांत कनिष्ठ आहे. राम सर्व भावांत वडील होता. | तुलना. | संबंध अनुक्रमें कनिष्ठ व वडील या विशेषणांकडे |

## अभ्यास.

**खालील वाक्यांतील नामांच्या विभक्ति कोणत्या आहेत व त्यांचे संबंध कोणत्या शब्दाशीं आहेत तें सांगून संबंधाचें नांव माहित असल्यास सांगा.**

(१) बदकाला जन्मतःच पाण्यावर पोहतां येतें. (२) हिमालय पर्वताच्या गिरिकंदरांत पुष्कळ ऋषी तपश्चर्या करितात. (३) वाघानें हरीण मारलें, (४) कांहीं पक्ष्यांना पोहतां येतें. (५) विमानांतून सृष्टींतील रम्य रम्य देखावे दृष्टीस पडतात. (६) सूर्याभोंवतीं नवग्रह आपापल्या उपग्रहांनिशीं फिरतात. (७) कोळी दररोज या तळ्यांतील मासे पकडतात. (८) ईश्वर ही सृष्टि निर्माण करतो. (९) आमच्या गुरुजींचे घरीं लहान लहान मुलें दररोज सकाळीं उठून वेदाध्ययन करितात. (१०) मोठे प्राणी लहान प्राण्यांना खातात. (११) त्या नीच पुरुषानें त्या बालकाचे तलवारीनें तुकडे केले.

(१२) सर्व शत्रू दोरानें किल्ल्यावर चढून आले. (१३) आगगाडीनें प्रवास लवकर होतो; परंतु विमानानें त्याहीपेक्षा जलद होतो. (१४) कायेनें, वाचेनें आणि मनानेंही पाप करूं नका. (१५) आम्ही कानांनीं ऐकतों, नाकानें वास घेतों, जिभेनें रस चाखतों पायांनीं चालतों व हातांनीं काम करतों. (१६) त्या शूर पुरुषानें हत्तीच्या सोंडेचे एका घावात दोन तुकडे केले. (१७) लहान मुलांना भुतांखेतांच्या गोष्टी सांगणें मुर्खपणाचें आहे. (१८) बळीनें वामनास पृथ्वी दिली. (१९) राम अयोध्येहून वनास गेले. (२०) नदी गांवापासून पांच मैल लांब आहे. (२१) इंग्लंडाहून अधिक बलाढ्य राष्ट्र कोणतें? (२२) मी सर्व सुखास मुकलों. (२३) समुद्रांत देवांना चवदा रत्नें सांपडलीं. (२४) वाटेनें कांटे पुष्कळ आहेत. (२५) रामानें पुष्कळ वर्षें राज्य केलें. (२६) त्यानें डोक्याला रुमाल घातला. (२७) विंचवाच्या नांगीनें भोंड्याला देखील भोंक पडतें असें लोक म्हणतात.

---

## धडा नववा.

## नामाचें व्याकरण करणें.

वाक्यामध्यें आलेला शब्द ( १ ) कोणत्या जातीचा आहे व त्याची उपजाति कोणती, ( २ ) तो विकारी असल्यास त्याला कोणकोणते विकार झाले आहेत, ( ३ ) त्या शब्दाचा वाक्यांतील कोणत्या शब्दाशीं कोणता संबंध आहे, या गोष्टी त्या शब्दांबद्दल सांगणें याला त्या शब्दाचें व्याकरण करणें असें म्हणतात. म्हणून नामाचें व्याकरण करतांना ( १ ) तें नाम सामान्य, विशेष व भाववाचक यापैकीं कोणत्या प्रकारचें आहे तें प्रथम सांगितलें पाहिजे; ( २ ) नामांना लिंग, वचन व विभक्ति यांचे विकार होतात म्हणून त्या नामाचें लिंग, वचन व विभक्ति हीं कोणतीं आहेत तें नंतर सांगितलें पाहिजे; ( ३ ) व शेवटीं त्या नामाचा कोणत्या शब्दाशीं संबंध आहे तें सांगून संबंधाचें नांव कोणतें तेंही माहीत असल्यास सांगितलें पाहिजे.

उदाहरण म्हणून खालील वाक्यांतील **रामानें** या नामाचें आपण व्याकरण करूं.

**रामानें** लंकेचा राजा रावण यास मारिलें.

( १ ) जाति व उपजाति —विशेषनाम.

( २ ) विकार—पुल्लिंग; एकवचन; तृतीया विभक्ति.

( ३ ) संबंध—मारिलें या क्रियापदाशीं; क्रियापदाचा कर्ता.

## अभ्यास.

नामाचें व्याकरण करण्याकरितां कोणकोणत्या गोष्टींचा विचार केला पाहिजे तें पुढील मांडणीवरून नीट लक्षांत येईल.

नामाचें व्याकरण करणें.

- जात
  - सामान्यनाम
  - भाववाचक
  - विशेषनाम
- विकरण
  - लिंग
    - पु.
    - स्त्री.
    - न.
  - वचन
    - ए. व.
    - अ. व
  - विभक्ति
    - प्र.
    - द्वि.
    - तृ.
    - च.
    - पं.
    - ष.
    - स.
    - सं.
- इतर शब्दांशीं संबंध व विभक्तिचा अर्थ.

## अभ्यास.

(१) 'रामानें लंकेचा राजा रावण यास मारिलें.' या वाक्यांतील नामाचें व्याकरण खालील कोष्टकांत करून दाखविलें आहे, तें बरोबर आहे कीं नाहीं तें पहा.

| शब्द | मूळ शब्द | जाति व उपजाति | विकार. | कोणत्या शब्दाशीं संबंध आहे. | संबंधाचें नांव किंवा विभक्तीचा अर्थ. |
|---|---|---|---|---|---|
| रामानें | राम | विशेषनाम | पुलिंगी, तृतीया विभक्ति, एकवचन, | 'मारिलें' या क्रियापदाशीं. | कर्ता. |
| लंकेचा | लंका | विशेषनाम | स्त्रीलिंगी, षष्ठी. विभक्ती, एकवचन, | 'राजा' या नामाशीं. | स्वामित्व. |
| राजा | राजा | सामान्यनाम | पुल्लिंगी, प्रथमा, विभक्ति, एकवचन, | 'रावण' या नामाशीं. | उद्देश. |
| रावण | रावण | विशेषनाम | पुल्लिंगी, प्रथमा. विभक्ति, एकवचन, | 'यास' या सर्वनामाशीं. | उद्देश. |
| यांस | हा | दर्शक सर्वनाम | पुल्लिंगी, चतुर्थी, विभक्ति, एकवचन, | 'मारिलें' या क्रियापदाशीं. | कर्म. |

(२) वरील कोष्टकाप्रमाणें वहीवर कोष्टक काढून त्यांत खालील वाक्यांत आलेल्या नामाचें व्याकरण करा; संबंधाचे योग्य नांव माहीत असल्यास तें शेवटच्या रकान्यांत लिहा.

१. कापसाच्या गिरणींत कापूस पिंजतात व त्याच्या गांठी बांधून मुंबईला कापडाच्या गिरणांत आगगाडीनें पाठवितात. २. आम्ही दोन दिवस तुमच्या घरीं राहूं व नंतर वाबूस घेऊन यात्रेला जाऊं. ३. श्रीकृष्णानें पांडवांना अनेक प्रसंगीं आपल्या युक्तीनें संकटापासून मुक्त केलें.

# खंड चवथें.

## सर्वनामविचार.

### धडा पहिला.

### सर्वनामाचें वर्गीकरण.

'रामा फार हुशार मुलगा आहे; तो आपला अभ्यास नियमानें करतो.'

या वाक्यात **तो** हा शब्द कशाचेंही नाव नाहीं. तो या शब्दानें या वाक्यामध्यें **रामा** या मुलाचा बोध झाला आहे. दुसऱ्या एखाद्या वाक्यामध्यें **तो** याच शब्दानें **कुत्रा** या प्राण्याचा बोध होईल. (उदाहरणें द्या.) तिसऱ्या वाक्यात **तो** याच शब्दानें **चाकू** या वस्तूचा बोध होईल. (उदाहरणें द्या.)

नामाचे योगाने ज्याप्रमाणें वस्तूचा बोध होतो, त्याचप्रमाणें सर्वनामानेही वस्तूचा बोध होऊं शकतो. नामाप्रमाणें सर्वनामालाही लिंग, वचन व विभक्ति याचे विकार होतात; परंतु नामाचा अर्थ स्वतंत्र, ठरलेला व न बदलणारा असा असून सर्वनामाला स्वतःचा अर्थ नसतो आणि निरनिराळ्या वाक्यांत त्याच सर्वनामाला निरनिराळ्या नामाचा अर्थ येतो या सर्व गोष्टी आपण व्याकरण-प्रवेशिकेच्या पहिल्या पुस्तकांत पाहिल्याच आहेत.

**व्याख्याः—जे शब्द वास्तविक कशाचींही नावें नसून ज्यांना निरनिराळ्या वाक्यात निरनिराळ्या नामशब्दांचा अर्थ येतो त्या शब्दांना सर्वनामें असें म्हणतात.**

मराठी भाषेमध्यें **मी, तूं, तो, हा, जो, कोण, आपण,** आणि **स्वतः** अशी एकंदर नऊ सर्वनामें आहेत. या सर्वनामांचें वर्गीकरण व्याकरणामध्यें खालीलप्रमाणें करितात.

(१) कित्येक सर्वनामें बोलणारा स्वतःचा उल्लेख करतांना वापरतो. अशा सर्वनामाना **प्रथमपुरुषवाचक सर्वनामें** असें म्हणतात. **मी, आपण, स्वतः ही प्रथमपुरुषवाचक सर्वनामें होत.**

( २ ) कित्येक सर्वनामें ज्याचेजवळ बोलावयाचें त्याचा उल्लेख करतांना बोलणारा वापरतो. अशा सर्वनामांना **द्वितीयपुरुषवाचक सर्वनामें** असें म्हणतात; **तूं, आपण, स्वतः** हीं द्वितीयपुरुषवाचक सर्वनामें होत.

( ३ ) कित्येक सर्वनामें बोलणारा स्वतःबद्दल नव्हे, किंवा ज्याचेजवळ बोलावयाचें त्याचेबद्दलही नव्हे, तर इतर वस्तू व व्यक्ती यांचेबद्दल वापरतो. अशा सर्वनामांना **तृतीयपुरुषवाचक सर्वनामें** असें म्हणतात; **आपण, स्वतः तो, हा, जो, कोण, काय** हीं तृतीयपुरुषवाचक सर्वनामें होत.

**आपण, स्वतः** हीं सर्वनामें प्रथमपुरुषवाचक, द्वितीयपुरुषवाचक व तृतीयपुरुषवाचक या तिन्ही सदरांत येत असल्यामुळें त्यांना **सर्वपुरुषवाचक सर्वनाम** असेंच नांव आहे. ( उदाहरणें द्या. )

तृतीयपुरुषवाचक सर्वनामाचे पुन्हा दर्शक, प्रश्नार्थक व संबंधी असे तीन प्रकार केले आहेत

( अ ) **तो** व **हा** या सर्वनामांनीं वस्तू दाखवून तिचा उल्लेख केला जात असल्यामुळे यांना **दर्शक सर्वनामें** असें म्हणतात; **हा** या सर्वनामाचा जवळच्या वस्तूचा उल्लेख करण्याकडे व **तो** या सर्वनामाचा लांबच्या वस्तूचा उल्लेख करण्याकडे उपयोग होतो.

( आ ) **कोण** व **काय** या सर्वनामानीं अज्ञात ( माहित नसलेल्या व्यक्ती व वस्तू यांबद्दल अनुक्रमें प्रश्न विचारले जात असल्यामुळें त्यांना **प्रश्नार्थक सर्वनामें** असें म्हणतात.

( इ ) **जो** या सर्वनामाला **संबंधी सर्वनाम** हें नांव व्याकरणकारानीं दिलें आहे.

सर्वनामांचें हें वर्गीकरण खालील मांडणीवरून लक्षांत ठेवावयास सोपें जाईल.

सर्वनामें.

- प्रथमपुरुषवाचक (मी)
- द्वितीयपुरुषवाचक (तूं)
- तृतीयपुरुषवाचक
  - दर्शक (हा, तो)
  - संबंधी (जो.)
  - प्रश्नार्थक (कोण, काय)
- सर्वपुरुषवाचक, (आपण, स्वतः)

## धडा दुसरा.

## सर्वनामांचें विकरण.

सर्वनाम म्हणजे काय व त्याचे किती प्रकार होतात हें आपण मागील धड्यांत पाहिलें. सर्वनामांना कोणकोणते विकार होतात तें आपल्याला या धड्यात पहावयाचें आहे.

नामांप्रमाणेंच सर्वनामांनाही लिंग वचन व विभक्ती यांचे विकार होतात. ते आपण क्रमानें पाहूं.

### सर्वनामांना होणारे लिंगविकार.

| | पुल्लिंग | स्त्रीलिंग. | नपुंसकलिंग. |
|---|---|---|---|
| (१) | मी. | मी. | मी. |
| (२) | तूं. | तूं. | तूं. |
| (३) | तो | ती. | तें |
| (४) | हा. | ही. | हें |
| (५) | जो. | जी. | जें. |
| (६) | कोण. | कोण. | कोण. |
| (७) | काय. | काय. | काय. |
| (८) | आपण. | आपण. | आपण. |
| (९) | स्वतः | स्वतः | स्वतः |

वरील उदाहरणांवरून असें दिसून येतें कीं, हा, तो व जो या सर्वनामांचीं निरनिराळ्या लिंगांचीं निरनिराळीं रूपें होतात; परंतु इतर सर्वनामांचीं सर्व लिंगांमध्यें तींच कायम रहातात.

## सर्वनामांस वचन व विभक्ति यांस अनुसरून होणारे विकार.

खालीं सर्वनामांचीं उभयवचनी विभक्तिरूपें चालवून दाखविलीं आहेत; त्यावरून सर्वनामांना वचन व विभक्ति यांचे कसकसे विकार होतात तें स्पष्टपणें दिसून येईल.

### मी—प्रथमपुरुषवाचक सर्वनाम.

| एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|
| प्र. मी. | आम्ही. |
| [ द्वि. ] मला, मजला. | आम्हास, आम्हाला. |
| तृ. मीं, म्यां, मशीं, मजशीं. | आम्हीं, आम्हांशीं. |
| च. मला, मजला. | आम्हास, आम्हाला. |
| पं. मजहून, माझ्याहून. | आम्हाहून, आमच्याहून. |
| ष. माझा-झी-झें-,झे-झ्या झीं. | आमचा-ची,चें-चे-च्या-चीं. |
| स. माझ्यांत. | आमच्यांत, आम्हांत. |

संबोधन:-सर्वनामाचा संबोधन विभक्तींत उपयोग करण्याचा भाषेचा परिपाठ प्रचार नाहीं.

### तूं—द्वितीयपुरुषवाचक सर्वनाम.

| एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|
| प्र. तूं. | तुम्ही. |
| [ द्वि ] तुला, तुजला. | तुम्हांस तुम्हांला. |
| तृ. तं, त्वां, तुशीं, तुजशीं. | तुम्हीं, तुम्हांशीं. |
| च. तुला, तुजला. | तुम्हास, तुम्हाला. |
| पं. तुजहून, तुझ्याहून. | तुम्हाहून, तुमच्याहून. |
| ष. तुझा-झी-झें-झे-झ्या-झीं. | तुमचा-चा-चें-चे-च्या-चीं. |
| स. तुझ्यांत. | तुमच्यांत, तुम्हांत. |

## तो—दर्शक सर्वनाम, पुल्लिंगी.

| | |
|---|---|
| प्र. तो. | ते. |
| (द्वि.) त्यास, त्याला, त्याजला. | त्यांस, त्यांला, त्यांना, त्यांजला. |
| तृ. त्यानें, त्याशीं, त्याजशीं. | त्यांनीं, त्यांशीं, त्यांजशीं. |
| च. त्यास, त्याला, त्याजला. | त्यांस, त्यांना, त्यांला, त्यांजला. |
| पं. त्याहून, त्याजहून. | त्यांहून, त्यांजहून. |
| ष. त्याचा-ची-चें-चे-च्या-चीं. | त्यांचा-ची-चें,-चे-च्या-चीं. |
| स. त्यांत, त्याच्यांत. | त्यांत, त्यांच्यांत. |

## ती—दर्शक सर्वनाम, स्त्रीलिंगी.

| | |
|---|---|
| प्र. ती. | त्या. |
| (द्वि.) तीस, तिला, तिजला. | त्यांस, त्यांला, त्यांना, त्यांजला. |
| तृ. तिनें, तिशीं, तिजशीं. | त्यांनीं, त्यांशीं, त्यांजशीं. |
| च. तीस, तिला, तिजला. | त्यांस, त्यांला, त्यांना. |
| पं. तिजहून, तिच्याहून. | त्यांहून, त्यांच्याहून. |
| ष. तिचा-ची-चें, इत्यादि. | त्यांचा-ची-चें, इत्यादि. |
| स. तिच्यांत | त्यांच्यांत. |

## तें-दर्शकसर्वनाम, नपुंकसलिंगी.

| | |
|---|---|
| प्र. तें. | तीं. |
| (द्वि.) त्यास, त्याला. | त्यांस त्यांला, त्यांना. |

बाकी पुढच्या विभक्ति तो या पुल्लिंगी सर्वनामाप्रमाणें.

## हा—दर्शक सर्वनाम, पुल्लिंगी.

| | |
|---|---|
| प्र. हा. | हे. |
| (द्वि.) यास, याला, याजला. | यांस, यांना, यांला. |
| ह्यास, ह्याला, ह्याजला. | ह्यांस, ह्यांला, ह्यांना, ह्यांजला. |
| तृ. ह्यानें, ह्याशीं. | ह्यांनीं, ह्यांशीं. |
| च. ह्यास, ह्याला, ह्याजला. | ह्यांस, ह्यांला, ह्यांना, ह्यांजला. |
| पं. ह्याहून, ह्याजहून. | ह्यांहून ह्यांजहून, |
| ष. ह्याचा-ची-चें, इत्यादि. | ह्यांचा, चीं, चें, इत्यादि. |
| स. ह्यांत, ह्याच्यांत. | ह्यांत, ह्यांच्यांत. |

## ही—दर्शक सर्वनाम, स्त्रीलिंगी.

| | |
|---|---|
| प्र. ही. | त्या, या. |
| (द्वि.) हीस, हिला, हिजला. | यांस, यांला, यांना, त्यांस, त्यांला, त्यांना. |
| तृ. हिनें, हिशीं. | त्यांनीं, त्यांशीं, त्यांजशीं. |
| च. हीस, हिला, हिजला. | त्यांस, त्यांला, त्यांना. |
| पं. हिजहून, हिच्याहून. | त्यांहून, त्यांच्याहून. |
| ष. हिचा-ची-चें, इत्यादि. | त्यांचा-चीं-चें, इत्यादि. |
| स. हिच्यांत. | त्यांच्यांत. |

## हें दर्शक सर्वनाम, नपुंसकलिंगी.

| | |
|---|---|
| प्र. हें. | हीं. |

(द्वि.) यास, त्यास, याला, त्याला. यांस, यांला, यांना, त्यांस, त्यांला, त्यांना, पुढच्या विभक्ति हा या पुल्लिंगी सर्वनामाप्रमाणें.

जो, जी, जें, हीं संबंधी सर्वनामें तो, ती, तें या सर्वनामांप्रमाणें अनुक्रमें चलतात.

## कोण—प्रश्नार्थक सर्वनाम.

| | |
|---|---|
| प्र. कोण. | कोण. |
| (द्वि.) कोणास, कोणाला. | कोणांस, कोणांला. |
| तृ. कोणीं, कोणाशीं. | कोणीं, कोणांशीं. |
| च. कोणास, कोणाला. | कोणांस, कोणांला. |
| पं. कोणाहून. | कोणांहून. |
| ष. कोणाचा-ची-चें, इत्यादि. | कोणांचा-ची-चें, इत्यादि. |
| स. कोणांत. | कोणांत. |

## काय—प्रश्नार्थक सर्वनाम.

| | |
|---|---|
| प्र. काय. | काय. |
| (द्वि.) कशास, कशाला. | कशांस, कशांला, कशांना. |
| तृ. कशानें, कशाशीं. | कशांनीं, कशांशीं. |
| च. कशास, कशाला. | कशांस, कशांला, कशांना |
| पं. कशाहून. | कशांहून. |

| | |
|---|---|
| ष. कशाचा-ची-चें, इत्यादि. | कशांचा-ची-चें, इत्यादि. |
| स. कशांत. | कशांत. |

### आपण—सर्वपुरुषवाचक सर्वनाम.

| | |
|---|---|
| प्र. आपण. | आपण. |
| (द्वि.) आपणास, आपणाला. | आपणांस, आपणांला. |
| तृ. आपण, आपणाशीं. | आपण, आपणांशीं. |
| च. आपणास, आपणाला. | आपणांस, आपणांला. |
| पं. आपणाहून. | आपणांहून. |
| ष. आपला-ली-लें, इत्यादि. | आपला-ली-लें इत्यादि. |
| स. आपणांत. | आपणांत. |

### स्वतः—सर्वपुरुषवाचक सर्वनाम.

| | |
|---|---|
| प्र. स्वतः | स्वतः |
| [द्वि.] स्वतःस, स्वतःला | स्वतःस, स्वतःला. |
| तृ. स्वतः, स्वतःशीं. | स्वतः, स्वतःशीं. |
| च. स्वतःस, स्वतःला. | स्वतःस, स्वतःला. |
| पं. स्वतःहून. | स्वतःहून. |
| ष. स्वतःचा—ची—चें इत्यादि. | स्वतःचा—ची—चें, इत्यादि. |
| स. स्वतांत. | स्वतांत. |

---

## धडा तिसरा.

## सर्वनामांचा भाषेंत उपयोग व वाक्यांतील इतर शब्दांशीं त्यांचा संबंध.

सर्वनामांची व्याख्या, वर्गीकरण व विकरण यांचा आपण मागील दोन धड्यांमध्यें अभ्यास केला. सर्वनामांचा म्हणजे मी, तूं, तो, हा जो, कोण, काय, आपण, व स्वतः या नऊ शब्दांचा भाषेंत उपयोग काय व वाक्यांतील इतर शब्दांशीं त्यांचे कोणकोणते संबंध येतात ते या धड्यांत आपल्याला पहावयाचें आहे.

## ( अ ) सर्वनामांचा भाषेंत उपयोग.

खालील उताऱ्यांतील सर्वनामें काढून टाकून त्यांबद्दल योग्य नाम घालून वाक्यें कशीं काय होतात तें पहा.

( १ ) रामा गोविंदाला म्हणाला, "माझ्या घरीं आज सण आहे, म्हणून तूं माझे घरीं आज जेवावयास यावें. मी कृष्णालाही बोलावणार होतों, परंतु तो दुसऱ्या गावीं गेला आहे.

( २ ) रामा ( दुकानदारास ):—"मला गोखलेकृत अंकगणित पाहिजे." दुकानदार:—"हें पहा."

( ३ ) विनायक ( कृष्णाला ):—"मी आपलें धोतर आपल्या हातांनीं धुतों. मला स्वतःचें काम करण्यास लाज वाटत नाहीं. तूं स्वतःचें काम आपल्या हातांनीं कां करीत नाहींस?"

( ४ ) जो मुलगा वेळच्या वेळेवर अभ्यास करतो त्याला नापास होण्याची भीति नसते.

( ५ ) दाराजवळ कोण आहे? रामा काय मागतो?

### निरीक्षण.

( १ ) मी, तूं, तो, हा, आपण, स्वतः हीं सर्वनामें भाषेंत नसतीं तरी चाललें असतें; परंतु मग एकच नाम पुन्हा पुन्हा म्हणावें लागलें असतें व तें कानाला गोड लागलें नसतें. या सर्वनामांचें योगानें नामांची पुनरावृत्ति वांचून भाषेला एक प्रकारचें सौंदर्य आलें आहे.

( २ ) "जो मुलगा वेळेवर अभ्यास करतो त्याला नापास होण्याची भीति नसते." या वाक्यांतील 'जो' व 'त्याला' हीं सर्वनामें काढलीं असतां 'वेळेच्या वेळेवर अभ्यास करणाऱ्या मुलाला नापास होण्याची भीति नसते.' असें वाक्य आलें असतें. अशा प्रकारच्या वाक्यांचा अर्थ स्पष्ट करून दाखवितें वेळीं जो या सर्वनामाची फार मदत होते.

(३) **कोण व काय** या सर्वनामाऐवजीं नामें घालून वाक्यें म्हणतांच येत नाहींत. नामाची पुनरावृत्ति वांचविण्याकरितां हीं दोन सर्वनामें आपेंत आलेलीं नसून जी व्यक्ति किंवा वस्तू आपल्याला माहीत नाहीं तिचेबद्दल माहिती करून घेण्याकरितां आपण याचा उपयोग करतों.

## (आ) वाक्यांतील इतर शब्दांशीं सर्वनामांचा संबंध.

वाक्यांतील इतर शब्दांशीं नामांचा संबंध व्यक्त करण्याकरितां ज्याप्रमाणें नामाला निरनिराळ्या विभक्ति लागतात, त्याप्रमाणें त्या सर्वनामांनाहीं लागतात. "विभक्तींचे अर्थ" या धड्यामध्यें नामाचे निरनिराळ्या शब्दांशीं जे संबंध दाखविले आहेत तेच सर्वनामाचे बाबतींत लागू पडतात, तें सहज लक्षांत येईल.

## सर्वनामांचें व्याकरण करणें.

कोणत्याही शब्दाचें व्याकरण करणें म्हणजे तो शब्द कोणत्या जातीचा आहे व त्याची उपजाति कोणती, त्याला कोणकोणते विकार झाले आहेत व त्याचा वाक्यांतील दुसऱ्या कोणत्या शब्दांशीं कोणता संबंध आहे तें सांगणें, ही गोष्ट आपण नामांचें व्याकरण करतांना पाहिलीच आहे. खालील वाक्यांतील सर्वनामांचें व्याकरण नमुन्याकरितां करून दाखविलें आहे तें पहा.

**मी आपलें** काम **आपल्या** हातांनीं करतों, **तूंही स्वतःचें** काम करावें.

**मी**-प्रथमपुरुषवाचक सर्वनाम; पुल्लिंगी, प्रथमेचें एकवचन; [ प्रथमेचा अर्थ कर्ता ]; **संबंध**-'करतों' या क्रियापदाकडे.

**आपलें**-मूळ शब्द 'आपण'; प्रथमपुरुषवाचक सर्वनाम, पुल्लिंगी, षष्टीचें एकवचन, **संबंध**-'काम' या नामाशीं.

**आपल्या**-मूळ शब्द 'आपण'; प्रथमपुरुषवाचक सर्वनाम, पुल्लिंगी, षष्टीचें एकवचन, **संबंध**-'हातांनीं' या नामाशीं.

**तूं**-द्वितीयपुरुषवाचक सर्वनाम, पुल्लिंगी, तृतीयेचें एकवचन; ( तृतीयेचा अर्थ. कर्ता. ) **संबंध**-'करावें' या क्रियापदाकडे.

**त्वत:चें:**—द्वितीयपुरुषवाचक सर्वनाम, पुल्लिंगी, षष्ठीचें एकवचन संबंध—'काम' या नामाशीं.

## अभ्यास.

पुढील वाक्यांतील सर्वनामांचें व्याकरण करा.

(१) जो अनन्यभावानें परमेश्वरास शरण जातो त्याची तो केव्हांही उपेक्षा करीत नाहीं. (२) आपण केव्हां याल तें आम्हाला सांगून ठेवल्यावर आम्ही आपली वाट पाहूं. (३) प्रथम काय करावयाचें तें ठरवा व नंतर तें करा. (४) झाडांना फुलें कोण आणतो याचें कोडें मुलांना उलगडत नाहीं ह्यांत आश्चर्य नाहीं. (५) कशास काय म्हणावें तें तुला मुळींच समजत नाहीं.

# खंड पांचवें.

## विशेषणविचार.

### धडा पहिला.

### विशेषणांचें वर्गीकरण व विकरण.

"मुलगा" हें नाम वर्गांतल्या सर्व मुलांना लागतें; परंतु "उंच मुलगा" हे शब्द वर्गांत जेवढीं मुलें उंच असतील तेवढ्यांनाच फक्त लागूं शकतात. "उंच" हें विशेषण "मुलगा" या नामाचे मागें आल्यामुळें "मुलगा" या नामाची व्याप्ति कमी झाली. **जे शब्द नामाचे मागें आले असतां नामाची व्याप्ति कमी होते त्या शब्दांस विशेषणें असें म्हणतात.**

विशेषण नामाची व्याप्ति कमी करतें आणि नामानें दाखविलेल्या वस्तुचा गुण किंवा संख्या दाखवितें जसें, 'उंच मुलगा' यांत उंच या विशेषणानें 'मुलगा' या नामानें दर्शविलेल्या मनुष्यप्राण्याचा गुण दाखविला. 'दहा बोरें' या विशेषणानें "बोरें" या नामानें दर्शविलेल्या वस्तूंची संख्या दाखविली.

व्याख्या:—१. **जीं विशेषणें नामानें दर्शविलेल्या वस्तूचा गुण दाखवितात त्यांस गुणविशेषणें असें म्हणतात.**

२. **जीं विशेषणें नामानें दाखविलेल्या वस्तूंची संख्या दाखवितात त्यांस संख्याविशेषणें असें म्हणतात.**

टीप:— संख्याविशेषणेंसुद्धां नामाची व्याप्ति कमी करतात. जसें:—बोरें हें अनेकवचनी नाम दोन किंवा कितीही अधिक बोरांना लागू पडतें; परंतु; "दहा

बोरें" हे शब्द वाटेल तितक्या बोरांना लागू शकत नाहींत. ते दहा बोरांच्या समुदायाला लागतात. यावरून संख्याविशेषणें नामाची व्याप्ति कशी कमी करतात तें दिसून येईल.

"गोविंदा फार हुशार मुलगा आहे, तो आपला अभ्यास चांगला करतो." या वाक्यांत "तो" हा शब्द सर्वनाम आहे. परंतु "तो मुलगा आपला अभ्यास चांगला करतो" या वाक्यांत "तो" या शब्दानें "मुलगा" या नामाची व्याप्ति अगदीं कमी केली आहे. म्हणून या ठिकाणीं "तो" हा शब्द सर्वनाम मानतां येत नाहीं; त्याला विशेषणच म्हटलें पाहिजे. अशा विशेषणास सार्वनामिक विशेषण असें म्हणतात.

व्याख्या:—सर्वनामाचा उपयोग जेव्हां नामाची व्याप्ति कमी करण्याकडे होतो तेव्हां त्याला सार्वनामिक विशेषण असें म्हणतात.

सर्वनामापासून बनलेल्या कित्येक शब्दांना नामाची व्याप्ति कमी करण्याकचें कार्य होतें म्हणून त्यांनाहीं सार्वनामिक किंवा सर्वनाम-साधित विशेषणें असें म्हणतात. यांचीं कांहीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत.

| मूळ सर्वनामें. | सर्वनामसाधित विशेषणें. |
|---|---|
| तो. | तसा, तितका, तेवढा, तसला. |
| हा. | असा, इतका, एवढा, असला. |
| जो. | जसा, जितका, जेवढा, जसला. |
| कोण, काय. | कसा, कितका, केवढा, कसला. |

नामाची व्याप्ति कमी करण्याचें कार्य दुसऱ्या एखाद्या नामाच्या किंवा सर्वनामाच्या षष्ठिविभक्तीनेंही होतें जसें:—"रामाचा घोडा" या ठिकाणीं "रामाचा" या षष्ठ्यन्त नामानें "घोडा" या नामाची व्याप्ति कमी केली आहे.

## विशेषणांचें विकरण.

संस्कृत भाषेमध्यें विशेषण ज्या नामाला लागेल असेल त्या* नामाप्रमाणेंच म्हणजे विशेष्याप्रमाणेंच विशेषणाचें लिंग, वचन व विभक्ति हीं असतात; नामाचें लिंग बदलल्याबरोबर विशेषणाचें लिंग बदलतें; नामाचें लिंग बदलल्याबरोबर विशेषणाची विभक्ति, व नामाचें वचन बदलल्याबरोबर विशेषणाचें वचन हीं बदलतात. परंतु मराठी भाषेमध्यें आकारान्त विशेषणें सोडून बाकीच्या विशेषणांचे रूपांत याप्रमाणें बदल होत नाहीं. आकारान्त विशेषणें मात्र पुढील नामाचें लिंग व वचन यांचे अनुरोधानें विकार पावतात. नामाच्या विभक्तिप्रमाणें आकारान्त विशेषणाची विभक्ति नसते. परंतु त्याचें निदान सामान्यरूप तरी होतें ह्या गोष्टी खालील कोष्टकावरून लक्षांत येतील.

| लिंगविकार. | वचनविकार. | विभक्तिविकार. |
|---|---|---|
| चांगला मुलगा. | चांगले मुलगे | चांगल्या मुलानें. |
| चांगली मुलगी. | चांगल्या मुली. | चांगल्या मुलीनें. |
| चांगलें फळ. | चांगलीं फळें. | चांगल्या फळानें. |

अपवादः—अकरा, बारा, तेरा वगैरे शुद्धसंख्याविशेषणें आकारान्त असलीं, तर त्यांना पुढील नामाचे लिंगवचनविभक्तीवरून विकार होत नाहींत. जसेः—अकरा आंबे; अकरा मुली, अकरा बोरें; अकरा मुलांनीं.

(१) सर्वनामें व विशेषणें यांतील फरक.

(अ) विशेषणाला स्वतःचा ठरलेला असा अर्थ असतो, परंतु सर्वनामाला स्वतःचा असा अर्थ नसतो.

(आ) विशेषणाचा वाक्यांत स्वतंत्रपणें उपयोग होत नाहीं तें नामाबरोबर वाक्यांत येतें; परंतु सर्वनामाचा वाक्यांत स्वतंत्र उपयोग होऊं शकतो.

*विशेषण ज्या नामाला लागतें त्या नामाला त्या विशेषणाचे विशेष्य म्हणतात. जसे 'चांगला मुलगा' या ठिकाणीं मुलगा हें चांगला या विशेषणाचे विशेष्य.

[ ई ] विशेषणाचा जेव्हां वाक्यांत स्वतंत्रपणें उपयोग होतो तेव्हां तें नामच होतें; जसें:—श्रीमंतांनीं गरिबांस हसूं नये.

[ २ ] नामें व विशेषणें यांमधील साम्य व फरक.

[ अ ] नामाला जसा स्वतःचा अर्थ असतो तसा विशेषणालाही असतो.

[ आ ] नामाचा वाक्यांत स्वतंत्र उपयोग होतो तसा विशेषणाचा होत नाहीं.

[ ३ ] नामें व सर्वनामें यांमधील साम्य व फरक.

[ अ ] नामाचा स्वतःचा अर्थ असतो तसा सर्वनामाचा नसतो.

[ आ ] नामाचा वाक्यांत स्वतंत्र उपयोग होऊं शकतो तसा सर्वनामाचाही होतो.

[ ई ] दोहोंनाही लिंग, वचन व विभक्ति यांचे विकार होतात.

## अभ्यास.

[ १ ] विशेषणें किती प्रकारचीं आहेत? उदाहरणें द्या.

[ २ ] विशेषणांना लिंग, वचन, व विभक्ति यांचे विकार होत नाहींत ही गोष्ट कितपत खरी आहे तें उदाहरणें देऊन सांगा.

[ ३ ] कांहीं विशेषणांचा वाक्यांत नामाप्रमाणें उपयोग करून दाखवा.

[ ४ ] खालील वाक्यांमध्यें सर्वनामें कोणतीं व सार्वनामिक विशेषणें कोणतीं तें सांगा.

[ अ ] हें पहा विष्णूचें पुस्तक. तो तें कधींही व्यवस्थित ठेवीत नाहीं. काल हें पुस्तक बाहेरच्या दाराशीं मी पाहिलें, परंतु त्याला वाटतें कीं आपण तें पुस्तक नेहमीं जपूनच ठेवतो, आणि जो त्याला त्याचा दोष दाखवील त्याच्यावर तो रागावतो.

[ आ ] ती मुलगी कशी चित्रें काढते? पहाण्यासाठी कोणते लोक जमले होते हें तुम्ही सांगूं शकाल काय?

[ इ ] जो ह्या वाक्याचा अर्थ सांगेल त्याला मी हें पुस्तक बक्षीस देईन.

## धडा दुसरा.

## विशेषणांचा उपयोग व त्यांचा वाक्यांतील इतर शब्दांशीं संबंध.

विशेषण म्हणजे काय, त्याचे प्रकार कोणते व त्याला केव्हां केव्हां कोणकोणते विकार होतात हें आपण मागील धड्यांत पाहिलें. विशेषणाचा वाक्यात उपयोग काय व त्याचा वाक्यांतील इतर शब्दांशीं कोणता संबंध असतो तें आपल्याला या धड्यांत पहावयाचें आहे.

( १ ) विशेषणाचा मुख्य उपयोग नामाची व्याप्ति कमी करणें हा आहे. वाक्यातील एखाद्या नामाची व्याप्ति जेव्हां विशेषणानें कमी होते तेव्हां त्या विशेषणाचा त्या नामाशीं संबंध असतो.

( २ ) याशिवाय विशेषणाचा दुसराही एक उपयोग आहे. खालीं डाव्या व उजव्या बाजूच्या वाक्यांतील जाड अक्षरांत लिहिलेल्या विशेषणाचे संबंध कोणकोणत्या शब्दांशीं आहेत तें सांगा.

| | |
|---|---|
| **चांगला** मुलगा नियमितपणें वागतो. | हा मुलगा **चांगला** आहे. |
| **निरोगी** मनुष्याला चांगली भूक लागते. | वैद्यानें मला **निरोगी** केलें. |
| **वेडा** मुलगा खोटें बोलतो. | रामा **वेडा** झाला. |
| **कच्चा** आंबा खाऊं नको. | हा आंबा **कच्चा** दिसतो. |

### निरीक्षण.

( १ ) डाव्या बाजूच्या वाक्यांतील विशेषणांचा संबंध त्यांचे पुढील नामाशीं असून तीं त्या नामांची व्याप्ति कमी करतात.

( २ ) उजव्या बाजूच्या पहिल्या वाक्यांत **चांगला** या विशेषणाचा संबंध काहींसा **मुलगा** या नामाशीं असून काहींसा **आहे** या क्रियापदाशींही आहे. दुसऱ्या वाक्यांत **निरोगी** या विशेषणाचा संबंध काहींसा **मला** या सर्वनामाशीं व काहींसा **केलें** या क्रियापदाशींही आहे. तिसऱ्या

वाक्यांत **वेडा** या विशेषणाचा संबंध कांहींसा **रामा** या नामाशीं व कांहींसा **झाला** या क्रियापदाशींही आहे. मधल्या वाक्यांत **कच्चा** या विशेषणाचा संबंध कांहींसा **आंबा** या नामाशीं व कांहींसा **दिसतो** या क्रियापदाशींही आहे.

(२) उजव्या बाजूच्या वाक्यांतील विशेषणें काढून टाकून तीं वाक्यें म्हणून पहा. (हा मुलगा आहे, इत्यादि.) त्यांतील क्रियापदाचा अर्थ पुरा झाला नाहीं असें वाटतें. उजव्या बाजूच्या वाक्यांतील क्रियापदांचा अर्थ पूर्ण करण्याचें कार्य त्या त्या विशेषणांनीं झालें आहे; व तीं विशेषणें क्रियापदाचे द्वारें त्या त्या नामांनीं दर्शविलेल्या वस्तूंचा गुण दाखवितात. अशा विशेषणांना **विधिविशेषणें** असें म्हणतात.

व्याख्या:—**विशेषणाचा उपयोग जेव्हां वाक्यांतील क्रियापदाचा अर्थ पुरा करण्याकडे होतो तेव्हां त्या विशेषणास विधिविशेषण म्हणतात.** विधिविशेषणाचा नामाशीं जो संबंध असतो तो प्रत्यक्षपणें नसून क्रियापदाचे द्वारें असतो.

टीप:—एखादें विशेषण जेव्हां विधिविशेषण नसेल तेव्हां त्यास **अधिविशेषण** म्हणावें असें शास्त्रीय व्याकरणकार कै. दामले यांनीं सुचविलें आहे.

## अभ्यास.

**(१) खालील वाक्यांतील विशेषणें ओळखून त्यांतील विधिविशेषणें कोणतीं तें सांगा.**

(१) मला स्वच्छ कपडे आवडतात. (२) पोपटाचा रंग हिरवा असतो; परंतु त्याच्या चोंचीचा रंग लाल असतो. (३) ही घोंगडी मऊ वाटते; परंतु ही फारच राठ वाटते. (४) अशानें तूं त्याला वेडा करशील. (५) सोम्यानें पाट साफ केला. (६) रावणाचें अवाढव्य राज्य नष्ट झालें. (७) रात्रीं आईनें तो दरवाजा बंद केला. (८) ते गृहस्थ चाणाक्ष दिसले. (९) सूर्यनारायणाचे आरक्त किरण शांत समुद्राच्या पाण्यावर पडले. (१०) तीं उद्धट कारटीं एका क्षणांत

तुम्हाला मूर्ख ठरवितील. ( ११ ) मीं तुला मदत केली असती, पण तूं पळलास लबाड; तुझ्यावर भरंवसा कोणी ठेवावा ? ( १२ ) अहो ! आतां माझेच शब्द खरे ठरणार. ( १३ ) तुम्हीं पाठविलेले आंबे गोड निघाले. ( १४ ) आम्हीं पाठविलेलें धान्य कमी भरलें काय ? ( १५ ) त्यानें मला वेडा म्हटलें.

(२) विधिविशेषण म्हणजे काय? गुणविशेषण, संख्याविशेषण व सार्वनामिक विशेषण यांचा विधिविशेषणाप्रमाणें उपयोग करून दाखवा.

## विशेषणाचें व्याकरण करणें.

विशेषणाचें व्याकरण कसें करावयाचें तें खालील नमुन्यावरून दिसून येईल.

**चांगला मुलगा गर्विष्ठ नसतो.**

**चांगला**:—गुणविशेषण; पुल्लिंगी; एकवचनी 'मुलगा' या नामाचें.

**गर्विष्ठ**:— गुणविशेषण; 'मुलगा' या नामाचें; 'नसतो' या क्रियापदाचा अर्थ पूर्ण करतें म्हणून विधिविशेषणाप्रमाणें उपयोग.

## अभ्यास.

( ३ ) पहिल्या प्रश्नांत आलेल्या विशेषणांचें व्याकरण करा.

# खंड सहावें.

## क्रियापद-विचार

## प्रकरण पहिलें.

### सिद्ध धातु

#### धडा पहिला.

#### क्रियापदें, कृदन्तें, व धातु.

वाक्याचा उद्देश जो काहींतरी माहिती सांगणें किंवा काहींतरी माहिती विचारणें, किंवा एखादी आज्ञा करणें, किंवा मनांतील एखादी इच्छा प्रदर्शित करणें तो क्रियापदाचे योगानेंच पुरा होऊं शकतो ही गोष्ट आपण व्याकरण-प्रवेशिकेमध्यें पाहिलीच आहे. "तूं हा धडा" इतके शब्द उच्चारल्यावर बोलणाराच्या मनांत वरील चार गोष्टींपैकीं कोणती गोष्ट करावयाची होती किंवा आहे तें ऐकणाराला कांहींच समजत नाहीं. परंतु पुढें 'लिही' 'लिहिलास,' किंवा 'लिहिलास काय ?" यांपैकीं कोणतें तरी क्रियापद ठेवल्यास मात्र बोलणाराच्या मनांत वरील चारींपैकीं कोणती गोष्ट करावयाची होती तें स्पष्टपणें समजतें. **वाक्यार्थ पुरा करण्याची क्रिया** ज्या क्रियावाचक शब्दानें होऊं शकते त्या शब्दास क्रियापद असें म्हणतात.

**क्रियापदें ज्या मूळ शब्दास विकार होऊन झालेलीं असतात, त्यास धातु*असें म्हणतात.** जसें:-बस, ऊठ, नीज, इत्यादि. क्रिया-

*धातूला णें प्रत्यय लावून ओळखण्याचाही प्रचार आहे.

पदें हे धातूंना झालेले विकार होत. धातूंना दुसरेही विकार होत असतात; परंतु त्यांचे योगानें वाक्यार्थ पुरा होऊं शकत नाहीं. अशा धातुरूपांना कृदन्तें असें म्हणतात. करतो हें कर धातूपासून झालेलें क्रियापद आहे; कारण त्याचे योगानें माहिती देण्याचें काम होऊं शकतें. परंतु करून हें मात्र कर धातूपासून झालेलें कृदन्त आहे, कारण त्याचे योगानें माहिती देणें किंवा इतर कोणताही वाक्यार्थ पुरा होऊं शकत नाहीं.

ज्या धातुरूपाचे योगानें वाक्यार्थ पुरा करण्याचें काम होऊं शकतें त्या धातुरूपास क्रियापद असें म्हणतात; जसें:—हा धडा लिही. राजा चिरायु होवो ! जुलै महिन्यांत पाऊस पडतो. तूं काल कोठें होतास ? लिही, होवो, पडतो, व होतास, या धातुरूपांनीं आज्ञा करणें, इच्छा प्रदर्शित करणें, माहिती देणें, व माहिती विचारणें हे वाक्यार्थ अनुक्रमें पुरे केले आहेत. म्हणून हीं धातुरूपें क्रियापदें होत.

ज्या धातुरूपाचे योगानें वाक्यार्थ पुरा करण्याचें काम होऊं शकत नाहीं, त्या धातुरूपास कृदन्त असें म्हणतात. जसें "तूं शाळेत जातांना... .." या ठिकाणीं जातांना या धातुरूपानें माहिती देणें वगैरे वाक्यार्थांपैकीं एकही वाक्यार्थ पुरा झालेला नाहीं; म्हणून त्यास कृदन्त असें म्हटलें आहे

कोणत्याही धातूचीं क्रियापदरूपें सात प्रकारचीं होत असतात. धातूंच्या क्रियापदरूपांना आख्यातें असें म्हणतात. बस धातूचीं सर्व आख्यातें खालीं दिलीं आहेत; तीं त्यांच्या नावांसहित लक्षांत ठेवा.

| आख्यात. | अर्थावरून नाव. | प्रत्ययावरून नाव. |
| --- | --- | --- |
| रामा बसतो. | वर्तमानकाळ. | प्रथम ताख्यात. (तो+आख्यात =ताख्यात) |

रामा बसला. भूतकाळ. लाख्यात. ( ला+आख्यात=लाख्यात. )
रामा बसेल भविष्यकाळ. ईलाख्यात. (ईल+आख्यात=ईलाख्यात.)
रामा बसे. रीतिभूतकाळ. ईआख्यात.
रामा बसो. आज्ञार्थ. ऊआख्यात.
रामानें बसावें. विध्यर्थ. ( विधि+अर्थ. ) वाख्यात.
जर रामा बसता, संकेतार्थ. द्वितीय ताख्यात.
तर बरें झालें असतें.

बसतो, बसला, बसेल, वगैरे आख्यातांना कांहीं व्याकरणकार वर्तमानकाळ भूतकाळ, भविष्यकाळ याप्रमाणें त्यांचा वाक्यांत जो अर्थ असेल त्यावरून नांवें देतात. कित्येक व्याकरणकार मूळ धातूला जो प्रत्यय लागला असेल त्यावरून ताख्यात, लाख्यात, ईलाख्यात याप्रमाणे नांवें देतात. आख्यातांना अर्थावरून नांवें देण्यापेक्षां प्रत्ययावरून नांवें देणेंच अधिक चांगलें; कारण एकाच आख्याताचे निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळे अर्थ होऊं शकतात. प्रथम ताख्यात किंवा ज्याला वर्तमानकाळ असें म्हणतात त्यावरून कधीं कधीं भूत किंवा भविष्य-काळाचाही बोध होतो, तें खालील उदाहरणावरून दिसून येईल.

मी आतां शाळेंत जातों. — या ठिकाणीं जाण्याची क्रिया वर्तमानकाळीं घडत नसून ती थोड्या वेळानें म्हणजे भविष्यकाळीं घडणारी आहे म्हणून या ठिकाणीं जातों या आख्याताला अर्थावरून नांव द्यावयाचें असल्यास भविष्य-काळ किंवा संनिहित भविष्यकाळ असें नांव द्यावें लागेल. ( संनिहित म्हणजे जवळचा )

मी स्टेशनवर पोहोंचतों न पोहोंचतो तों गाडी चालू झाली — या ठिकाणीं पोहोंचतों या आख्यतावरून भूत-काळाचा बोध झाला आहे; म्हणून त्या आख्याताला अर्थावरून नांव द्यावयाचें झाल्यास भूतकाळ असें द्यावें लागेल

याकरितां आख्यातांना नांवें द्यावयाचीं तीं अर्थावरून न देतां प्रत्ययावरून द्यावीं हें जास्त चांगलें.

## अभ्यास.

(१) पुढील क्रियापदांचा वाक्यांत उपयोग करून त्यांना अर्थावरून व प्रत्ययावरून नांवें द्या.

बोलले, वाढतो, पडेल, चुकता, रमो, गावा, हरावें, जाता, जिंकील, चिरी, झाडों, आणी, रुचल, शिकतात, विसरतां, खेळतात.

(२) या धड्यामध्यें बस धातूचीं सर्व प्रकारचीं आख्यातरूपें दिलीं आहेत, त्याप्रमाणें पुढील धातूंचीं आख्यातरूपें तयार करा.

चढ, धांव, खेळ, नीज, ऊठ जा, तोड, काढ, घे, लाव, वाच.

(३) आख्यातांची एकूण संख्या किती? त्यांचीं नांवें सांगा.

(४) धातु, क्रियापद व कृदन्त यांतील साम्य व फरक उदाहरणें देऊन स्पष्ट करा.

(५) प्रथम ताख्यात व द्वितीय ताख्यात कसे ओळखावे?

---

## दुसरा.

## वाक्यांतील उपयोगावरून धातूंचें वर्गीकरण.

रामा काम **करतो**. हरी खालीं **बसतो**. कृष्णा **उठतो**. या वाक्यातील क्रियापदें हीं अनुक्रमें **कर**, **बस**, व **उठ** या धातूंचीं रूपें आहेत. **कर**, बस व ऊठ या धातूंनीं **करणें**, **बसणें** व **उठणें** या क्रिया दर्शविल्या जातात; आणि रामा, हरी व कृष्णा या शब्दांच्या योगानें त्या त्या क्रिया करणारे दर्शविले गेले आहेत. याप्रमाणें प्रत्येक धातुनें कोणती ना कोणती तरी क्रिया दर्शविली जाते व ती क्रिया करणारा

त्या शब्दानें दर्शविला जातो त्या शब्दास त्या धातूचा कर्ता असें म्हणतात.

वाक्यांतील उपयोगावरून धातूंचे किती प्रकार होतात तें आपल्याला या धड्यांत पाहावयाचें आहे.

| वाक्य. | निरीक्षण. |
| --- | --- |
| ( १ ) पक्षी उडतात.<br>( २ ) मासे पोंहतात. | या वाक्यांत क्रियापदांना त्यांचा अर्थ पुरा होण्याकरिता कर्त्याखेरीज दुसऱ्या कोणत्याही शब्दांची गरज लागलेली नाहीं. अशा क्रियापदांना अकर्मक क्रियापदें व त्यांमधील धातूंना अकर्मक धातू असें म्हणतात. |
| ( १ ) मी शहाणा आहें.<br>( २ ) तो राजा झाला. | या वाक्यांत नुसतें **मी आहें,** किंवा **तो झाला** असें म्हटलें असतें, तर **आहें** व **झाला** या क्रियापदांचा अर्थ पुरा झाला नसता. त्यांचा अर्थ पुरा होण्याकरितां पहिल्या वाक्यांत **शहाणा** हे **विशेषण,** व दुसऱ्या वाक्यांत **राजा** हें **नाम** आलें आहे. **शहाणा** व **राजा** या शब्दांचे संबंध अनुक्रमें **मी** व **तो** या कर्त्यांशीं आहेत. अशा क्रियापदांना **अपूर्णविधान अकर्मक क्रियापदें** असें म्हणतात; व **शहाणा** आणि **राजा** या शब्दांना **विधिशब्द** किंवा **वि**षयपूरक **शब्द** असें म्हणतात. |
| ( १ ) मी आंबा खातों.<br>( २ ) रामा पत्र लिहितो. | या वाक्यांत **आंबा** व **पत्र** हीं **नामें खातों** व **लिहितो** या क्रियापदांचे अर्थ पूर्ण करण्याकरिता आलीं आहेत. या नामांचा कर्त्यांशीं संबंध नसून तीं कर्त्यांपासून अगदीं स्वतंत्र आहेत. अशा क्रियापदांना **सकर्मक क्रियापदें** असें म्हणतात; व **आंबा, प**त्र |

| वाक्य. | निरीक्षण. |
| --- | --- |
| | या नामांना खातों व लिहितों या क्रियापदांचीं कर्मे असें म्हणतात. |
| त्यानें मला वेडा ठरविलें.<br>राजानें त्याला प्रधान केलें. | या वाक्यांत ठरविलें व केलें या क्रियापदाचे कर्ते अनुक्रमें त्यानें व राजानें असुन मला व त्याला हीं सर्वनामें त्यांचीं कर्मे आहेत. परंतु वेडा व प्रधान हे शब्द आल्याशिवाय ठरविलें व केलें या क्रियापदांचे अर्थ पूर्ण होऊं शकत नाहींत; व या शब्दांचे संबंध अनुक्रमें मला व त्याला या कर्मांशीं आहेत. अशा क्रियापदांना अपूर्णविधान सकर्मक क्रियापदें अशी संज्ञा असुन वेडा व प्रधान या शब्दांना विधिशब्द किंवा विधेयपूरक शब्द असें म्हणतात. |
| त्यानें मला प्रश्न विचारला.<br>त्यानें रामाला पुस्तक दिलें. | या वाक्यांतील क्रियापदांना दोन दोन कर्मे आहेत. अशा क्रियापदांना द्विकर्मक क्रियापदें असें म्हणतात. मला व रामाला या कर्मांना अप्रत्यक्ष कर्मे आणि प्रश्न व पुस्तक या कर्मांना प्रत्यक्ष कर्मे अशीं नांवें आहेत. |
| सांजावलें.<br>उजाडलें. | या शब्दांचे योगानें माहिती देण्याचें काम बरोबर झालें आहे. म्हणून हीं क्रियापदें आहेत. यांचा अर्थ पुरा होण्याकरितां कर्त्यांचीही जरूर लागत नाहीं. सांजावणें, उजाडणें या क्रिया करण्यास कोणी सांजावणारा किंवा उजाडणारा लागत नाहीं त्या आपोआपच होतात अशा क्रियापदांना अकर्तृक क्रियापदें असें म्हणतात. |

## या धड्यांत आपण काय शिकलों ?

( १ ) कित्येक धातू असे असतात कीं त्यांचा अर्थ पुरा होण्याकरितां कर्त्याखेरीज दुसऱ्या कोणत्याही शब्दाची जरूर नसते. अशा धातूंना **अकर्मक धातू** असें म्हणतात.

( २ ) कित्येक धातू असे असतात कीं त्यांचा अर्थ पुरा होण्याकरितां कर्त्याखेरीज दुसऱ्या एखाद्या **नामाची किंवा विशेषणाची** जरूर असते; व या नामाचा किंवा विशेषणाचा कर्त्याशीं संबंध असतो. अशा धातूंना **अपूर्णविधान अकर्मक धातू** असें म्हणतात; व ज्या विशेषणानें किंवा नामानें अपूर्णविधान अकर्मक धातूचा अर्थ पुरा होतो त्या विशेषणाला किंवा नामाला **विधिशब्द** किंवा **विधेयपूरक** असें म्हणतात.

( ३ ) कित्येक धातू असे असतात कीं त्यांचा अर्थ पुरा होण्याकरितां कर्त्याखेरीज दुसरें एखादें **नामच** लागतें; विशेषण चालत नाहीं. या नामाचा कर्त्याशीं कोणताही संबंध नसून त्याचे योगानें कर्त्याहून भिन्न अशी वस्तू दाखविली जाते. अशा क्रियापदांना **सकर्मक क्रियपदें** असें म्हणतात; व त्या नामाला **कर्म** असें म्हणतात.

( ४ ) कित्येक धातू असे असतात कीं त्यांचा अर्थ पुरा होण्याकरितां कर्ता व कर्म याशिवाय आणखी विधेयपूरकाची [ नाम किंवा विशेषण ] जरूर लागते; मात्र या विधेयपूरकाचा संबंध कर्त्याशीं नसून कर्माशीं असतो. अशा क्रियापदांना **अपूर्णविधान सकर्मक क्रियापदें** असें म्हणतात.

( ५ ) कित्येक धातू असे आहेत कीं त्यांचा अर्थ पुरा होण्याकरितां दोन कर्मांची जरूरी असते एक कर्म चतुर्थीत असुन दुसरें प्रथमेंत असतें. अशा क्रियापदांना **द्विकर्मक क्रियापदें** असें म्हणतात, दोन कर्मांपैकीं जे कर्म **प्रथमेंत** असते त्याला **प्रत्यक्ष कर्म** असें नाव असुन **चतुर्थीत** असलेल्या कर्माला **अप्रत्यक्ष कर्म** असें नाव आहे.

( ६ ) कित्येक धातू असे आहेत कीं त्यांचा अर्थ पुरा होण्याकरितां कोणत्याच शब्दाची (कर्त्याचीसुद्धां) जरूर लागत नाहीं. अशा क्रियापदांना **अकर्तृक क्रियापदें असें म्हणतात.**

पुढील कोष्टकावरून धातूंचें हें वर्गीकरण लक्षांत ठेवणें फार सोपें जाईल.

## अभ्यास.

**( १ ) वरील सहा प्रकारांपैकीं पुढील वाक्यांतील धातु कोणत्या प्रकारचे आहेत तें ओळखा.**

[ १ ] हा कपडा चांगला निघाला. [ २ ] तो वेडा दिसतो. [ ३ ] मी मूर्ख पडलों. [ ४ ] मी तें नाटक पाहिलें. [ ५ ] तुला फावलें तर ये. [ ६ ] त्याचे शब्द खोटे ठरले. [ ७ ] त्याला दोन गोष्टी सांग. [ ८ ] ते तुम्हाला उल्लू बनवितील. [ ९ ] परीक्षकांनीं तुला किती प्रश्न विचारले? [ १० ] तें घर जुनाट झालें म्हणून आम्ही नवीन बांधलें. [ ११ ] त्याची मुलें व्यसनी निजपलीं. [ १२ ] काल रात्रीं बारा वाजतां कापसाचे गंजीस एकाएकीं आग लागली.

**( २ ) वरील दिलेल्या धातूंचा त्यांचे पुढें कंसांत दर्शविल्याप्रमाणें उपयोग करून दाखवा.**

[ अ ] कांप, आटव, लोट, स्मर, वांक, मोड, [ सकर्मक व अकर्मक ].

[ आ ] पड, ठर, नीघ, दीस. [ अकर्मक व अपूर्णविधान अकर्मक ].

(१) कर, ठरव, बनव, म्हण, ( सकर्मक व अपूर्णविधान सकर्मक. )
(३) अपूर्णविधान अकर्मक धातू व सकर्मक धातू, आणि द्विकर्मक धातू व अपूर्णविधान सकर्मक धातू, यांत फरक काय ?
(४) विधेयपूरक व कर्म यामध्यें साम्य व फरक काय ?

## धडा तिसरा.

## धातूंचें आख्यात–विकरण.

ज्याप्रमाणें नामाला विभक्तिप्रत्यय लागून नामाचा वाक्यांतील इतर शब्दांशीं संबंध दाखविण्याकरितां विभक्तिरूपें होतात, त्याप्रमाणें धातूला आख्यातप्रत्यय लागून वाक्यार्थ ( माहिती सांगणें किंवा विचारणें, आज्ञा करणें व इच्छा प्रदर्शित करणें ) पुरा करण्याकरितां आख्यातरूपें म्हणजे क्रियापदें होतात. विभक्तीचीं ज्याप्रमाणें उभयवचनी रूपें होतात त्याचप्रमाणें क्रियापदांचीं तिन्ही लिंगी व उभयवचनी रूपें होतात. बस व कर हे धातू खालीं सर्व आख्यातामध्यें चालवून दाखविले आहेत.

### वर्तमानकाळ किंवा प्रथम ताख्यात.

### पुल्लिंगी.

बस धातु.

| एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|
| मी बसतों. | आम्ही बसतों. |
| तूं बसतोस. | तुम्ही बसतां. |
| तो बसतो. | ते बसतात. |

कर धातु.

| | |
|---|---|
| मी करतों, करितों. | आम्ही करतों, करितों. |
| तूं करतोस, करितोस. | तुम्ही करतां, करितां. |
| तो करतो, करितो. | ते करतात, करितात. |

## स्त्रीलिंग.

मी वसतें-त्यें. आम्ही वसतों.
तूं वसतेस-त्येस-तीस तुम्ही वसतां.
ती वसते-त्ये-ती. त्या वसतात.
मी करतें-त्यें. आम्ही करतों, करितों.
करितें-त्यें.
तूं करतेस-त्येस-तीस. तुम्ही करतां, करितां.
करितेस-त्येस-तीस.
ती करते-त्ये-ती. त्या करतात, करितात.
करिते-त्ये-ती.

## नपुंसकलिंग.

मी — आम्ही —
तूं — तुम्ही —
तें वसतें. ती वसतात.

मी — आम्ही —
तूं — तुम्ही —
तें-करतें. करितें, तीं करतात, करितात.

## निरीक्षण.

(१) प्रथम ताख्याताचे प्रत्यय खालीलप्रमाणें आहेत:—

| पुरुष. | एकवचन. | | | अनेकवचन | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | पुल्लिंग | स्त्रीलिंग | नपुंसकलिंग | पुल्लिंग | स्त्रीलिंग | नपुंसकलिंग |
| प्र. पु. | तो | तें त्यें | — | तों | तों. | — |
| द्वि. पु. | तोस | तेस, त्येस तीस | — | तां | तां | — |
| तृ. पु. | तो | ते, त्ये, ती. | तें. | तात. | तात. | तात. |

(२) हे सर्व प्रत्यय व्यंजनादि आहेत, म्हणजे यांचा आरंभ व्यंजनानें [ त् ] झालेला आहे.

(३) वस धातु अकर्मक आहे त्याला हे प्रत्यय अपेक्षेच्या तसे लागले आहेत, याप्रमाणें सर्व अकर्मक धातूंना हे प्रत्यय अपेक्षेच्या तसे लागतात.

(४) कर धातु सकर्मक आहे. त्याला हे प्रत्यय लागतांना प्रत्ययाचे अगोदर इ*हें अक्षर विकल्पेंकरून आलें आहे. बऱ्याचश्या सकर्मक धातूंना हे प्रत्यय लागण्यापूर्वी विकल्पेंकरून इ हा आगम ऽ होतो.

(५) परंतु कांहीं थोडे सकर्मक धातु असे आहेत कीं त्यांना इ आगम मुळींच होत नाहीं. जसें; उमजतो. [उमज धातूचें 'उमजितो' असें रूप होत नाहीं.] समजतो, चावतो, चुकतो, खेळतो, इत्यादि. अशा धातूंना उमज गणांतील धातु असें म्हणतात.

(६) एकाक्षरी धातूंना-मग ते सकर्मक असोत किंवा अकर्मक असोत-हे प्रत्यय लागण्यापूर्वी आगम होत नाहीं जसें:—जातो, येतो.

(७) धातु ईकारान्त किंवा ऊकारान्त असल्यास हे प्रत्यय लागण्यापूर्वी याचा अंत्य स्वर ऱ्हस्व होतो; जसें धू, धुतो; पी, पितो.

(८) बोलणारी व्यक्ति किंवा जिचेजवळ बोलावयाचें ती व्यक्ति ही पुरुष किंवा स्त्री यांपैकींच कोणीतरी असल्यामुळें प्रथम पुरुषी व द्वितीय पुरुषी नपुंसकलिंगी क्रियापदें भाषेंत दिसून येत नाहींत.

(९) या आख्यातांतील रूपें कर्त्याच्या लिंगवचनपुरुषाप्रमाणें बदलणारीं आहेत. वाक्यांतील ज्या शब्दाच्या लिंगवचनपुरुषांप्रमाणें क्रियापदाचें रूप बदलतें त्या शब्दास धातुरूपेश (धातुरूप+ईश) असें म्हणतात. धातुरूपेश नेहमीं प्रथमा विभक्तींत असतो.

## संकेतार्थ किंवा द्वितीय आख्यात.

### पुल्लिंग.

| बस धातु. | व | कर धातु. |
|---|---|---|
| एकवचन. | | अनेकवचन. |
| [कर] मी बसतों. | | [कर] आम्ही बसतों. |

*कर+इ मिळून 'करे' असें रूप संधिनियमाप्रमाणें व्हावयास पाहिजे होतें परंतु अ आणि इ या दोन स्वरांबद्दल इ हा पुढचा एकच स्वर राहिला आहे. अशा संधीच्या प्रकारास पररूपसंधि असें म्हणतात. धातूंना स्वरादि प्रत्यय लागतांना असे संधि फार होतात.

ऽ दोन वर्णांच्यामध्यें दोहों वर्णांव्यतिरिक्त तिसरा वर्ण येतो, त्याला आगम होणें असें म्हणतात.

(जर) तूं बसतास, (जर) तुम्ही बसतां,
(जर) तो बसता, (जर) ते बसते,

---

(जर) मी करतों, करितों, (जर) आम्ही करतों, करितों,
(जर) तूं करतास करितास, (जर) तुम्ही करतां, करितां,
(जर) तो करता, करिता. (जर) ते करते, करिते.

## स्त्रीलिंग.

(जर) मी बसतें स्यें. (जर) आम्ही बसतों,
(जर) तूं बसतीस, (जर) तुम्ही बसतां,
(जर) ती बसती, (जर) त्या बसत्या,

---

(जर) मी करतें, स्यें, करितें, स्यें, (जर) आम्ही करतों, करितों,
(जर) तूं करतीस, करितीस, (जर) तुम्ही करतां, करितां,
(जर) ती करती करिती, (जर) त्या करत्या, करित्या,

## नपुंसकलिंग.

(जर) मी— (जर) आम्ही—
(जर) तूं— (जर) तुम्ही—
(जर) तें बसतें, (जर) तीं बसतीं,
(जर) मी— (जर) आम्ही—
(जर) तूं— (जर) तुम्ही—
(जर) तें करतें करितें, (जर) तीं करतीं, करितीं.

## निरीक्षण.

१ द्वितीय ताख्याताचे प्रत्यय खालीलप्रमाणें आहेत:—

| पुरुष | एकवचन, | | | अनेकवचन. | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | पुल्लिंग | स्त्रीलिंग | नपुंसकलिंग | पुल्लिंग | स्त्रीलिंग | नपुंसकलिंग |
| प्र. पु. | तों | तें स्यें | — | तों | तों | — |
| द्वि. पु. | तास | तीस | — | तां | तां. | — |
| तृ. पु | ता | ती | तें. | ते | त्या | तीं. |

(२) प्रथम ताख्यातांतील प्रत्ययांप्रमाणें हे सर्व प्रत्यय व्यंजनादि असल्यामुळें (अ) अकर्मक धातूंना जसेच्या तसेच लागतात; (आ) बऱ्याचशा सकर्मक धातूंना हे लागण्यापूर्वी इ हा आगम विकल्पानें होतो; (इ) सकर्मक धातूंतील उमजगणाच्या धातूंना हा आगम मुळींच होत नाहीं (ई) एकाक्षरी धातूंना आगम मुळींच होत नाहीं; व (उ) धातु ईकारान्त किंवा ऊकारान्त असल्यास प्रत्यय लागण्यापूर्वी अन्त्य स्वर ऱ्हस्व होतो.

भूतकाळ किंवा लाख्यात.

## पुल्लिंगी.

बस धातु

| एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|
| मी बसलों. | आम्ही बसलों. |
| तूं बसलास. | तुम्ही बसलां-लांत लेत. |
| तो बसला. | ते बसले. |

उमज धातु.

| | |
|---|---|
| मी उमजलों. | आम्ही उमजलों. |
| तूं उमजलास. | तुम्ही उमजलां-लांत-लेत. |
| तो उमजला. | ते उमजले. |

## स्त्रीलिंग.

| | |
|---|---|
| मी बसलें-ल्यें. | आम्ही बसलों. |
| तूं बसलीस. | तुम्ही बसलां-लांत-ल्यात. |
| ती बसली. | त्या बसल्या. |
| मी उमजलें-ल्यें. | आम्ही उमजलों. |
| तूं उमजलीस. | तुम्ही उमजलां-लांत-ल्यात. |
| ती उमजली. | त्या उमजल्या. |

## नपुंसकलिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी— | आम्ही— | मी— | आम्ही— |
| तूं— | तुम्ही— | तूं— | तुम्ही— |
| तें बसलें, तीं बसलीं. | | तें उमजलें, तीं उमजलीं. | |

## निरीक्षण.

[ १ ] आख्याताचे प्रत्यय खालीलप्रमाणें आहेत.

| पुरुष. | एकवचन. | | | अनेकवचन. | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | पुल्लिंग | स्त्रीलिंग | नपुंसकलिंग | पुल्लिंग | स्त्रीलिंग | नपुंसकलिंग |
| प्र. पु. | लों. | लें ल्यें | —— | लों. | लों. | —— |
| द्वि. पु. | लास. | लीस. | —— | लां, लांत लेत. | ला. लात ल्यात. | —— |
| तृ. पु. | ला. | ली. | लें. | ले. | ल्या. | लीं. |

[ २ ] हे प्रत्यय व्यंजनादि आहेत.

[ ३ ] अकर्मक धातूंना हे प्रत्यय जसेच्या तसे लागतात.

[ ४ ] उमज धातूच्या गणांतील धातूंखेरीज इतर सकर्मक धातूंना हे प्रत्यय लागून झालेलीं आख्यातें कर्त्यांच्या लिंगवचनपुरुषांप्रमाणें फिरत नसून कर्मांच्या लिंगवचनपुरुषांप्रमाणें फिरतात. उमज धातूच्या गणांतील क्रियापदें मात्र कर्त्यांच्या लिंगवचनपुरुषांप्रमाणें फिरतात. क्रियापद कर्त्यांच्या लिंगवचनपुरुषांप्रमाणें बदलणारें असलें म्हणजे त्याला **कर्तरि** क्रियापद असें म्हणतात; व कर्मांच्या लिंगवचनपुरुषांप्रमाणें बदलणारें असलें म्हणजे त्याला **कर्मणि** क्रियापद असें म्हणतात.

[ ५ ] बऱ्याच धातूंना आख्यातप्रत्यय लागतांना मूळ धातूंच्या रूपांमध्यें निरनिराळे फेरफार होत असतात; त्यापैकीं कांहीं पुढें दिले आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| निघ | निघाला. | म्हण | म्हणाला. |
| पळ | पळाला. | रड | रडाला, रडला. |
| बूड | बुडाला. बुडला. | नीव | निवाला, निवला. |
| वीस | विसाला. विसला. | बूज | बुजाला. बुजला. |
| घे | घेतला. | माग | मागितला. |
| धू | धुतला. | सांग | सांगितलें. |
| बघ | बघितला. | म्हण | म्हटलें. म्हणालें. |
| घाल | घातला. | कर | केलें. |
| पी | प्याला. | पी | प्यालीं. |

| | | | |
|---|---|---|---|
| भी | भ्याला. | ये | आला. |
| हो | झाला. | जा | गेला. |

विध्यर्थ किंवा वाख्यात.

(अ) अकर्मक धातूः—

अकर्मक धातूला वाख्याताचे प्रत्यय लागून होणारीं क्रियापदें [१] बहुतकरून भावी व कधीं कधीं [२] कर्तरि असतात.

बस धातु.

भावी क्रियापद.

(त्यानें) बसावें.

क्रियापद भावी असल्यामुळें कर्ता कोणत्याही पुरुषाचा, लिंगाचा किंवा वचनाचा असला तरी क्रियापदाचें रूप नेहमीं तृतीय पुरुषी नपुंसकलिंगी एकवचनीं असतें वर त्यानें या कर्त्यांच्याऐवजी त्यांनीं, तिनें, मीं, आम्हीं हे कर्ते ठेवून पहा.

बस धातु.

कर्तरि क्रियापद.

पुल्लिंग.

| | |
|---|---|
| मी बसावा.* | आम्ही बसावे * |
| तूं बसावास. | तुम्ही बसावेत. |
| तो बसावा. | ते बसावे. |

स्त्रीलिंग.

| | |
|---|---|
| मी बसावी. | आम्ही बसाव्या. |
| तूं बसावीस. | तुम्ही बसाव्यात. |
| ती बसावी. | त्या बसाव्या. |

नपुंसकलिंग.

| | |
|---|---|
| मी— | आम्ही — |
| तूं— | तुम्ही — |
| तें बसावें. | तीं बसावीं. |

*दामले, जोशी, वगैरे प्रमुख व्याकरणकारांनीं हीं रूपें वाख्याताचीं [विध्यर्थाचीं] प्रथमपुरुषीं म्हणून दिलीं आहेत. परंतु हीं प्रचारांत आहेत असें म्हणता येत नाहीं. आपल्या वाचण्यांत किंवा ऐकण्यांत अशीं रूपें फारशीं येत नाहींत.

(आ) सकर्मक धातूः—

सकर्मक धातुला वाख्याताचे प्रत्यय लागून होणारीं क्रियापदें नेहमीं (१) कर्मणि किंवा (२) भावी असतात. प्रथमपुरुषवाचक व द्वितीयपुरुषवाचक सर्वनामें कर्माचे जागीं चतुर्थी विभक्तीत असल्यामुळें क्रियापद नेहमी भावी असतें. सकर्मक क्रियापदाची वाख्यातातील रूपें खालीं चालवून दाखविलीं आहेत.

कर धातु.
कर्मणि क्रियापद.
तृतीय पुरुष.

| | | |
|---|---|---|
| पुल्लिंगः— | (त्यानें) तो (घडा) करावा. | त्यानें ते (घडे) करावे. |
| स्त्रीलिंगः— | (त्यानें) ती (वही) करावी. | त्यानें त्या (वह्या) कराव्या. |
| नपुंसकलिंगः- | (त्यानें) तें (काम) करावें. | त्यानें तीं (कामें) करावीं. |

मार धातु.
भावी क्रियापद.
त्यानें मला मारावें.

आतापर्यंत आपण प्रथम व द्वितीय ताख्यात, लाख्यात व वाख्यात या आख्याता-मध्यें धातु चालविले. या आख्यातातील क्रियापदांना लिंग, वचन व पुरुष यांचा विकार होतो. परंतु ई-आख्यात, ईलाख्यात व ऊ-आख्यात यांतील क्रिया-पदांना लिंगाचा विकार होत नसून फक्त वचन व पुरुष यांचाच विकार होतो हें पुढें त्या त्या आख्यातामध्यें चालविलेल्या धातूंवरून दिसून येईल.

भविष्यकाळ किंवा ईलाख्यात.

बस धातु.

| एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|
| मी बसेन | आम्ही बसूं. |
| तूं बसशील. | तुम्ही बसाल. |
| तो / ती / तें — बसेल. | ते / त्या / तीं — बसतील |

कर धातु.

| एकवचन | अनेकवचन. |
|---|---|
| मी करीन | आम्ही करूं |
| तू करशील, करिशील | तुम्ही कराल. |
| तो / ती / तें — करील. | ते / त्या / तीं — करतील. करितील. |

## निरीक्षण.

( १ ) ईंआख्यातीं क्रियापदाला लिंगानुसार विकार होत नाहींत.
( २ ) ईंआख्याताचे प्रत्यय खालीं दिल्याप्रमाणें आहेत.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्रथम पुरुष. | एन ( अकर्मक )<br>ईन ( सकर्मक ) | ऊं. |
| द्वितीय पुरुष. | शील. | आल. |
| तृतीय पुरुष. | एल ( अकर्मक )<br>ईल ( सकर्मक ) | तील. |

टीपः—( १ ) उमज गणांतील धातूंना—जरी ते सकर्मक आहेत तरी-प्रथम पुरुषीं व तृतीय पुरुषीं एकवचनीं अकर्मक प्रत्ययच लागतात; जसें—उमजेन, म्हणेन, खेळेन, इत्यादि.

( २ ) एकाक्षरी धातूंना—ते सकर्मक असोत किंवा अकर्मक असोत-प्रथम-पुरुषीं एकवचनीं ईन व तृतीय पुरुषीं ईल हे प्रत्यय लागतात.

( ३ ) शील व तील हे प्रत्यय व्यंजनादि असल्यामुळें हे लागतांना ( उमज गणांतील धातूखेरीज ) सकर्मक धातूंना विकल्पेंकरून इ हा आगम होतो.

## रीतिभूतकाळ किंवा ईंआख्यात.

| बस धातु | | कर धातु. | |
|---|---|---|---|
| एकवचन. | अनेकवचन. | एकवचन. | अनेकवचन |
| मी बसें. | आम्ही बसूं. | मी करीं. | आम्ही करूं. |
| तूं बसस. | तुम्ही बसा. | तूं करीस. | तुम्ही करस, करा. |
| तो, ती, तें बसे. | ते, त्या, तीं बसत. | तो, ती, तें करी. | ते, त्या, तीं करीत. |

## निरीक्षण.

( १ ) ई आख्यातांतील क्रियापदाला लिंगानुसार विकरण होत नाहीं.
( २ ) ई आख्याताचे प्रत्यय खालीलप्रमाणें आहेत.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्रथम पुरुष. | एं ( अकर्मक )<br>ईं ( सकर्मक ) | ऊं |
| द्वितीय पुरुष | स | आ, आं. |
| तृतीय पुरुष | ए ( अकर्मक )<br>ई ( सकर्मक ) | त. |

( ३ ) या आख्यातांत अकर्मक धातूंस प्रथम पुरुषीं एकवचनीं एं आणि तृतीय पुरुषीं एयवचनीं ए हे प्रत्यय लागतात; परंतु सकर्मक धातूंस अनुक्रमें ईं आणि ई हे प्रत्यय लागतात.

( ४ ) उमज गणांतील धातूंस मात्र प्रथम पुरुषीं व तृतीय पुरुषीं एकवचनीं अकर्मक धातूंना लागणारे प्रत्यय लागतात; जसें:—उमजे, समजे, म्हणे, बोले.

( ५ ) एकाक्षरी धातूंना प्रथम पुरुषीं व तृतीय पुरुषीं एकवचनीं अनुक्रमें ईं व ई हे प्रत्यय लागतात; जसें:—घेईं, खाईं, धुईं, किंवा धुवीं.

आज्ञार्थ किंवा ऊ—आख्यात.

**बस धातु.**

| एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|
| मी बसूं ? | आम्ही बसूं ? |
| तूं बस. | तुम्ही बसा. |
| तो, ती, तें बसो. | ते, त्या, तीं बसोत |

**कर धातु.**

| एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|
| मी करूं ? | आम्ही करूं ? |
| तूं कर. | तुम्ही करा. |
| तो, ती, तें करो. | ते, त्या, तीं करोत. |

## निरीक्षण.

( १ ) ऊआख्यातांतील क्रियापदांना लिंगानुसार विकार होत नाहीं.

( २ ) ऊआख्यातांतील प्रत्यय खालीलप्रमाणें आहेत.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन |
|---|---|---|
| प्र. पु. | ऊं. | ऊं. |
| द्वि. पु. | मुळ धातु असाच्या तसा रहातो. | आ. |
| तृ. पु. | ओ. | ओत. |

( ३ ) ऊ आख्यातांतील प्रत्यय सकर्मक व अकर्मक धातूंकरितां सारखेच आहेत.

---

### धडा चवथा.

## कांहीं अनियमित धातूंचें विकरण.

धातुना आख्याप्रत्यय लागून क्रियापदें कशीं बनतात व त्यांचे वाक्यामध्यें निरनिराळे अर्थ कसे होतात, हें आपण मागील दोन धड्यामध्यें पाहिलें. या धड्यामध्यें आपल्याला कांहीं चमत्कारिक रीतिनें चालणाऱ्या क्रियापदांची माहिती करून घ्यावयाची आहे.

( १ ) आहे हें क्रियापद मराठी भाषेमध्यें अगदीं प्रचारांतलें आहे हें क्रियापद खालीं दाखविल्याप्रमाणें चालतें. याला लिंगाचे विकार होत नाहींत.

| | |
|---|---|
| मी आहें. | आम्ही आहों. |
| तूं आहेस. | तुम्ही आहां, आहांत. |
| तो / ती / तें } आहे. | ते / त्या / तीं } आहेत. |

या क्रियापदांतील मूळ धातु कोणता ? व या धातूचें हे कोणत्या आख्याताचें रूप आहे ?

( अ ) अर्थावरून पाहूं गेलें असतां हें क्रियापद अस धातूचें वर्तमान काळाचें रूप आहे, असें म्हटलें पाहिजे. ज्याप्रमाणें करतो हें क्रियापद कर धातूचा वर्तमानकाळ दाखवितें त्याप्रमाणें आहे हें क्रियापद अस धातूचा वर्तमानकाळ दाखवितें.

( आ ) प्रत्ययांवरून पाहूं गेलें असतां ई आख्याताचे प्रत्यय आह् या धातूला थोड्याबहुत अनियमितपणानें लागून हीं रूपें झालेलीं दिसतात. आतां आह् हा धातु मराठी भाषेमध्यें प्रचारांत नाहीं. त्याचीं "आहतो, आहला, आहेल" इत्यादि इतर आख्यातांचीं रूपें भाषेंत आढळत नाहींत. कोणत्याही क्रियापदाचें आख्यात ठरवावयाचें तें अर्थावरून व ठसितो प्रत्ययांवरून आतांपर्यंत आपण

ठरवीत आल्यामुळें हें क्रियापद आहे या ( पूर्वी केव्हांतरी प्रचारांत असलेल्या ) धातूचें ई आख्याताचें रूप आहे असेंच म्हटलें पाहिजे.

( इ ) आहे हें क्रियापद जरी ई आख्यातांतलें असलें तरी ई आख्यातांतील इतर क्रियापदांप्रमाणें या क्रियापदाला रीतिभूतकाळाचा अर्थ नसून वर्तमानकाळाचा आहे.

( २ ) होता हें दुसरें क्रियापद मराठी भाषेमध्ये सगळीं प्रचारांतलें असें आहे. हें खालीं दाखविल्याप्रमाणे चालतें. याला लिंगाचा विकार होतो.

| पुल्लिंगी. | | स्त्रीलिंगी. | |
|---|---|---|---|
| मी होतों. | आम्ही होतों. | मी होतों, होत्यें. | आम्ही होतों. |
| तूं होतास | तुम्ही होतां. | तूं होतीस. | तुम्ही होतां. |
| तो होतो. | ते होते. | ती होती. | त्या होत्या. |

नपुंसकलिंगी.

| | |
|---|---|
| तें होतें. | तीं होतीं. |

**टीपः**—( अ ) प्रत्ययावरून पहातां हीं रूपें हो धातूच्या द्वितीय ताख्याताचीं आहेत हें उघड आहे. परंतु द्वितीय ताख्यातांतील इतर क्रियापदांप्रमाणें यांना संकेताचा अर्थ नसून अस धातूच्या भूतकाळाचा अर्थ आलेला आहे; जसें:— तो आजारी आहे. तो आजारी होता.

( आ ) यांचा संकेतार्थ अजिबात नष्ट झाला आहे असें मात्र नाहीं; हो धातूच्या संकेतार्थीही हींच रूपें येतात; जसें:—जर तूं मागच्या वर्षी पास होतास तर आज तुला स्कॉलरशिप मिळाली असती.

( ३ ) आहे व होता या क्रियापदांनीं अस धातूच्या वर्तमान व भूतकाळाच्या रूपाचें काम होऊं लागल्यामुळें अस धातूच्या प्रथमताख्यात (वर्तमानकाळ व लाख्यात ( भूतकाळ ) या रूपांना अनुक्रमें रीतिवर्तमानकाळाचा व संकेताचा अर्थ भाषेमध्यें मिळाला आहे; जसें:—

( अ ) हा मुलगा आजारी असतो:-रीतिवर्तमानकाळ.

( आ ) तूं आजारी असलास तर शाळेंत येऊं नकोः-संकेतार्थ.

(४) होय हें क्रियापद बहुतेक आहे या अर्थीचेंच आहे. हो धातूच्या ई आख्याताच्या रूपांत (होई) फरक होऊन हें झालें आहे. हे खालीं दाखविल्याप्रमाणें चालतें.

| | |
|---|---|
| मी होय. | आम्ही होय. |
| तूं होस. | तुम्ही व्हा, व्हां. |
| तो होय. | ते होत. |

टीपः—हें क्रियापद जरी ई-आख्यातांतील असलें तरी ई-आख्यातांतील क्रियापदांप्रमाणें त्याला रीतिभूतकाळाचा अर्थ नसून निश्चयार्थक वर्तमानकाळाचा अर्थ भाषेमध्यें मिळालेला आहे.

(५) पाहिजे हें आणखी एक अनियमित क्रियापद आहे. हें मूळ पाह धातूपासून झालें आहे. कवितेमध्यें बोलिजे, म्हणिजे हीं रूपें ज्याप्रमाणें बोल, म्हण या धातूंपासून झालेलीं दिसतात, त्याचप्रमाणें पाह धातूंपासून पाहिजे हें रूप झालें. याचा अर्थ मात्र मूळ धातूच्या अर्थाहून अगदीं निराळा आहे. हें खालीं दाखविल्याप्रमाणें चालतें.

| | |
|---|---|
| (आज्ञा) मी पाहिजे. | आम्ही पाहिजे. |
| तूं पाहिजेस. | तुम्ही पाहिजे. |
| तो पाहिजे. | ते पाहिजेत. |

आतांपर्यंत वर आलेल्या क्रियापदांचीं नकारार्थक क्रियापदें (यांना अकरणरूपी क्रियापदे म्हणतात) खालीं दिलीं आहेत. त्यांचेमध्येंही वरील क्रियापदांप्रमाणें अनियमितपणा दिसून येईल. तीं खालीं दाखविल्याप्रमाणें चालतात.

(६) नाहीं हें आहे या क्रियापदाचें अकरणरूप आहे. यांतील मूळ धातु नाह असा असून त्याचें हें ई आख्यातीं रूप आहे.

| | |
|---|---|
| मी नाहीं. | आम्ही नाहीं. |
| तूं नाहींस. | तुम्ही नाहीं. |
| तो, ती, तें } नाहीं. | ते, त्या, तीं } नाहींत. |

टीपः—प्रथम ताख्यात, लाख्यात व ईलाख्यात या आख्यातांतील क्रियापदांचें अकरणरूप साधण्याला नाहीं या क्रियापदाचें साहाय्य होतें, जसें:— जातों; जात नाहीं; गेला, गेला नाहीं; जाईल, जाणार नाहीं.

(७) नव्हता हें क्रियापद नहो धातूचें द्वितीय ताख्याताचें रूप असून होता या क्रियापदाचें अकरणरूप आहे. हें क्रियापद खालीं दाखविल्याप्रमाणें चालतें.

| | |
|---|---|
| मी नव्हतों. | आम्ही नव्हतों. |
| तूं नव्हतास. | तुम्ही नव्हतां. |
| तो नव्हता. | ते नव्हते. |

(८) नस (न+अस) धातु हा अस धातूचा अकरणरूपी धातु आहे. याच्या प्रथम ताख्यातांच्या व लाख्यातांच्या रूपांना अनुक्रमें रीतिवर्तमानकाळ व संकेत यांचा अर्थ मिळालेला आहे; जसें:—

(१) तो सकाळचा कामावर नसतो:—रीतिवर्तमान,

(२) तूं आजारी नसलास तर शाळेंत ये:—संकेत,

टीपः—ई आख्यात व द्वितीय ताख्यात यांतील क्रियापदांचें अकरणरूप साधण्याला नस धातूच्या त्या त्या आख्यातांतील रूपांचें साहाय्य होतें, जसें:—

तो लवकर जाई; तो लवकर जात नसे.

जर तूं जातास......जर तूं गेला नसतास..........

(९) नव्हे हें क्रियापद होय क्रियापदाचें अकरणरूप आहे. तें नहो धातूच्या ई आख्यातांतील रूप आहे. तें खालीं दाखविल्याप्रमाणें चालतें

| | |
|---|---|
| मी नव्हे. | आम्ही नव्हों. |
| तूं नव्हेस, नव्हस. | तुम्ही नव्हा, नव्हां. |
| तो, ती, तें } नव्हे. | ते, त्या, तीं } नव्हत. |

(१०) नको हें क्रियापद पाहिजे याचें अकरणरूप आहे. तें पुढें दाखविल्याप्रमाणें चालतें.

(त्याला) मी नको. आम्ही नको.
तूं नकोस. तुम्ही नको.
तो, ती, तें नको. ते, त्या, तीं नकोत.

टीपः—ऊ आख्यातांतील प्रथम व द्वितीय पुरुषी क्रियापदाचें अकरणरूप साधण्याला या क्रियापदाची मदत होते; या वेळीं द्वितीय पुरुषी अनेकवचनी रूप नका असें होतें. ऊ—आख्यातांतील तृतीय पुरुषाचें अकरणरूप क्रियापदाचे मागें न हें अव्यय ठेविल्यानें साधतें. जसें:—

मी, आम्ही जाऊं? — मी, आम्ही जाऊं नको?
तूं जा. — तूं जाऊं नको.
तुम्ही जा. — तुम्ही जाऊं नका.
तो, ती, तें जावो. — तो, ती, तें न जावो.
ते, त्या, तीं जावोत. — ते, त्या, तीं न जावोत.

( ११ ) नये या क्रियापदाचा उपयोग वाक्यांतातील क्रियापदांचें अकरणरूप करण्याकडे होतो; जसें:—त्यानें जावें, त्यानें जाऊं नये. हें क्रियापद नये ( न+येणें ) धातूचें ई—आख्यातांचें रूप आहे असें व्याकरणकार म्हणतात. याची नयेस व नयेत हीं द्वितीय पुरुषीं अनेकवचनी व तृतीय पुरुषीं अनेकवचनी रूपें भाषेंत प्रचारांत आहेत.

( १२ ) नलगे म्हणून एक क्रियापद भाषेमध्यें दिसून येतें. हें पाहिजे याच्या नकारार्थी योजतात; जसें:—'मला औषध नलगे'. हें क्रियापद नलगे ( न+लागणें ) धातूचें ई आख्यातांतील रूप आहे. हें खालीं दाखविल्याप्रमाणें चालतें.

मी नलगें. आम्ही नलगों.
तूं नलगस, नलगेस. तुम्ही नलगा, नलगां.

| | | | |
|---|---|---|---|
| तो, ती, तें | नलगे. | ते, त्या, तीं | नलगत, नलगेत. |

---

## धडा पांचवा.

## आख्यातांचे अर्थ.

आख्यातांचा म्हणजे धातूंपासून झालेल्या क्रियापदाचा मुख्य उपयोग माहिती सांगणें, विचारणें वगैरे वाक्यार्थांपैकीं कोणता तरी वाक्यार्थ पुरा करणें हा आहे ही गोष्ट आपण मागें पाहिलीच आहे. त्याशिवाय **क्रियापदावरून वर्तमान, भूत, भविष्य या काळांचा व आज्ञा, प्रार्थना, संभव, उद्देश वगैरे निरनिराळ्या अर्थांचा बोध होत असतो.** या धड्यामध्यें प्रत्येक आख्यातानें कोणकोणते अर्थ दर्शविले जातात तें आपणास पहावयाचें आहे.

### प्रथम ताख्यात किंवा वर्तमानकाळ.

| उदाहरणें. | अर्थाचें नांव. | स्पष्टीकरण. |
|---|---|---|
| रामा पुस्तक वाचतो. तो जातो. | वर्तमानकाळ | हा या आख्याताचा मुख्य अर्थ आहे. बोलण्याचे किंवा लिहिण्याचे वेळीं अमुक एक गोष्ट घडते असा अर्थ असतां या आख्याताचा उपयोग होतो. |
| पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते. दोन आणि दोन मिळून चार होतात. | स्थिरसत्य, | अमुक एक गोष्ट सर्वकाळीं व सर्व स्थळीं खरी आहे, बदलणारी नाहीं अशें सांगावयाचें असतां या आख्याताचा उपयोग होतो. |

| उदाहरण | अर्थ | स्पष्टीकरण |
|---|---|---|
| सूत शौनकास सांगतो. शुक्राचार्य परीक्षितीस म्हणतात. | ऐतिहासिक. वर्तमान. | मागें घडून गेलेल्या गोष्टी जणू काय बोलणाऱ्याच्या डोळ्यासमोर घडत आहेत असें वर्णन करितांना या आख्याताचा उपयोग होतो. |
| "तुम्ही कधीं आला?" "हा येतों इतकाच." घंटा वाजते न वाजते तोंच गुरुजी वर्गांत आले. | संनिहित. भूतकाळ. | भाषणाचे काळाचे किंवा दुसरी एखादी गोष्ट घडण्याचे जरा पूर्वी असुक एक गोष्ट घडली असें वर्णन करावयाचें असतां या आख्याताचा उपयोग करितात. |
| मी आतां शाळेंत जातों. मी आतां ही गोष्ट तुझ्या बापास सांगतों. | भविष्यकाळ. | भाषणाचें काळानंतर लगेच अमुक एक गोष्ट घडावयाची आहे असें सांगावयाचें असतां या आख्याताचा उपयोग करितात. |
| तो नेहमीं उशिरां येतो. तो दुपारचा निजतो. | रीतिवर्तमान. | अमुक एक गोष्ट नेहमीं होते असें दाखवावयाचें असतां या आख्याताचा उपयोग होतो. |

## भूतकाळ किंवा लाख्यात.

| उदाहरण | अर्थ | स्पष्टीकरण |
|---|---|---|
| काल पाऊस पडला. मी आपला अभ्यास केला. | भूतकाळ. | हा या आख्याताचा मुख्य अर्थ आहे. |
| तुम्ही पुढे व्हा; मी आलोंच. हे पहा माझें जेवण झालेंच म्हणून समजा. | सन्निहित भविष्य. | या ठिकाणीं आलों या क्रियापदानें येण्याची क्रिया लवकरच घडणार आहे अशा अर्थाच [सनिहित भविष्य बोध होतो. |
| तूं यंदा पास झालास तर ठीक. तूं मुंबईला आलास तर मला भेटून जा. | संकेत | एक गोष्ट होण्याचे दुसरी गोष्ट होण्यावर अवलंबून आहे असें दाखवावयाचें असतां या आख्याताचा उपयोग होतो. अशा वेळीं जरतर या उभयान्वयी अव्ययाचा उपयोग [illegible] |

## भविष्यकाळ किंवा ई-आख्यात.

| उदाहरणें | अर्थ |
|---|---|
| ते उद्यां जातील.<br>पुढच्या वर्षी दत्तुची मुंज होईल. | भविष्यकाळ. हा या आख्याताचा मुख्य अर्थ आहे. |
| सर्वच लोक विद्वान कसे होतील?<br>तो या भानगडींत कशाला पडेल? | शक्याशक्यता. |
| तूं रागवशील तर रागव.<br>ते जातील तर जावोत. | औदासिन्य. |
| तूं मला आपलें पुस्तक देशील काय?<br>मार्गे एवढें काम कराल काय? | विनंति. |
| तो आतां दवाखान्यांत असेल. | संभव. |

## रीतिभूतकाळ किंवा ई आख्यात.

| उदाहरणें | अर्थ | |
|---|---|---|
| मी उन्हाळ्यांत सकाळचा फिरावयास जाई.<br>तो आपला काळ नेहमीं नामस्मरणांत घालवी. | रीतिभूतकाळ. | |
| कौशिक अनुगांसि म्हणे.<br>गणपति म्हणे वरेण्या. | भूतकाळ किंवा पद्यभूतकाळ. | या आख्याताचा भूतकाळीं उपयोग कवितेमध्यें होतो. |
| दाम करी काम.<br>वतरे चढेहि वर्षे गर्जे पाडी घनांधकारातें. | वर्तमानकाळ किंवा पद्यवर्तमानकाळ. | |

## आज्ञार्थ किंवा ऊ आख्यात.

| उदाहरणें | अर्थ |
|---|---|
| मी जाऊं?<br>आम्ही खेळूं? | अनुमोदन प्रश्न. |
| आपण आतां फिरावयास जाऊं.<br>चला आपण आतां खेळूं. | बेत. |
| तेथें बस.<br>वेळेवर शाळेंत या. | आज्ञा किंवा उपदेश. |

| | |
|---|---|
| महाराज, माझ्यावर दया करा. हे राजा, माझें संकट निवारण कर. | विनंती. |
| तो विजयी होवो. जळो हा संसार. | इच्छा. |

## विध्यर्थ किंवा वाख्यात.

| | |
|---|---|
| वडील माणसांची आज्ञा पाळावी. ईश्वरास स्मरून वागावें. | कर्तव्य किंवा विधि. हा या आख्याताचा मुख्य अर्थ आहे. |
| हें पद त्यानेंच म्हणावें. असा व्यापार इंग्रजांनींच करावा. | सामर्थ्य किंवा योग्यता. |
| तूं पास व्हावें म्हणून मी तुला हें पुस्तक दिलें. अन्न मिळावें म्हणून शेतकरी धान्य पेरतात. | हेतु. |
| तूं लहानपणी नित्य रहावेंस. त्यानें तिला एकसारखें मारीत सुटावें व शिव्या द्याव्या. | रीतिभूत. |
| त्यानें पत्र उद्यां द्यावें. आज पाऊस पडावा. | संभव. |
| आपण येथें बसावें. पत्राचें उत्तर पाठवावें. | मृदु आज्ञा. |

## संकेतार्थ किंवा द्वितीय ताख्यात.

| | | |
|---|---|---|
| त्यास जर वेळेवर औषध पोचतें तर तो जगता. | असिद्ध संकेत. | एक गोष्ट दुसरीवर अवलंबून असून दुसरी न घडल्यामुळे पहिली घडली नाहीं असा अर्थ असतां दोन्ही ठिकाणीं द्वितीय ताख्याताचा उपयोग होतो. |

## अभ्यास.

पुढील वाक्यांत क्रियापदांचीं आख्यातें कोणतीं आहेत तें सांगून त्यांनीं कोणता काळ अर्थ दर्शविला आहे तें सांगा.

(१) पाऊस पडेल तर बरें होईल. (२) मी शीळ फुंकली की चटचट बाहेर या. (३) आपण थांबता तर आपल्यासही प्रसाद मिळता. (४) तो आजच्या मेलगाडीनें यावा. (५) आपण मज गरिबावर दया केली तेव्हां ईश्वर आपलें कल्याण करो. (६) तो नित्य उशिरां येई म्हणून मास्तर त्याला मारीत. (७) आपण पुढें व्हा; मी आपल्या मागोमाग आलोंच. (८) उद्योगाचे घरीं ऋद्धि सिद्धि पाणी भरी. (९) श्रीकृष्ण अर्जुनास सांगतात कीं कर्म कोणतें व अकर्म कोणतें हें ठरविण्यांत मोठमोठ्या शहाण्यांना देखील भुरळ पडते. (१०) जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे. (११) चढेल तो पडेल.

[ २ ] भविष्यकाळाचा अर्थ जितक्या आख्यातांनीं दर्शवितां येणें शक्य असेल त्यांनीं तो दाखवा.

[ ३ ] पुढील काळ कोणकोणत्या आख्यातांनीं दर्शविले जातात तें उदाहरण देऊन सांगाः—संनिहित भूतकाळ, संनिहित वर्तमान काळ, रीतिभूतकाळ.

[ ४ ] पुढील अर्थ कोणकोणत्या आख्यातांनीं दर्शविले जातात? उदाहरणें द्याः—संकेत, संभव, कर्तव्य, आज्ञा, आशीर्वाद.

---

# प्रकरण दुसरें.

## साधित धातु.

### धडा सहावा.

### धातूंचें व्युत्पत्तिदृष्ट्या वर्गीकरण.

वाक्यांतील उपयोगावरून धातूंचे सहा प्रकार होतात ही गोष्ट आपण मागील एका धड्यांत पाहिलीच आहे. धातू कसे बनले आहेत यावरून म्हणजे व्युत्पत्तीवरून धातूंचे किती प्रकार होतात तें आपल्याला या धड्यांत पहावयाचें आहे.

खालीं डाव्या बाजूला असलेल्या वाक्यांतील क्रियापदांचे मूळ धातू कसे बनले आहेत त्याचा विचार करा.

१. हरी काम करितो.
२. रामा जलद चालतो.

या वाक्यांतील क्रियापदांचे मूळ धातू कर व चाल असे आहेत. हे धातू संस्कृतांतल्या मूळ कृ व चाल् या धातूंपासून मराठींत आले आहेत. परंतु मराठी भाषेपुरताच आपण विचार केला तर हे धातू दुसऱ्या कोणत्याही मराठी शब्दापासून बनले नसून मराठी भाषेमध्ये ते मूळचेच आहेत असें म्हणावें लागतें. अशा धातूंना **सिद्धधातु** असें म्हणतात.

१. कुत्रा लवकर माणसाळतो.
२. हा मुलगा मला घेडावतो.
३. मी हरीकडून अभ्यास करवितो.

या वाक्यांतील क्रियापदांचे मूळ धातू अनुक्रमें माणसाळ, घेडाव, व करव हे आहेत. हे धातू मराठी भाषेमध्यें मूळचेच नसून माणूस, घेडा, व कर या मूळ मराठी शब्दांपासून बनलेले आहेत अशा धातूंस **साधित धातू** असें म्हणतात

व्याख्या:—(१) जे धातू मराठी भाषेंत मूळचेच असतात, म्हणजे दुसऱ्या कोणत्याही मराठी शब्दापासून बनलेले नसतात त्यांना सिद्ध धातू असें म्हणतात.

(२) जे धातू मराठी भाषेंत मूळचेच नसून दुसऱ्या मराठी शब्दांपासून बनलेले असतात त्या धातूंना साधित धातू असें म्हणतात.

साधित धातूंचे चार प्रकार आहेत ते असेः—

(१) जे साधित धातू मूळ मराठी नामापासून बनलेले असतात त्यास **नामसाधित धातू** असें म्हणतात; जसें:—**माणूस** या नामापासून **माणसाळणें; डोकें** या नामापासून **डोकावणें; राग** या नामापासून **रागावणें.**

(२) जे साधित धातू मूळ मराठी विशेषणांपासून झालेले असतात त्यास **विशेषणसाधित धातू** असें म्हणतात; जसें:—**वेडा** या विशेषणापासून **वेडावणें; रोड** या विशेषणापासून **रोडावणें; मंद** या विशेषणापासून **मंदावणें.**

(३) जे साधित धातू मूळ मराठी क्रियाविशेषणांपासून बनलेले असतात त्यास **क्रियाविशेषणसाधित धातु** असें म्हणतात. जसें:—**झटकन** या क्रियाविशेषणापासून **झटकणें, काडकन** या क्रियाविशेषणापासून **कडाडणें, खालीं** या क्रियाविशेषणापासून **खालावणें.**

(४) जे धातू मराठी धातूंपासून बनलेले असतात त्यास **धातुसाधित धातू** असें म्हणतात; जसें:—**करणें, करविणें; बसणें, बसविणें; निजणें, निजविणें.**

टीपः—(१) धातुसाधित धातूंचा अर्थ मूळ धातूनें दर्शविलेली क्रिया दुसऱ्याला करावयास लावणें असा होतो, म्हणून त्यास **प्रयोजक धातु** असें म्हणतात. जसें:—मी त्याचेकडून पत्र लिहवितों.

धातूंचें हें व्युत्पत्तीवरून केलेलें वर्गीकरण खालील कोष्टकाचे साहाय्यानें लक्षांत ठेवणें सोपें जाईल.

धातु—
- —सिद्ध धातु—करणें, चालणें.
- —साधित—
  - —नामसाधित धातु—लोभावणें, फेसाळणें.
  - —विशेषणसाधित धातु—मंदावणें, वेडावणें.
  - क्रियाविशेषणसाधित धातु—सटकणें, मागावणें.
  - —धातुसाधित किंवा प्रयोजक धातु—करविणें.

## अभ्यास.

खालील नामें, विशेषणें, क्रियाविशेषणें व धातु यांवरून साधित धातु करून दाखवा व त्यांचा उपयोग करा.

नामें:—फूल, उजेड, विटाळ, मळ, दुःख, राग, गहिंवर, घोटाळा, रंग.

विशेषणें:—थंड, रुंद, उथळा, लंगडा, उघडा, नरम.

क्रियाविशेषणें:—दूर, खालीं, मागें, भरभर, थरथर, चकचक.

धातु:—बोल, ऊठ, शिक, भर, भेट, वाच.

---

## धडा सातवा.

## प्रयोजक धातु कसे बनतात ?

मूळ धातूनें दर्शविलेली क्रिया दुसऱ्याकडून करून घेणें अशा अर्थाचा मूळ धातूचे रूपांतच थोडा फेरफार होऊन जो नवीन धातु बनतो त्यास प्रयोजक धातु असें म्हणतात, ही गोष्ट आपण मागील धड्यांत पाहिली. मूळ धातूंपासून प्रयोजक धातु कसे बनतात, व या धातूंचे वाक्यांत उपयोग कसे होतात तें आपणांस या धड्यांत पहावयाचें आहे.

### प्रयोजक धातु कसे होतात ?

मूळ धातूंचे रूपांत कोणकोणते बदल होऊन प्रयोजक धातु बनतात तें पुढील कोष्टकावरून दिसून येईल.

| मूळ धातु. | प्रयोजक धातु. | प्रयोजक धातु मूळ धातुपासून कसा झाला ? | यासारखीं इतर उदाहरणें. |
|---|---|---|---|
| कर, चाल, बोल. | करव, चालव, बोलव, | मूळ धातूस अव * हा प्रत्यय लागून. | हंस, वीस, नीज, बस, उठ, इत्यादि, |
| मर, तर, चर, | मार, तार चार, | मूळ धातूच्या उपान्त्य 'अ' चा आ होऊन. | पड, दब, टळ, इत्यादि. |
| मार, तार, चाल, | मारव, तारव चालव. | मूळ धातु मार हाच मर धातूपासून झालेला प्रयोजक धातु आहे. त्याला पुन्हां मूळ धातु समजून त्याला अव हा प्रत्यय लावून मारव असा प्रयोजक धातु झाला आहे. मारव हा मर धातूपासून झालेला दुहेरी प्रयोजक धातु आहे. | पाड, दाब, टाळ, इत्यादि. |
| दे. | देवव. | दे हा धातु एकाक्षरी आहे. त्याला अवव हा प्रत्यय लागून देवव हा प्रयोजक धातु झाला आहे. | घे, जा, ये, पी, भी, इत्यादि. |
| ये, जा, पी, भी, | आण, पाठव, पाज, भेडाव, | हीं रूपें मूळ धातूस अमूक एक प्रत्यय लागून झालीं असें म्हणतां येत नाहीं. परंतु यांना ये जा वगैरे धातूंच्या प्रयोजक रूपांचा अर्थ आलेला आहे. | |

* "हे प्रयोजकत्वार्थक साधित धातू संस्कृतांत अय प्रत्यय लागून होतात. या संस्कृत रूपांतील य चा व होऊन (बाळभाषेच्या द्वारा) मराठींतले प्रयोजकत्वार्थक साधित धातु झाले आहेत."

—कृष्णशास्त्री चिपळूणकर.

## प्रयोजक धातूंचे वाक्यांत उपयोग.

( अ ) मूळ धातु अकर्मक असल्यास त्यापासून झालेल्या प्रयोजक धातूचा वाक्यांत उपयोग कसा होतो तें खालील उदाहरणांवरून दिसून येईल.

| | |
|---|---|
| रामा खालीं **बसतो.** | मी रामाला खालीं **बसावितों.** |
| रामा शाळेंत **येतो.** | मी रामाला शाळेंत **आणतों.** |
| रामा दिवसा **निजतो.** | मी रामाला दिवसा **निजवितों.** |

### निरीक्षण व नियम.

( १ ) मूळ धातु अकर्मक असला तरी त्यापासून झालेला प्रयोजक धातु सकर्मक होतो; व ( २ ) मूळ धातूचा कर्ता त्याजपासून झालेल्या प्रयोजक धातूचें कर्म होतो.

( आ ) मूळ धातु सकर्मक असला तर त्यापासून झालेला प्रयोजक धातूही सकर्मक राहतो. प्रयोजक रूपांमध्यें मूळ धातूंच्या कर्त्याला कडून हें शब्दयोगी अव्यय लागतें; जसें:—

| | |
|---|---|
| रामा पुस्तक वाचतो. | मी रामाकडून पुस्तक वाचवितों. |
| रामा पुस्ती लिहितो. | मी रामाकडून पुस्ती लिहवितों |
| रामा कंदील पुसतो. | मी रामाकडून कंदील पुसवितों. |

टीपः—प्रयोजक धातु हे नेहमीं सकर्मक असल्यामुळें त्यांना प्रत्यय लागण्यापूर्वी इ हा आगम विकल्पानें होतो.

### शक्य क्रियापदें.

मूळ धातूंस अव प्रत्यय लागून त्यांपासून नवीन अर्थाचे प्रयोजक धातु बनतात हें आपण आतांपर्यंत पाहिलें. आतां पुढें डाव्या व उजव्या बाजूंच्या वाक्यांत असलेल्या क्रियापदांतील धातु कोणते आहेत तें पहा

| | |
|---|---|
| तो माझ्याकडून अभ्यास **करवितो.** | आज मला अभ्यास **करवतो.** |
| तो तुला या जागेवरून **उठवितो** काय ? | तुझ्यानें या जागेवरून **उठवतें** काय ? |
| तो माझ्याकडून इतके पैसे **देववितो** काय ? | माझ्यानें इतके पैसे **देववतील** काय ? |
| तो तुला एक मैल **धांववील.** | तुझ्यानें एक मैल सहज **धांववेल.** |

( अ ) डाव्या बाजूच्या क्रियापदांतील मूळ धातू **करविणें, उठविणें, देवविणें, धांवविणें** हे असुन ते **करणें, उठणें** वगैरे धातूंवरून साधलेले प्रयोजक धातु आहेत हें उघड आहे.

( आ ) परंतु उजव्या बाजूच्या क्रियापदांतील मूळ धातु कोणते ? ' मला अभ्यास करवतो ' ' तुझ्यानें उठवतें ' ' माझ्यानें पैसे देववतील ' या वाक्यांतील क्रियापदांचीं रूपें प्रयोजक धातूंच्या रूपाप्रमाणेंच दिसतात; परंतु हीं प्रयोजक क्रियापदें नाहींत. कारण ( १ ) त्यांचेमध्यें शक्यार्थ आहे; व ( २ ) त्यांचे कर्तेंही 'मला' ' तुझ्यानें ' ' माझ्यानें ' हेच आहेत प्रयोजक धातुचे कर्ते व कर्मे हीं मूळ धातूंच्या कर्त्यांहून व कर्मांहून भिन्न असतात; परंतु या ठिकाणीं तर मूळ धातूंचेच कर्ते व कर्मे कायम आहेत, म्हणून **करणें, उठणें, देणें** हेच मूळ धातु वरील क्रियापदांमध्यें मानले पाहिजेत. मात्र क्रियापदांचीं रूपें कर्त्यांच्या लिंगवचनपुरुषास अनुसरणारीं नसून कर्म असल्यास कर्मांच्या लिंगवचनपुरुषास अनुसरणारीं आहेत व नसल्यास तृतीयपुरुषीं एकवचनीं नपुंसकलिंगी राहणारीं आहेत. म्हणजे हीं रूपें कर्तरि नसून कर्मणि*किंवा भावे आहेत. यांना **शक्य क्रियापदें** असें नांव आहे.

---

*कर्मणि किंवा भावे प्रयोग होतांना संस्कृतमध्यें मूळ धातुला य हा प्रत्यय लागतो त्याचा मराठींत व होऊन हे शक्य कर्मणि व शक्य भावे प्रयोग साधले जातात असें कै. दामले व रा. रा. राजवाडे या विद्वान वैय्याकरणांचें मत आहे.

## अभ्यास.

(१) प्रयोजक धातू किती प्रकारांनीं बनतात तें उदाहरणें देऊन सांगा.

(२) पुढील वाक्यांची प्रयोजक वाक्यें करा. (प्रयोजक धातूला योग्य कर्त्याची निवड करा.)

फटाके उडतात. झाडें उगवतात. ते पुस्तकें वाचतात. चाकर काम करतात. मुलें खोड्या करतात. कुत्रा चावतो. मुलगी रडते. बाण सुटतो.

(३) पुढील क्रियापदांचीं शक्य क्रियापदें करा.

मी शाळेंत जातों. रामा चालतो, श्रीराम पुस्तक वाचतो. मी शंभर रुपये कमवितों. बैल नांगर ओढतो. मी आगगाडीबरोबर धांवतों.

(४) पुढील जोड्यांपैकीं दुसरा धातू पहिल्या धातूवरून साधलला प्रयोजक धातू आहे कीं तो निराळाच आहे तें सांगा.

| | | |
|---|---|---|
| मरणें, मारणें. | वळणें, वाळणें. | पिटणें, पेटणें. |
| तरणें, तारणें. | टळणें, टाळणें. | मिळणें, मिळविणें. |
| चलणें, चालणें. | कुटणें, कोटणें. | गळणें, गळविणें. |
| पळणें, पाळणें. | तुटणें, तोडणें. | भरणें, भारणें. |
| गमणें, गमविणें. | कढणें, काढणें. | वरणें, वारणें. |

---

# प्रकरण तिसरें.

—*:*—

### धडा आठवा.

## संयुक्त धातु.

मूळ धातूला अव हा प्रत्यय लागला असतां त्या धातूनें दर्शविलेली क्रिया कर्त्याकडून करून घेणें अशा अर्थाचे प्रयोजक धातु बनतात ही गोष्ट आपण मागील धड्यांत पाहिली. मूळ धातूच्या क्रियार्थामध्यें भर घालण्याचा आणखी एक प्रकार मराठी भाषेमध्यें आहे.

खालीं समोरासमोर असलेल्या डाव्या व उजव्या वाक्यांची तुलना करा.

| | |
|---|---|
| मी रामाकडून अभ्यास **करवितों.** | मी रामाला अभ्यास **करावयास लावतों.** |
| मी रामाकडून पत्र **लिहवितों.** | मी रामाकडून पत्र **लिहून घेतों.** |

## निरीक्षण.

(१) दोन्हीं बाजूंच्या वाक्यांचा अर्थ एकच आहे.

(२) डाव्या बाजूला **करवितों, लिहवितों** हीं क्रियापदें असून उजव्या बाजूला त्यांचीं समानार्थक **करावयास लावतों, लिहून घेतों** हीं क्रियापदें आहेत. अशा क्रियापदांना **संयुक्त क्रियापदें** असें म्हणतात.

(३) डाव्या बाजूच्या क्रियापदांतील धातू जे **करविणें, लिहविणें** त्यांना **साधित धातु** हें नांव असून उजव्या बाजूच्या क्रियापदांतील **करावयास लावणें, लिहून घेणें** या धातूंना **संयुक्त धातु** असें नांव आहे.

(४) **करावयास लावणें, लिहून घेणें** या संयुक्त धातूंमध्यें **करावयास** व **लिहून** हीं **करणें** व **लिहिणें** या मूळ धातूंचीं कृदन्तरूपें असून त्यांचे पुढें **लावणें** व **घेणें** हे धातू अनुक्रमें आले आहेत. अशा धातूंना **सहाय धातु** असें म्हणतात.

(५) **लावतों** व **घेतों** हे शब्द खालीं समोरासमोरच्या वाक्यांत आहेत, त्यांची तुलना करा.

| | |
|---|---|
| मी रामाला अभ्यास करावयास **लावतों.** | मी दिवा **लावतों.** |
| मी रामाकडून पत्र लिहून **घेतों.** | मी दहा आंबे **घेतों.** |

उजव्या बाजूचे वाक्यांतील **लावतों, घेतों** या क्रियापदांमध्यें **लावणें,**

घेणें, या क्रियांचा अर्थ आहे; परंतु डाव्या बाजूचे वाक्यांमध्यें लावतों, घेतों हीं सहाय्य क्रियापदें आहेत. त्यांचे योगानें करणें व लिहिणें या धातूंचे अर्थांत भर घातली गेली आहे. लावणें, घेणें या धातूंचा मूळचा अर्थ करून घेणें, लिहावयास लावणें या संयुक्त धातूंमध्यें पार नाहींसा झाला आहे.

**या धड्यांत आपण काय शिकलों ?**

(१) मुळ धातूच्या एखाद्या कृदन्तापुढें सहाय धातु ठेविला असतां संयुक्त धातु बनतात.

(२) संयुक्त क्रियापदाला कृदन्तांतील धातूनें दर्शविलेल्या क्रियेचा विशेषेंकरून अर्थ असून सहाय धातूचे योगानें कृदन्तांतील क्रियेच्या अर्थामध्यें थोडी भर पडते.

(३) सहाय धातू म्हणून जेव्हां एखाद्या धातूचा उपयोग होतो तेव्हां त्या धातूचा मूळचा अर्थ नष्ट होतो.

टीपः—कांहीं सहाय धातू या नियमाला अपवाद आहेत. जसें:—करूं इच्छिणें, बोलूं शकणें.

(४) संयुक्त क्रियापदाला अर्थ कृदन्तांतील धातूचा असतो; परंतु आख्यातप्रत्यय मात्र सहाय धातूला लागतात.

(५) साध्या धातूप्रमाणें संयुक्त धातूही सर्व आख्यातीं चालतो हें खालीं दिलेल्या जाऊं देणें या संयुक्त धातूच्या आख्यात रूपांवरून दिसून येईल.

| | | |
|---|---|---|
| (१) रामा मला जाऊं देतो. | वर्तमान | प्रथम ताख्यात. |
| (२) रामानें मला जाऊं दिलें. | भूत. | लाख्यात. |
| (३) रामा मला जाऊं देईल | भविष्य. | ईलाख्यात. |
| (४) रामा मला जाऊं देवो. | आज्ञार्थ. | ऊआख्यात. |

( ५ ) रामा मला जाऊं देई. रीतिभूत. ईआख्यात.

( ६ ) रामानें मला जाऊं द्यावें. विध्यर्थ. वाख्यात.

( ७ ) जर रामा मला जाऊं देता, संकेतार्थ. द्वितीयताख्यात. तर बरें झालें असतें.

( ६ ) संयुक्त क्रियापदामध्यें सहाय धातूचे मागें येणारीं जा धातूचीं सर्व प्रकारचीं कृदन्तरूपें खालीं आहेत, तीं नीट लक्षांत ठेवा.

| कृदन्द. | प्रत्ययावरून नांव. | अर्थावरून नांव. | संयुक्त क्रियापदांत उपयोग. |
|---|---|---|---|
| जात. | तकृदन्त | अपूर्णक्रियावाचक कृदन्त. | तो जात आहे. |
| जाता. | ताकृदन्त. | कर्तृदर्शककृदन्त | तो जाता झाला. |
| जातां. | ताकृदन्त. | क्रियावाचक कृदन्त. | त्याला, जातां येतें. |
| गेला. | लाकृदन्त. | पूर्ण क्रियावाचक कृदन्त. | तो गेला आहे. |
| जावा. | वाकृदन्त. | विधिवाचक कृदन्त. | त्याला जावें लागतें. |
| जावयाचा | षष्ठ्यन्तवाकृदन्त. | विधिवाचक कृदन्त. | तो जावयाचा आहे. |
| जावयास. | चतुर्थ्यंत वाकृदन्त | क्रियावाचक कृदन्त. | त्याला जावयास पाहिजे. |
| जाऊं. | ऊंकृदन्त. | क्रियोपक्रमवाचक | तो जाऊं लागला. |
| जाऊन. | ऊन कृदन्त. | क्रियासमाप्ति. वाचक | तो मुंबईला जाऊन बसला. |
| जाणार. | णार कृदन्त. | उद्देशवाचक. | तो जाणार आहे. |

टीप:—कृदन्तांचीं नावें अर्थावरून ध्यानीं न ठेवितां प्रत्ययावरून ठेवावीं; कारण एकाच कृदन्ताचा निरनिराळ्या वाक्यांत निरनिराळा अर्थ होणें शक्य असल्यामुळें एकाच रूपाला अर्थाप्रमाणें निरनिराळीं नांवें द्यावीं लागतील.

## अभ्यास.

खालील वाक्यांमध्यें संयुक्त क्रियापदें जाड अक्षरांत लिहिलीं आहेत; त्यांतील संयुक्त धातु कोणते व क्रियापद संयुक्त धातूचें कोणत्या आख्याताचें रूप आहे तें सांगा.

[अ] (१) मला आतां जाऊं दे. (२) तो आपला करार मोडूं पहातो. (३) तुम्ही अशी चुक पुन्हा करूं नये. (४) आई मुलास जेऊं घालते. (५) तूं मला पुन्हा तोंड दाखवूं नको. (६) तो पोहूं शकतो. (७) तो तुला भेटूं इच्छितो. (८) तो नागपूरला जाऊं पहातो. (९) तो मला मारूं लागला. (१०) आई मुलीला न्हाऊं घालते. (११) करूं ये समाधान जो सुखं त्याचें; धरूं ये सुखें चित्त पैं जाणत्याचें.

[आ] (१) माझें पत्र लिहून झालें. (२) तो अंथरुणावर निजून राहिला. (३) त्यानें कर्ज फेडून टाकलें. (४) मी ही घोडचूक करून बसलों. (५) तो ही कविता लिहून काढील. (६) तो बोलतांना अगदीं घाबरून जातो. (७) नदी आटून गेली. (८) हा निबंध वाचून ठेवा. (९) तो आपलें काम साधून घेईल. (१०) त्या भानगडी तो कधींच करून चुकला. (११) मी ही गोष्ट पटकन् बोलून गेलों.

[इ] (१) मला हें उदाहरण करतां येतें. (२) तुला नागपूरला राहतां येईल. (३) केवळ तुमच्या मदतीनें मला हें घर बांधतां आलें.

[ई] (१) तुला हें पुस्तक वाचावें लागेल. (२) मला दोन तास थांबावें लागलें. (३) आम्हाला दररोज दोन तास अभ्यास करावा लागला.

[उ] (१) मधून मधून पत्र पाठवीत जा (२) तो तासांचे तास गात बसतो. (३) तो त्याला एकसारखा बडवीत सुटला. (४) तो आज चार वर्षें सारखा लिहीत आला. (५) तो वाचीत आहे. (६) तो वाचीत होता. (७) तो वाचीत असेल.

[ऊ] (१) मला पत्र लिहावयाचें आहे. (२) तो काल यावयाचा होता. (३) त्यानें माझ्याशीं बोलावयाचें सोडलें. (४) त्यानें तेथें जावयाचें होतें. (५) तो जावयाचा असेल.

(ए) [ १ ] मला इंग्रजी बोलावयास येतें. [ २ ] त्या मुलाला अभ्यास करावयास नको. [ ३ ] त्याला उनाडक्या करावयास पाहिजेत. [ ४ ] त्याला रोज स्टेशनवर जायला पडतें.

(ऐ) [ १ ] तो गेला आहे. [ २ ] तो गेला होता. [ ३ ] तो गेला असेल. [ ४ ] तो गेला असावा.

(ओ) [ १ ] तो जाणार आहे. [ २ ] तो जाणार होता. [ ३ ] तो जाणार असावा.

---

## धडा नववा.

## संयुक्त क्रियापदांचे अर्थ.

धातूच्या कृदन्तरूपापुढें सहाय धातूचें आख्यातरूप येऊन संयुक्त क्रियापद होतें. संयुक्त क्रियापदाला कृदन्तांतील धातूनें दर्शविलेल्या क्रियेचा अर्थ असून सहाय धातूनें मूळ धातूच्या अर्थांत भर पडते, व बरेच वेळां सहाय धातूचा स्वतःचा अर्थ आजिबात नाहींसा होतो, या गोष्टी आपण मागील धड्यांत पाहिल्या. संयुक्त क्रियापदांचे मुख्य मुख्य अर्थ या धड्यांत आपणांस पहावयाचे आहेत.

[ १ ] तकृदन्तः—क्रिया अपूर्ण स्थितींत आहे असा या कृदन्तावरून बहुतकरून बोध होतो, व या कृदन्तापुढें येणाऱ्या सहाय धातूच्या आख्यातावरून त्या आख्यातानें दाखविल्या जाणाऱ्या काळाचा बोध होतो हें खालील उदाहरणावरून समजेल.

( १ ) तो जेवीत आहे. अपूर्ण वर्तमान. वर्तमानकाळीं बोलण्याचे किंवा लिहिण्याचे वेळीं जेवण्याची क्रिया अपूर्ण स्थितींत आहे. असा अर्थ या संयुक्त क्रियापदानें दर्शविला जातो.

| | | |
|---|---|---|
| (२) तो जेवीत होता. | अपूर्णभूत. | भूतकाळीं जेवण्याची क्रिया अपूर्ण स्थितींत होती. |
| (३) तो जेवीत असेल. | अपूर्ण भविष्य. | भविष्यकाळीं जेवण्याची क्रिया अपूर्ण स्थितींत असेल. |
| (४) तो जेवीत असावा. | अपूर्ण संभव | जेवण्याची क्रिया अपूर्ण स्थितींत असण्याचा संभव आहे. |

(५) } जर तो जेवीत असता, अपूर्ण संकेत (भूतकाळ.)
 जर तो जेवीत असला, अपूर्ण संकेत. (वर्तमानकाळ)

(२) **लाकृदन्तः**—क्रिया पूर्ण झाली आहे असा या कृदन्तावरून बोध होतो. वरील वाक्यांमध्यें **जेवला** हें ल कृदन्त **जेवीत** या तकृदन्ताऐवजीं ठेवलें असतां होणाऱ्या संयुक्त क्रियापदांचे अनुक्रमें **पूर्णवर्तमान**, **पूर्णभूत**, **पूर्णभविष्य**, **पूर्णसंभव** (क्रिया पूर्ण झाली असण्याचा संभव) आणि **पूर्णसंकेत** हे अर्थ होतात. (करून पहा.)

(३) **णार कृदन्त**—क्रिया करण्याच्या उद्देशाचा या कृदन्तावरून बोध होतो. वरील वाक्यांमध्यें **जेवीत** या कृदन्ताऐवजीं **जेवणार** हें कृदन्त ठेविलें असतां होणाऱ्या संयुक्त क्रियापदाचे अनुक्रमें **उद्देशवर्तमान, उद्देशभूत, उद्देशभविष्य, उद्देशसंभव,** आणि **उद्देशसंकेत** हे अर्थ होतात. (करून पहा.)

(४) **षष्ठ्यंत वा कृदन्तः**—धातूनें दर्शविलेली क्रिया करणें आवश्यक आहे, किंवा ती क्रिया करावयाचें ठरलें आहे, असा म्हणजेच विधीचा या कृदन्तावरून अर्थ होतो वरील वाक्यांमध्यें **जेवीत** या कृदन्ताचे ऐवजीं **जेवावयाचा** हें कृदन्त ठेवलें असतां होणाऱ्या संयुक्त क्रियापदांचे अनुक्रमें **विधिवर्तमान, विधिभूत, विधिभविष्य, विधिउद्देश** व **विधिसंकेत** हे अर्थ होतात. (करून पहा.)

वर दाखविलेल्या **संयुक्त क्रियापदांतील कृदन्तांनीं** क्रियेचें अपूर्णत्व, पूर्णत्व, उद्देश, व विधि हे अर्थ दाखविले असून वर्तमान,

भूत भविष्य वगैरे आख्यातांनीं दर्शविले जाणारे अर्थ सहाय क्रियापदांनीं दाखविले आहेत. आतां खालील संयुक्त क्रियापदें पहा. यांमध्यें कृदन्तांनीं फक्त धात्वर्थ दर्शविला असून रीति, शक्यता; इच्छा इत्यादि विशेष अर्थ काळांबरोबरच सहाय क्रियापदांनीं दर्शविले आहेत.

[१] असतो व असे या अस् धातूचें आख्यानामागें मुख्य धातूचें तकृदन्त येऊन झालेल्या संयुक्त क्रियापदांमध्यें रीतिवर्तमान, रीतिभूत, हे अर्थ अनुक्रमें उत्पन्न होतात; जसें:—

तो जेवीत असतो. रीतिवर्तमान (त्याची जेवण्याची रीत किंवा पद्धत आहे.)

तो जेवीत असे. रीतिभूत.

टीपः—या ठिकाणीं रीतिचा आणि वर्तमानकाळाचा व भूतकाळाचा अर्थ असतो आणि असे या सहाय क्रियापदांनीं दाखविला असून जेवीत या कृदन्तानें केवळ धात्वर्थच दाखविला आहे. क्रियेचा अपूर्णत्वाचा अर्थ या ठिकाणी फारसा नाहीं.

[२] बस, राह, जा, ये या धातूंच्या आख्यातरूपांमागें मुख्य धातूंचें तकृदन्त येऊन झालेल्या संयुक्त क्रियापदांमध्यें रीति, सातत्य, किंवा अभ्यास हे अर्थ उत्पन्न होतात; जसें:—वाचीत बसतो; पोहत राहतो; लिहीत आला; करीत जा.

टीपः—या ठिकाणीं रीति, सातत्य किंवा अभ्यास यांचा अर्थ नुसत्या कृदन्तांमध्येंही नाहीं किंवा नुसत्या सहाय्य क्रियापदांमध्येंही नाहीं. कृदन्त व सहाय क्रियापद यांच्या मिलाफानेंच तो अर्थ उत्पन्न झाला आहे.

[३] शक धातूचे आख्याताचे मागें ऊं कृदन्त व ये धातूचे आख्यातामागें तांकृदन्त येऊन झालेल्या संयुक्त क्रियापदानें शक्यतेचा अर्थ दाखविला जातो; जसें:—मी जाऊं शकतों; मला जातां येतें.

[४] पाहणें, म्हाहणें, इच्छिणें या धातूचे आख्यातापूर्वी ऊंकृदन्त येऊन झालेल्या संयुक्त क्रियापदानें इच्छेचा बोध होतो; जसें:—तो जाऊं पहातो-पहातो-इच्छितो.

(५) पाहिजे, नको या क्रियापदांमागें चतुर्थ्यन्त वाक्कृदन्त येऊन झालेल्या संयुक्त क्रियापदांनीं इच्छा किंवा फल यांचा बोध होतो; जसें:— त्यांला खेळावयास पाहिजे पुस्तक घ्यावयास नको

(अ) पाहिजे या क्रियापदामागें लाकृदन्त येऊन झालेल्या संयुक्त क्रियापदानें आवश्यकता, कर्तव्य हे अर्थ दाखविले जातात; जसें:—त्याला गेलें पाहिजे. [आवश्यकता]; त्यानें गेलें पाहिजे. [कर्तव्य.]

(आ) नको या क्रियापदामागें ऊंकृदन्त येऊन झालेल्या संयुक्त क्रियापदानें अकरणरूपी आज्ञेचा बोध होतो; जसें:—तूं तेथें जाऊं नको.

(६) लाग धातूनें आख्यातामागें ऊंकृदन्त येऊन झालेल्या संयुक्त क्रियापदानें क्रियोपक्रमाचा व वाकृदन्त येऊन झालेल्या संयुक्त क्रियापदानें आवश्यकतेचा बोध होतो; तो जाऊं लागला मला दररोज बाजार करावा लागतो.

(७) दे धातूच्या आख्यातामागें मूळ धातूचें ऊंकृदन्त येऊन झालेल्या संयुक्त क्रियापदानें अनुमोदन किंवा संमति हा अर्थ दर्शविला जातो; जसें:— मी त्याला पुस्तकें वाचूं दिलीं.

(८) ठेव, टाक दे, घे जा, या धातूंचे आख्यातामागें मुख्य धातूचें ऊन कृदन्त येऊन झालेल्या संयुक्त क्रियापदामध्यें मुख्य धातूनें दर्शविलेल्या क्रियेच्या समाप्तीचा अर्थ उत्पन्न होतो; जसें:—मीं हा धडा वाचून टाकला त्यानें आपलें काम साधून घेतलें. मी तुला हाकून देईन. उद्याचे आधी मी हें काम करून ठेवीन. नदी भरून गेली.

## अभ्यास.

खालील वाक्यांतील संयुक्त क्रियापदांतील कृदन्तांचीं नांवें सांगा व संयुक्त क्रियापदानें कोणता अर्थ दर्शविला आहे तें सांगा.

(१) यमीलाआतां चांगलें बोलतां येतें. (२) मुलांनों, अरुणोदयापूर्वी उठत जा. (३) आम्ही यंदाची बेगमी करून टाकली. (४) असभ्य वर्तन करणाऱ्या एका विद्यार्थ्यास परीक्षकांनीं परीक्षेंतून काढून टाकलें. (५) मी दिवसास झोंप घेत नसतो. (६) आपल्या जलप्रवासांत समुद्रांतील अनेक चमत्कार आपण पाहिले असतील. (७) तें त्रम लागलें असावें. (८) प्राचीन काळीं ऋषींच्या पवित्र आश्रमांत शेंकडों मुलें एकत्र रहात असत. (९) मला हें एवढें गाणें ऐकूं दे. (१०) आम्हांला एक रात्रभर येथें थांबलें पाहिजे. (११) सूर्य

जसजसा वर येऊं लागला तसतसा आम्हांला अधिकाधिक उकाडा होऊं लागला. ( १२ ) ऋण काढून सण करूं नका ( १३ ) अरे, हा पोपट पिंजऱ्यांतून निसटू पहातो, ( १४ ) बदकाला जन्मतःच पाण्यावर पोहतां येतें. ( १५ ) ह्याला काम करावयास नको; खावयास मात्र पाहिजे. ( १६ ) शतयोजनविस्तीर्ण असा समुद्र उल्लंघून कोण पार जाऊं शकेल? ( १७ ) आमचे पूर्वजही आजपर्यंत अशीच संध्या म्हणत आले हें आपण विसरूं नये. ( १८ ) एखादा लेख लिहून काढशील काय ?

## धडा बाहावा.

## कृदन्तांचे इतर उपयोग.

मूळ धातूस निरनिराळे प्रत्यय लागून सात आख्यातांतील क्रियापदें व निरनिराळीं कृदन्तें तयार होतात आणि कृदन्तांचे पुढें सहाय धातु येऊन संयुक्त क्रियापदें बनतात ही गोष्ट आपण आतांपर्यंत पाहिलीच आहे. सहाय धातूंशीं मिलाफ होऊन संयुक्त क्रियापदें बनविणें हा कृदन्तांचा मुख्य उपयोग होय. परंतु याखेरीज दुसऱ्या नात्यानेंही कृदन्तें वाक्यांत येऊं शकतात हें खालील उदाहरणांवरून दिसून येईल.

( १ ) कित्येक कृदन्तें नामाप्रमाणें क्रियापदाच्या कर्तृस्थानीं, कर्मस्थानीं किंवा पूरकस्थानीं येऊं शकतात; अशा कृदन्तांना **नामकृदन्तें** किंवा **धातुसाधित नामें** असें नांव आहे. जसें:—

टीपः—मूळ धातूंना णें प्रत्यय लागून ही कृदन्तें बनतात; व यांना नामाप्रमाणें सर्व विभक्तींचे प्रत्ययही लागतात.

| | |
|---|---|
| फार **बोलणें** चांगलें नाहीं. | **कर्ता.** |
| मी त्याचें सर्व **बोलणें** ऐकिलें. | **कर्म.** |
| वक्तृत्व हें कांहीं **ओरडणें** नव्हे. | **पूरक** |

( २ ) कित्येक कृदन्तें विशेषणाप्रमाणें नामाची व्याप्ति कमी करण्याचें कार्य करितात; अशा कृदन्तांना **विशेषणकृदन्तें** किंवा **धातुसाधितविशेषणें** म्हणतात. जसें:—

( १ ) ताकृदन्तः—उडता पक्षी; रांगतें मूल; धांवती गाडी.

( २ ) णार कृदन्तः—वाचणाऱ्या मुली, बोलणारा प्राणी.

( ३ ) लाकृदन्तः—चुकलेला फकीर; वाचलेलें पुस्तक; पडलेली वस्तु.

( ४ ) षष्ठ्यन्त वाकृदन्तः—करावयाचें काम; लिहावयाचें पत्र.

टीपः—धातुसाधित विशेषणांचा विधिविशेषणांप्रमाणेंही उपयोग होतो, जसें:—ही मुलगी वाचणारी आहे.

( ३ ) कित्येक कृदन्तें क्रियाविशेषणाप्रमाणें क्रियापदानें दर्शविलेल्या क्रियेविषयीं कांहीं माहिती देतात; अशा कृदन्तांना क्रियाविशेषण कृदन्तें किंवा धातुसाधित क्रियाविशेषणें असें म्हणतात; जसें:—

( १ ) त कृदन्तः—तो हंसत बोलतो. ( रीतिदर्शक )

( २ ) तां कृदन्तः—वाचतां वाचतां त्याला झोंप लागली. ( कालदर्शक. )

( ४ ) तांना कृदन्तः—बोलतांना हसूं नये. ( कालदर्शक. )

( ५ ) ऊन कृदन्तः—असें बोलून तो घरीं गेला. ( कालदर्शक. )

( ५ ) चतुर्थ्यंत वाकृदन्तः—तो इंग्रजी शिकावयास. येथें येतो. ( हेतुदर्शक. )

टीपः—कृदन्ताचा जेव्हां नाम, विशेषण किंवा क्रियाविशेषण याप्रमाणें उपयोग होतो तेव्हां सुद्धां कृदन्तानें दर्शविलेल्या क्रियेचा कर्ता, कर्म, पूरक अथवा क्रियाविशेषण या नात्यानें त्यावर अवलंबून इतर शब्द वाक्यांत येऊं शकतात; जसें:-

[ १ ] तो खिडीत असतां मी तेथें गेलों. [ या ठिकाणीं तो हा ' खिडीत असतां ' या संयुक्त कृदन्ताचा कर्ता. ]

[ २ ] तो तेथें इंग्रजी शिकावयास येतो. [ या ठिकाणीं इंग्रजी हें शिकावयास या कृदन्ताचें कर्म. ]

(३) मुंगी होऊन साखर खावी. या ठिकाणीं मुंगी हें 'होऊन' या कृदन्ताचें पूरक.

(४) आरसा खालीं पडून फुटला. या ठिकाणीं खालीं हें 'पडून' या कृदन्ताचें क्रियाविशेषण.

## अभ्यास.

(अ) खालील वाक्यांत आलेलीं कृदन्तें सानुसाधित नामें, विशेषणें व क्रियाविशेषणें यांतून कोणत्या जातीचीं आहेत तें सांगा.

(१) हा द्वाड मुलगा येणाऱ्या जाणाऱ्या लोकांचे अंगावर जळतें कोळीत फेंकतो. (२) तूं रस्त्यानें विडा खातं कां जातोस? (३) लहान मुलें लिहिणेंनें बेडी चाकरी तोंडें करतात. (४) शाळेंत जाणाऱ्या मुलांनीं स्वच्छ कपडे घालून शाळेंत जावें. (५) स्वच्छोदकानें तुडुंब भरलेलें सरोवर, इतस्ततः डुगवलेलीं कमळें व आकाशांत प्रकाशणाऱ्या चंद्राचें प्रतिबिंब हीं पाहून आमच्या मनाला आल्हाद वाटला. (६) हे गाणाऱ्या पक्ष्यांनो, तुमचें गाणें क्षणभर बंद करा व माझी हरवलेली प्रिय सीता तुम्ही कोठें पाहिली काय तें सांगा. (७) दारिद्र्यानें पीडिलेल्या लोकांच्या हालाची कल्पना गाद्यागिर्द्यांवर लोळत पडणाऱ्या श्रीमंतांस कशी होणार?

(ब) वरील वाक्यांत कर्ता, कर्म, पूरक व क्रियाविशेषण या नात्यानें कृदन्तावर अवलंबून असलेले शब्द असल्यास ते सांगा.

---

### धडा अकरावा.

## क्रियापदाचें व्याकरण कसें करावें.

क्रियापदाचें व्याकरण करतांना खालील गोष्टी कराव्या लागतात.

जाति व उपजाति. { (१) त्यांतील मूळ धातु कोणता तें सांगणें.
(२) तो धातु संयुक्त असल्यास सांगून अकर्तृक, अकर्मक, सकर्मक व अपूर्णविधान यांपैकीं कोणत्या जातीचा आहे तें सांगणें.

विकरण { (३) करणरूप आहे की अकरणरूप आहे तें सांगणें.
(४) आख्याताचे नांव व पुरुष, लिंग आणि वचन हीं सांगणें.

अन्वयोग व संबंध { (५) आख्यातानें दर्शविलेल्या अर्थाचें नांव, माहित असल्यास सांगणें.
(६) कर्ता व कर्म सांगून प्रयोग कोणता तें सांगणें.

नमुन्यादाखल खालीं थोड्या क्रियापदांचें व्याकरण करून दाखविलें आहे.

(१) मे महिन्यांत तो पहाटेस उठे

उठेः—हें 'ऊठ' या अकर्मक धातूचें करणरूपी, ई आख्याती, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन, अर्थ रीतिभूत; या क्रियापदाचा 'तो' हा कर्ता व कर्तरि प्रयोग.

(२) मी एक पोपट पाळिला

पाळिलाः—हें 'पाळ' या सकर्मक धातूचें करणरूपी, आख्याती, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन; अर्थ भूतकाळ; या क्रियापदाचा 'मी' हा कर्ता 'पोपट' हें कर्म, व कर्मणि प्रयोग.

(३) त्यानें मला बोलाविलें नाहीं.

बोलाविलें नाहींः—हें 'बोलाव' या सकर्मक धातूचें अकरणरूपी आख्याती, नपुंसकलिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन; अर्थ भूतकाळ; या क्रियापदाचा 'त्यानें' हा कर्ता, 'मला' हें कर्म, व भावे प्रयोग.

(४) एवढें काम संपवून टाका.

संपवून टाकाः—हें 'संपवून टाक' या संयुक्त सकर्मक धातूचें करणरूपी, ऊ आख्याती, पुल्लिंगी द्वितीय पुरुषाचें एकवचन; अर्थ आज्ञा; या क्रियापदाचा 'तुम्ही' हा अध्याहृत कर्ता, 'काम' हें कर्म, व कर्तरिप्रयोग.

# प्रकरण चवथें.

## प्रयोगविचार.

### धडा बारावा.

### कर्तरि, कर्माणि व भावे प्रयोग.

**रामा पुस्तक वाचतो. कुत्रा भाकर खातो. पक्षी उडतात.** या वाक्यांमध्यें कर्त्याऐवजीं भिन्न लिंगवचनपुरुष असलेलीं नामें किंवा सर्वनामें ठेवून क्रियापदाचें रूप बदलतें की नाहीं तें पहा.

आतां कर्माचे ऐवजीं भिन्न लिंगवचनें असलेलीं नामें किंवा सर्वनामें ठेवून क्रियापदाचें रूप बदलतें कीं काय तेंही पहा.

वरील वाक्यांमधील क्रियापदाचें रूप कर्त्याच्या लिंगवचनपुरुषांप्रमाणें बदलणारें आहे. याप्रमाणें **क्रियापदाचें रूप जेव्हां कर्त्याच्या लिंगवचनपुरुषांप्रमाणें बदलणारें असेल तेव्हां त्या क्रियापदाचा कर्तरि प्रयोग आहे असें म्हणतात. कर्तरि प्रयोगांत कर्ता नेहमीं प्रथमा विभक्तींत असतो.**

**रामानें पुस्तक वाचलें. कुत्र्यानें भाकर खाल्ली.** या वाक्यांमधील क्रियापदाचें रूप कर्त्याचे लिंगवचनपुरुषांप्रमाणें फिरणारें नसून कर्माचे लिंगवचनपुरुषांप्रमाणें फिरणारें आहे ही गोष्ट कर्त्याचे व कर्माचे ठिकाणीं भिन्न प्रकारचीं नामें ठेविलीं असतां सहज समजून येईल. याप्रमाणें **क्रियापदाचें रूप जेव्हां कर्माच्या लिंगवचनपुरुषांप्रमाणें बदलणारें असतें, तेव्हां त्या क्रियापदाचा कर्माणि प्रयोग आहे असें म्हणतात. कर्माणि प्रयोगांत कर्ता प्रथमा विभक्तींत नसून कर्म मात्र प्रथमा विभक्तींत असतें.**

**रामानें रावणास मारलें. त्यानें घरीं जावें.** या वाक्यांतील क्रियापदांचीं रूपें कर्ता किंवा कर्म यांचे लिंगवचनपुरुषांप्रमाणें बदलणारीं नसून तीं कर्ता किंवा कर्म कोणत्याही लिंगवचनपुरुषांप्रमाणें असलीं तरी तृतीय पुरुषीं नपुंसकलिंगी एकवचनीं राहतात. याप्रमाणें **क्रियापदाचें रूप जेव्हां कर्ता किंवा कर्म यांचे लिंगवचनपुरुषांप्रमाणें बदलणारें नसून तें नेहमीं तृतीयपुरुषीं नपुंसकलिंगी एकवचनी असतें, तेव्हां त्या क्रियापदाचा भावे प्रयोग आहे असें म्हणतात. भावे प्रयोगामध्यें कर्ता आणि कर्म हीं दोन्हीं प्रथमेशिवाय इतर विभक्तींत असतात.**

टीपः (१) **प्रयोग म्हणजे जुळणी, कर्तरि म्हणजे कर्त्याच्या ठिकाणीं.** क्रियापदाचीं लिंगवचनपुरुष यांचे बाबतींत जेव्हां कर्त्याशीं जुळणी असते तेव्हां त्या क्रियापदाचा कर्तरि प्रयोग असें म्हणतात. **कर्तरि** हें संस्कृतमध्यें **कर्तृ** या नामाचें रूप आहे.

(२) क्रियापदाची लिंगवचनपुरुष यांचे बाबतींत कर्माचे ठिकाणीं जुळणी झाली म्हणजे त्या क्रियापदाचा **कर्मणिप्रयोग** आहे असें म्हणतात. **कर्मणि म्हणजे कर्माचे ठिकाणीं;** हें **संस्कृतमधील कर्मन्** या नामाचें सप्तमीचें **रूप आहे.**

(३) क्रियापदाची जेव्हां कर्त्याशीं किंवा कर्माशीं लिंगवचनपुरुष यांचे बाबतींत जुळणी नसते, म्हणजे कर्ता व कर्म हीं कोणत्याही लिंगवचनपुरुषांचीं असलीं तरी क्रियापद जेव्हां तृतीयपुरुषीं नपुंसकलिंगी एकवचनी असतें तेव्हां **त्याचे लिंगवचनपुरुष जुळतात तरी कशाशीं? रामानें रावणास मारिलें.** या वाक्यांतील **मारिलें** हें क्रियापद तृतीयपुरुषीं नपुंसकलिंगीं एकवचनी आहे. **मारिलें** या क्रियापदांतील धातूचा अर्थ जो मारण्याची क्रिया तो **मारणें** या णेंकारान्त नामानें दर्शविला जातो, व **मारणें** हें नाम तृतीयपुरुषी नपुंसकलिंगी एकवचनी आहे. भावे प्रयोगामध्यें क्रियापदाची जुळणी त्याच्या धात्वर्थदर्शक णेंकारान्त नामाशीं म्हणजेच त्या क्रियापदाच्या भावाच्या किंवा अर्थाच्या ठिकाणीं असते म्हणून अशा प्रयोगाला **भावे प्रयोग** असें म्हणतात.

## प्रयोगांचा थोडा विस्तृत अभ्यास.

पुढील कोष्टकाचें नीट निरीक्षण करा; व कोष्टक पाहून कोष्टकाखालीं लिहिलेल्या प्रश्नांचीं उत्तरें द्या

| उदाहरणें. | प्रयोग. | कर्ता. | कर्म. (असल्यास) | आख्यात. |
| --- | --- | --- | --- | --- |
| रामा जातो.<br>रामा काम करतो.<br>रामा मला मारतो. | कर्तरि, | प्रथमेंत, | प्रथमेंत किंवा चतुर्थींत. | प्रथम ताख्यात. |
| जर रामा जाता.<br>जर रामा काम करता.<br>जर रामा मला मारता. | कर्तरि. | प्रथमेंत. | प्रथमेंत किंवा चतुर्थींत. | द्वितीय ताख्यात. |
| रामा जाई<br>रामा काम करी.<br>रामा कुत्र्याला मारी. | कर्तरि. | प्रथमेंत. | प्रथमेंत किंवा चतुर्थींत. | ई आख्यात. |
| रामा जाईल.<br>रामा काम करील.<br>रामा कुत्र्याला मारील. | कर्तरि. | प्रथमेंत. | प्रथमेंत किंवा चतुर्थींत. | ईलाख्यात. |
| रामा जावो.<br>रामा काम करो<br>रामा कुत्र्याला मारो. | कर्तरि. | प्रथमेंत. | प्रथमेंत किंवा चतुर्थींत. | ऊ आख्यात. |
| रामा गेला. | कर्तरि. | प्रथमेंत. | अकर्मक क्रियापद. | लाख्यात. |
| रामानें काम केलें. | कर्मणि. | तृतीयेंत. | प्रथमेंत किंवा | लाख्यात. |
| रामानें मला मारिलें | भावे. | तृतीयेंत. | चतुर्थींत. | लाख्यात. |
| रामा जावा. | कर्तरि. | प्रथमेंत. | अकर्मक क्रियापद | वाख्यात. |
| रामानें जावें. | भावे. | तृतीयेंत. | अकर्मक क्रियापद. | वाख्यात. |
| रामानें काम करावें. | कर्मणि. | तृतीयेंत. | प्रथमेंत किंवा | वाख्यात. |
| रामानें मला मारावें. | भावे. | तृतीयेंत. | चतुर्थींत. | वाख्यात. |

प्रश्न.

(अ) कर्तरि प्रयोग.

[१] कर्तरि प्रयोगात कर्ता कोणत्या विभक्तींत असतो?

[२] क्रियापद सकर्मक असल्यास कर्तरि प्रयोगांत कर्म कोणत्या विभक्तींत असतें?

[३] (अ) सात आख्यातांपैकीं कोणत्या आख्यातांमध्यें अकर्मक क्रियापदांचा कर्तरि प्रयोग होतो?
(ब) सात आख्यातांपैकीं कोणत्या आख्यातांमध्यें सकर्मक क्रियापदांचा कर्तरि प्रयोग होतो?

(ब) कर्मणि प्रयोग.

[१] कर्मणि प्रयोगांत कर्ता कोणत्या विभक्तींत असतो?

[२] कर्मणि प्रयोगांत कर्म कोणत्या विभक्तींत असतें?

[३] सात आख्यातांपैकीं कोणत्या आख्यातांमध्यें कर्मणि प्रयोग होतो

(क) भावे प्रयोग.

[१] भावे प्रयोगांत कर्ता कोणत्या विभक्तींत असतो?

[२] क्रियापद सकर्मक असल्यास भावे प्रयोगांत कर्म कोणत्या विभक्तींत असतें?

[३] (अ) सात आख्यातांपैकीं किती आख्यातांमध्यें अकर्मक क्रियापदांचा भावे प्रयोग होतो?
(ब) सात आख्यातांपैकीं किती आख्यातांमध्यें सकर्मक क्रियापदांचा भावे प्रयोग होतो?

## कर्तरि व भावे प्रयोग.

(१) अकर्मक क्रियापदाचा वाक्याती कर्तरि किंवा भावे यांपैकीं कोणताही प्रयोग होतो असें वरील कोष्टकावरून दिसून येतें.

(२) या बाबतींत मराठी भाषेचा असा प्रघात आहे कीं क्रियापदावरून अजमासाचा अर्थ निघत असेल तर कर्तरि प्रयोग होतो; व कर्तव्याचा होत असेल तर भावे प्रयोग होतो. (कोष्टकांतील उदाहरणें पहा.)

( ३ ) आतां कर्तव्य हें फक्त मनुष्यप्राण्यांतच असल्यामुळें कर्ता जेव्हां मनुष्यवाचक नाम असेल तेव्हांच भावे प्रयोग होणें शक्य आहे; जसें:—रामानें जावें. परंतु "पावसानें पडावें" असें म्हणतां येत नाहीं.

( ४ ) अंदाज हा मात्र मनुष्यप्राणी, किंवा इतर प्राणी किंवा निर्जीव वस्तु यांचेबद्दल करतां येत असल्यामुळें वाटेल तें नाम अथवा सर्वनाम कर्त्याचे ठिकाणीं असतां कर्तरि प्रयोग होऊं शकतो जसें:— रामा आज यावा, आज पाऊस पडावा.

## कर्मणि व भावे प्रयोग.

सकर्मक क्रियापदांचा काळ्यातीं व वाक्यातीं कर्मणि किंवा भावे यांचेपैकीं कोणताही प्रयोग होऊ शकतो असें कोष्टकांवरून दिसून येतें.

( १ ) या बाबतींत मराठी भाषेचा असा प्रघात आहे कीं, कर्म प्रथमेंत असलें म्हणजे कर्मणि प्रयोग होतो, व कर्म चतुर्थीत असलें म्हणजे भावे प्रयोग होतो.

( २ ) कर्माचे ठिकाणीं निर्जीव पदार्थवाचक नाम असलें म्हणजे कर्म प्रथमेंत ठेवण्याचा मराठी भाषेचा प्रघात आहे. म्हणून निर्जीव पदार्थवाचक नाम कर्माचे ठिकाणीं असतांना सकर्मक क्रियापदांचा भूतकाळीं कर्मणि प्रयोगच होतो. भावे प्रयोग होत नाहीं.

( ३ ) कर्माचे ठिकाणीं प्राणिवाचक नाम, किंवा मनुष्यवाचक सामान्यनाम, किंवा त्याबद्दल आलेलें सर्वनाम हीं आलीं असतां कर्म प्रथमा किंवा चतुर्थी यांपैकीं कोणत्याही विभक्तींत ठेवण्याचा मराठी भाषेचा प्रघात आहे. म्हणून अशा प्रकारचीं नामें किंवा सर्वनामें कर्माचे ठिकाणीं असल्यास सकर्मक क्रियापदाचा भूतकाळीं कर्मणि किंवा भावे कोणताही प्रयोग होतो.

(४) मनुष्यप्राणिवाचक विशेषनाम किंवा त्याचें सर्वनाम, किंवा मी व तूं हीं सर्वनामें कर्माचे ठिकाणीं आलीं असतां कर्म चतुर्थीत ठेवण्याचा मराठी भाषेचा प्रघात आहे. म्हणून त्यांपैकीं एखादा शब्द कर्माचे ठिकाणीं आल्यास सकर्मक क्रियापदाचा भूतकाळीं भावे प्रयोगच होतो; कर्मणिप्रयोग होत नाहीं.

## अभ्यास.

**पुढील वाक्यांतील क्रियापदांचे प्रयोग कोणते आहेत तें सांगा.**

(१) नागपूर येथील व्यायामशाळेंतील प्रेक्षणीय खेळ आम्हीं पाहिले. (२) प्रत्येकानें राष्ट्राची यथाशक्ति सेवा करावी. (३) एकीनें साम्राज्याचें पाऊल खात्रीनें पुढेंच पडेल. (४) वृद्ध पित्यानें कुटुंबाचा भार वहावा व तरुण पुत्रानें चैनींत दंग असावें हें योग्य नव्हे. (५) तुला कोणीं मारिलें ! (६) राजानें प्रजेचें रक्षण करावें व प्रजेनें राजास करभार द्यावा. (७) चंद्राचा प्रकाश राजवाड्यावर आणि झोपडीवर सारखाच पडतो. (८) अंतरिक्षांतून चमत्कार पहात पहात श्रीरामचंद्र अयोध्येस परत आले. (९) माळी झाडांना पाणी देतो व त्यांस टवटवी आणतो. (१०) त्यांनीं आपलें सर्व आयुष्य आणि पैसा हीं राष्ट्राच्या उन्नतीकरितां वेचिलीं. (११) जहाज वादळांत सांपडून बुडालें.

## धडा तेरावा.

## प्रयोगसंकर.

वाक्यांतील क्रियापद, लिंग, वचन व पुरुष यांचे बाबतींत कर्त्याशीं जुळत असेल तर त्या क्रियापदाचा कर्तरि प्रयोग असून कर्माशीं जुळत असेल तर त्याचा कर्मणि प्रयोग असतो; व दोहोंशींहि जुळणारें नसून तें नेमर्मी तृतीय पुरुषीं, नपुंसकलिंगी, एकवचनीं राहणारें असेल तर त्या क्रियापदाचा भावे-प्रयोग असतो हें आपण मागील धड्यांत पाहिलें. आतां खालील वाक्यांतील क्रियापद कर्त्याशीं जुळतें की कर्माशी तें सांगा.

## तूं हें काम केलेंस.

( १ ) या ठिकाणीं केलेंस या क्रियापदाला स हा द्वितीय पुरुषी एकवचनी प्रत्यय लागला आहे. तूं याबद्दल तुम्ही असें अनेकवचनी सर्वनाम कर्त्याचे ठिकाणीं ठेवलें तर क्रियापदाचें रूप केलेंत असें होतें; म्हणजे क्रियापदाचें रूप कर्त्याच्या पुरुष व वचन यांचे बाबतींत बदलणारें आहे. यावरून हा कर्तरि प्रयोग आहे असें वाटतें.

( २ ) परंतु काम या नपुंसकलिंगी एकवचनी नामाऐवजी कामें असें अनेकवचनी नाम ठेवलें तर केलेंस या क्रियापदाऐवजीं केलींस असें क्रियापदाचें रूप येतें; म्हणजे क्रियापदाचें रूप कर्माप्रमाणेंही बदलणारें आहे. यावरून हा कर्मणि प्रयोग आहे असें वाटतें.

( ३ ) तर मग वरील वाक्यांतील क्रियापदाचा प्रयोग तरी कोणता मानावा ? कर्तरि मानिला तर क्रियापदाचें रूप कर्माप्रमाणेंही बदलणारें आहे, कर्मणि मानावा तर क्रियापदाचें रूप कर्त्याप्रमाणेंही बदलणारें आहे.

( ४ ) केलेंस या क्रियापदामध्यें कर्तरि व कर्मणि या दोन्ही प्रयोगांची भेसळ झाली आहे. म्हणून या क्रियापदाच्या प्रयोगाला कर्तृकर्मसंकर असें नांव देणेंच योग्य आहे.

टीपः—तूं हें काम केलेंस, या व यासारख्याच इतर वाक्यांचा प्रयोग कोणता मानावा या प्रश्नासंबंधींचा इतिहास मोठा मनोरंजक आहे.

( १ ) मराठी भाषेचे आद्य व्याकरणकार दादोबा यांनीं अशा प्रकारचीं वाक्यें अशुद्ध आहेत असें मानून लोकांनीं "तूं हें काम केलेंस" असें वाक्य न म्हणतां "तूं हें काम केलें" असें म्हणत जावें व वाक्याचा प्रयोग कर्मणि मानावा असा आपला अभिप्राय दिला.

( २ ) परंतु अशा प्रकारचीं वाक्यें प्रौढ व शुद्ध भाषेंत पुष्कळ दिसून येतात, तेव्हां तीं अशुद्ध आहेत असा शेरा मारणें व्याकरणकाराला योग्य नाहीं; व जरी व्याकरणकारानें तसा शेरा दिला तरी जोंपर्यंत प्रत्येक लेखकाची लेखणी व बोलणाराची जीभ धरण्याचें व्याकरणकाराचे अंगीं सामर्थ्य नाहीं, तोंपर्यंत त्याच्या नुसत्या शेऱ्यानें कांहींएक उपयोग व्हावयाचा नाहीं. त्यापेक्षां ज्या अर्थी अशा प्रकारचीं वाक्यें शिष्ट लोकांच्या बोलण्यांत व लिहिण्यांत येतात त्या अर्थी तीं शुद्धच आहेत असें धरून चालून त्यांचा प्रयोग कोणता तें ठरविणेंच व्याकरणकाराला योग्य असें **के. रा. भि. जोशी** यांनीं आपलें मत दिलें; व अशा वाक्यांत कर्त्याला प्राधान्य देण्याचा बोलणाराचे मनांत हेतु असतो म्हणून अशा वाक्यांचा **कर्तरि प्रयोग** मानावा असा त्यांनीं आपला अभिप्राय दिला.

( ३ ) परंतु प्रयोग मानावयाचा तो बोलणाराचे मनांत कोणाला प्राधान्य द्यावयाचें होतें; यावरून न मानतां वाक्यांतील क्रियापद लिंगवचनपुरुष यांचे बाबतींत कशाशीं जुळतें यावरून मानला पाहिजे, ही गोष्ट प्रयोग या शब्दाच्या अर्थावरून स्पष्टपणें दिसून येणारी आहे. प्रयोग म्हणजे ( क्रियापदाची लिंगवचनपुरुष यांचें बाबतींत ) **जुळणी.** " अमुक क्रियापदाचा प्रयोग कोणता ?" या प्रश्नाचा अर्थ " तें क्रियापद लिंगवचनपुरुष यांचे बाबतींत कशाशीं जुळतें?" असाच होतो. व या अर्थाप्रमाणें " तूं हें काम केलेंस" या वाक्यांतील **केलेंस** हें क्रियापद लिंगवचनपुरुष यांचे बाबतींत कर्ता व कर्म या दोहोंशींही जुळतें असल्यामुळें **हा कांहीं अंशीं कर्तरि व कांहीं अंशीं कर्मणि प्रयोग आहे** असेंच म्हणावें लागतें. **संकर** म्हणजे भेसळ, ही संज्ञा मराठी व्याकरणामध्यें सुप्रसिद्ध व्याकरणकार **कै. मोरो केशव दामले** यांनीं प्रथम आणली.

कर्तरि, कर्मणि व भावे हे तीन मुख्य प्रयोग आहेत. त्यांपासून ( १ ) कर्तृकर्मसंकर, ( २ ) कर्तृभावसंकर, ( ३ ) कर्मभावसंकर आणि ( ४ ) कर्तृकर्मभावसंकर असे चार संकर होणें शक्य आहे; व या सर्वांचा भाषेमध्यें थोडाफार प्रचार आहे हें खालील उदाहरणांवरून दिसून येईल.

| मूळ वाक्यरचना. | संकर. |
|---|---|
| तूं हें काम करतोस—कर्तरि.<br>तूं हें काम केलें—कर्मणि. | तूं हें काम केलेंस—कर्तृकर्मसंकर. |
| तूं मला बोलावतोस—कर्तरि.<br>तूं मला बोलाविलें—भावे. | तूं मला बोलाविलेंस – कर्तृभाव-संकर. |
| त्यानें बैल झोडपला—कर्मणि.<br>त्यानें बैलाला झोडपलें—भावे. | त्यानें बैलाला झोडपला—कर्मभाव-संकर. |
| तूं मुलीला निजवितोस—कर्तरि.<br>तूं मुलीला निजविलें—भावे.<br>तूं मुलगी निजविली—कर्मणि. | तूं मुलीला निजविलीस– कर्तृकर्म-भावसंकर |

---

## धडा चवदावा.

## कर्तृप्रधान, कर्मप्रधान व भावप्रधान वाक्यरचना.

ताख्यात व आख्यात या आख्यातांखेरीज इतर आख्यातांमध्यें क्रियापदाचा कर्तरिप्रयोगच होतो, कर्मणि किंवा भावे होत नाहीं ही गोष्ट आपण मागील धड्यामध्यें पाहिली. परंतु सहाय धातूंचे मदतीनें क्रियापदाचे सर्व आख्यातामध्यें कर्मणि प्रयोग होऊं शकतात ही गोष्ट खालील उदाहरणावरून स्पष्टपणें कळून येईल.

### प्रकार पहिलाः—लाकृदन्त+जा सहाय धातु.

(१) प्रथम ताख्यातः—शिपायाकडून चोर धरला जातो.
(२) द्वितीय ताख्यातः—जर शिपायाकडून चोर धरला जाता.
(३) ई आख्यातः—शिपायाकडून चोर धरला जाई.
(४) ईलाख्यातः—शिपायाकडून चोर धरला जाईल.
(५) ऊ आख्यातः—शिपायाकडून चोर धरला जावो.
(६) लाख्यातः—शिपायाकडून चोर धरला गेला.
(७) वाख्यातः—शिपायाकडून चोर धरला जावा.

### प्रकार दुसराः—सप्तम्यन्त णेंकृदन्त+ये साहाय धातु.

(१) प्रथम ताख्यातः—शिपायाकडून चोर धरण्यांत येतो.

इत्यादि. इत्यादि. इत्यादि.

प्रकार तिसरा:—ऊनकृदन्त+हो सहाय धातु.

(१) प्रथम ताख्यात:—माझें पत्र लिहून होतें.
(२) द्वितीय ताख्यात:—जर माझें पत्र लिहून होतें.
(३) ई आख्यात:—माझें पत्र लिहून होई.
(४) ईलाख्यात:—माझें पत्र लिहून होईल.
(५) ऊ आख्यात:—माझें पत्र लिहून होवो.
(६) लाख्यात:—माझें पत्र लिहून झालें.
(७) वाख्यात:—माझें पत्र लिहून व्हावें.

टीप:—या ठिकाणीं लिहून हें कृदन्त लिहिणें या अर्थी क्रियावाचक नाम मानून व त्याला पुढील होतें, होई वगैरे क्रियापदाचा कर्ता मानून वाक्याचा कर्तरिप्रयोग समजण्याचा पूर्वीच्या व्याकरणकारांचा प्रघात होता. परंतु होतें होई वगैरे क्रियापदें पत्र या नामाच्या लिंगवचनपुरुषांस अनुसरणारी असल्यामुळें (पत्र या नामाऐवजीं पत्रें हें अनेकवचनीं नाम घालून पहा.) लिहून हें कृदन्त त्या क्रियापदाचा कर्ता होऊंच शकत नाहीं. त्यापेक्षां लिहून होणें हें संयुक्त क्रियापद मानून क्रियापद कर्माप्रमाणें फिरत असल्यामुळें वाक्याचा कर्मणिप्रयोगच मानणें इष्ट आहे. जुन्या व्याकरणकारांची ही चूक प्रथम के. दामले यांनींच निदर्शनास आणली.

प्रकार चवथा:—ताकृदन्त+ये सहाय धातु.

(१) प्रथम ताख्यात:—मला पत्र लिहितां येतें.
(२) द्वितीय ताख्यात:—जर मला पत्र लिहितां येतें,

इत्यादि. इत्यादि. इत्यादि.

टीप:—अशा वाक्यांमध्यें लिहितां हें कृदन्त येतें या क्रियापदाचा कर्ता मानण्याची कांहीं व्याकरणकारांची चाल होती. परंतु आख्यातरूप पत्र या नामाप्रमाणें बदलणारें असल्यामुळें वाक्याचा कर्मणिप्रयोग मानणेंच इष्ट आहे. व्याकरणामध्यें ही सुधारणाहि प्रथम के. दामले यांनींच घडवून आणली.

प्रकार पांचवा:—शक्य धातु.

(१) प्रथम ताख्यात:—मला किंवा माझ्यानें पत्र लिहवतें.

( २ ) द्वितीय ताख्यात: —जर मला किंवा माझ्यानें पत्र लिहवतें,
( ३ ) ई आख्यात:— मला पत्र लिहवे,
( ४ ) ईलाख्यात:—मला पत्र लिहवेल,
इत्यादि. इत्यादि. इत्यादि.

## निरीक्षण.

( १ ) पहिल्या प्रकारांतील व दुसऱ्या प्रकारांतील कर्मणि प्रयोगाचीं वाक्यें ( शिपायाकडून चोर धरला जातो, धरण्यांत येतो ) हीं एकाच अर्थाचीं आहेत.

( २ ) तिसऱ्या प्रकारांतील कर्मणि प्रयोगाच्या वाक्याच्या अर्था-मध्यें क्रियासमाप्तीचा बोध विशेषेंकरून होतो. ('माझें पत्र लिहून झालें' म्हणजे लिहिण्याची क्रिया समाप्त झाली; 'लिहून होईल' म्हणजे लिहिण्याची क्रिया पूर्ण होईल. )

( ३ ) चवथ्या व पांचव्या प्रकारांतील कर्मणि प्रयोगाचीं वाक्यें एकाच अर्थाचीं असून त्यांच्यामध्यें क्रियापदांतील मुख्य धातूनें दर्शविलेली क्रिया करण्याचें कर्त्याचे अंगीं सामर्थ्य आहे, असा अर्थ आहे. अशा कर्मणि प्रयोगांना **शक्य कर्मणि** असें आपण नांव देऊं.

### 'शिपायाकडून चोर धरला जातो' व 'शिपाई चोराला धरतो' या दोन वाक्यांत कोणकोणते फरक आहेत ?

( अ ) पहिलें वाक्य कर्मणि प्रयोगाचें असून दुसरें कर्तरि प्रयोगाचें आहे. हा एक फरक अगदीं उघडच दिसत आहे.

( ब ) अर्थदृष्ट्या दोन्ही वाक्यें जवळ जवळ एकच भाव दर्शवितात. फरक इतकाच दिसतो कीं 'शिपाई चोराला धरतो' या वाक्यांत बोलणाराचें मनांत 'शिपाई' या कर्त्याला प्राधान्य द्यावयाचें असून 'शिपायाकडून चोर धरला जातो या वाक्यामध्यें बोलणाराचें मनांत चोर' या कर्माला प्राधान्य द्यावयाचें असतें.

(क) ज्या वाक्यामध्यें कर्त्याला प्राधान्य दिलेलें असतें त्या वाक्याला **कर्तृप्रधान वाक्य** असें आपण नांव देऊं, व ज्या वाक्यामध्यें कर्माला प्राधान्य दिलेलें असतें त्या वाक्याला **कर्मप्रधान वाक्य** असें आपण नांव देऊं.

खालीं कर्तृप्रधान व कर्मप्रधान वाक्यें सर्व आख्यातांत लिहून दाखविलीं आहेत, त्यांचे प्रयोग कोणते आहेत तें सांगा.

| आख्यात. | कर्तृप्रधान वाक्यें. | कर्मप्रधान वाक्यें. |
|---|---|---|
| प्रथम ताख्यात | रामा पत्र लिहितो.<br>शिपाई मला पकडतो. | रामाकडून पत्र लिहिलें जातें.<br>मी शिपायाकडून पकडला जातों. |
| द्वितीय ताख्यात. | जर रामा पत्र लिहिता,<br>जर शिपाई मला पकडता, | जर रामाकडून पत्र लिहिलें जातें.<br>जर मी शिपायाकडून पकडला जातों, |
| ई आख्यात. | रामा पत्र लिही.<br>शिपाई मला पकडी. | रामाकडून पत्र लिहिलें जाई.<br>मी शिपायाकडून पकडला जाई. |
| ईलाख्यात. | रामा पत्र लिहील.<br>शिपाई मला पकडील. | रामाकडून पत्र लिहिलें जाईल.<br>मी शिपायाकडून पकडला जाईल. |
| ऊ आख्यात. | रामा पत्र लिहो.<br>शिपाई मला पकडो. | रामाकडून पत्र लिहिलें जावो.<br>मी शिपायाकडून पकडला जाऊं ? |
| लाख्यात. | रामानें पत्र लिहिलें.<br>शिपायानें मला पकडलें | रामाकडून पत्र लिहिलें गेलें.<br>मी शिपायाकडून पकडला गेलों |
| वाख्यात. | रामानें पत्र लिहावें.<br>शिपायानें मला पकडावें. | रामाकडून पत्र लिहिलें जावें.<br>मी शिपायाकडून पकडला जावा. |

## निरीक्षण.

(१) कर्मप्रधान वाक्यांतील सर्व क्रियापदांचे प्रयोग कर्मणि आहेत.

( २ ) कर्तृप्रधान वाक्यांतील प्रथम व द्वितीय ताख्यात, ई आख्यात ईलाख्यात, व ऊ आख्यात या आख्यातांतील क्रियापदांचे प्रयोग कर्तरि आहेत. परंतु लाख्यात व वाख्यात यांतील क्रियापदांचे प्रयोग मात्र जरी तीं वाक्यें कर्तृप्रधान आहेत तरी, कर्मणि किंवा भावे आहेत.

टीपः—[ १ ] खरें पाहिलें असतां कर्तृप्रधान वाक्यांतील क्रियापदांचे प्रयोग नेहमीं कर्तरि असावे व कर्मप्रधान वाक्यांतील क्रियापदांचे प्रयोग नेहमीं कर्मणि असावे. मराठी भाषेमध्यें कर्मप्रधान वाक्यांचे प्रयोग कोणत्याही आख्यातीं कर्मणि असतात; परंतु वाक्यांत सकर्मक क्रियापद असलें म्हणजे वाक्य कर्तृप्रधान असतांनाही वाख्यात व लाख्यात यांमध्यें क्रियापदाचा कर्मणि किंवा भावे प्रयोग होतो; कर्तरि प्रयोग होत नाहीं. हें मराठी भाषेमध्यें बरेंच वैगुण्य आहे. इंग्रजी व संस्कृत भाषांमध्यें मात्र कर्तृप्रधान वाक्यांतील क्रियापदाचा कोणत्याही आख्यातामध्यें कर्तरि प्रयोग असतो व कर्मप्रधान वाक्यांतील क्रियापदाचा कर्मणि प्रयोग असतो.

[ २ ] मराठींतील सकर्मक क्रियापदें लाख्यातीं व वाख्यातीं बोलणाराचें मनांत कर्त्याला प्राधान्य द्यावयाचें असलें तरी सुद्धां हेकेखोरपणानें कर्मणि अथवा भावे प्रयोगाचे मार्गानें चालतात. कर्तरि प्रयोगाच्या मार्गानें चालतच नाहींत, असें आपण आतांपर्यंत पाहिलें. परंतु मराठींतील सर्वंच सकर्मक क्रियापदें अशीं हेकेखोर नाहींत. उमज धातूच्या गणांतील धातू लाख्यातीं ( वाख्यातीं नाहींत ) आपला हेकडपणा सोडून देऊन कर्तरिप्रयोगाचे मार्गानें चालतात. आणि 'आचर' गणांतील धातू लाख्यातीं विकल्पेंकरून कर्तरि अथवा कर्मणि व भावे या प्रयोगीं चालतात.

जा, ये, हो, या सहाय धातूंचे मदतीनें सकर्मक धातूचा सर्व आख्यातीं कर्मणि प्रयोग होऊं शकतो हें आपण आतांपर्यंत पाहिलें; हो या सहाय धातूचे मदतीनें व क्रियापदांचे शक्यरूपानें अकर्मक धातूचा सर्व आख्यातीं भावे प्रयोग होतो हें खालील उदाहरणावरून दिसून येईल.

१. प्रथम ताख्यात:—त्याचें निजून होतें.
२. द्वितीय ताख्यात:—जर त्याचें निजून होतें.
३. ईअ ख्यात:—त्याचें निजून होई.
४. ईलाख्यात:—त्याचें निजून होईल.
५. लाख्यात:—त्याचें निजून झालें.
६. वाख्यात:—त्याचें निजून व्हावें.
७. ऊ आख्यात:—त्याचें निजून होवो.

## शक्य क्रियापदें.

१. प्रथम ताख्यात:—मला अथवा माझ्यानें जाववतें.
२. द्वितीय ताख्यात:—जर मला अथवा माझ्यानें जाववतें.
३. ईआख्यात:—मला अथवा माझ्यानें जाववे.
४. ईलाख्यात:—मला अथवा माझ्यानें जाववेल.
५. लाख्यात:—मला अथवा माझ्यानें जाववलें.
६. वाख्यात:—मला अथवा माझ्यानें जावावावें.
७. ऊ आख्यात:—मला अथवा माझ्यानें जाववो.

'त्याचें निजून झालें' 'त्याला' अथवा 'त्याच्यानें जावेल' अशा प्रकारच्या भावे प्रयोगाच्या वाक्यांत बोलणाराचे मनांत कर्त्याला प्राधान्य द्यावयाचें नसून मुख्य धातुनें दर्शविलेल्या जाणाऱ्या क्रियेलाच प्राधान्य द्यावयाचें असतें. अशा वाक्यांना आपण **भावप्रधान वाक्यें** असें नांव देऊं.

टीपः—'त्यानें जावें.' 'रामानें रावणास मारिलें.' या वाक्यांतील क्रियापदांचे प्रयोग जरी भावे असले तरी हीं वाक्यें मात्र कर्तृप्रधान आहेत हें आपण अगोदर पाहिलेंच आहे.

**या भाग्यांत आपण काय शिकलों ?**

[ १ ] सहाय धातूचे मदतीनें व मुख्य धातूच्या शक्य रूपानें सकर्मक क्रियापदांचे सर्व आख्यातीं कर्मणि प्रयोग व अकर्मक क्रियापदांचे भावे प्रयोग होऊं शकतात.

[२] बोलणाराचे मनांत कर्ता, कर्म व धात्वर्थ यांपैकीं ज्यास प्राधान्य द्यावयाचें असेल त्यावरून वाक्याचे कर्तृप्रधान, कर्मप्रधान व भावप्रधान असे तीन प्रकार होतात.

[३] बोलणाराचे मनांत कर्त्याला प्राधान्य द्यावयाचें होतें असें ज्या वाक्यावरून दिसतें त्या वाक्याला कर्तृप्रधान वाक्य असें म्हणतात.

[अ] प्रथम व द्वितीय आख्यात, ई-आख्यात, ऊ आख्यात व ईलाख्यात या आख्यातीं कर्तृप्रधान वाक्यांतील क्रियापदाचा कर्तरि प्रयोग असतो.

[आ] क्रियापद अकर्मक असेल तर सर्व आख्यातीं कर्तृप्रधान वाक्यामध्यें त्याचा कर्तरि प्रयोग असतो; व वाख्यातीं भावे प्रयोगही असतो.

[इ] क्रियापद सकर्मक असतां (उमज गण सोडून) लाख्यातीं व वाख्यातीं कर्तृप्रधान वाक्याचा प्रयोग कर्मणि किंवा भावे होतो.

[४] बोलणाराचे मनांत कर्माला प्राधान्य द्यावयाचें होतें असें वाक्यावरून दिसत असल्यास त्या वाक्याला कर्मप्रधान वाक्य असें म्हणतात. कर्मप्रधान वाक्याचा प्रयोग नेहमीं कर्मणि असतो.

[५] बोलणाराचे मनांत कर्ता व कर्म यांना प्राधान्य द्यावयाचें होतें असें नसून केवळ धातूनें दर्शविलेल्या क्रियेलाच प्राधान्य द्यावयाचें होतें असें वाक्यावरून दिसून आल्यास त्या वाक्याला भावप्रधान वाक्य असें म्हणतात. भावप्रधान वाक्याचा नेहमीं भावे प्रयोग असतो.

# खंड सातवें.

## अव्ययविचार.

### धडा पहिला

### क्रियाविशेषण म्हणजे काय?

'कासव हळूहळू चालतात.' 'मी उद्यां येईन.' 'मी खचीत येईन.' या वाक्यांमध्यें हळूहळू, उद्यां, व खचीत या शब्दांनीं त्या त्या क्रियापदांनीं दर्शविलेल्या क्रियेबद्दल कांहीं विशेष माहिती सांगितली म्हणून त्यांस क्रियाविशेषण हें नांव दिलें पाहिजे; व हे शब्द अविकारीही आहेत म्हणून त्यांस क्रियाविशेषण अव्यय हें नांव दिलें पाहिजे. या गोष्टी आपण व्याकरण प्रवेशिकेच्या प्रथम पुस्तकामध्यें पाहिल्याच आहेत.

**व्याख्या—ज्या अविकारी शब्दानें वाक्यांतील क्रियापदानें दर्शविलेल्या क्रियेबद्दल कांहीं विशेष माहिती मिळते त्या शब्दाला क्रियाविशेषण अव्यय असें म्हणतात.**

(१) आतां खालील वाक्यांमध्यें जाड अक्षरांत लिहिलेल्या शब्दांनीं कोणतें कार्य केलें तें सांगा.

तूं **फार** धांवतोस. { तूं **फार** चांगला मुलगा आहेस. / तूं **फार** जलद बोलतोस.

डाव्या बाजूच्या वाक्यांत 'फार' या क्रियाविशेषणानें 'धांवतोस' या क्रियापदानें दर्शविलेल्या क्रियेबद्दल विशेष माहिती सांगितली आहे. परंतु उजव्या बाजूच्या पहिल्या वाक्यांत 'चांगला' या विशेषणाबद्दल तर दुसऱ्या वाक्यांत 'जलद' या क्रियाविशेषणाबद्दल 'फार' या क्रियाविशेषणानें माहिती सांगितली आहे. यावरून असें दिसून येतें कीं, **क्रियाविशेषणें केवळ क्रियापदाच्याच अर्थांत भर टाकतात असें नसून तीं विशेषणें व क्रियाविशेषणें यांचेही अर्थांत भर टाकतात.**

(२) क्रियाविशेषणें अविकारी असतात असें वर म्हटलें आहे; परंतु हेंही पूर्णपणें खरें नाहीं.

(अ) कित्येक क्रियाविशेषणांस नामाप्रमाणे विभक्तीप्रत्यय व शब्दयोगी अव्ययें लागतांना दिसतात; जसें:--उद्यां, उद्यांपासून; इकडे, इकडेस; इकडनें, इकडून, इकडचा; वर, वरून; वरचा; इत्यादि, परंतु अशीं क्रियाविशेषणें फार नाहींत; व त्यांना नामाप्रमाणें लिंग व वचन यांचे विकार होत नाहीत. इकडेस, इकडून वगैरे शब्द इकडे या क्रियाविशेषणापासून झालेलीं नवीन क्रियाविशेषणेंच आहेत. त्यांस इकडे या क्रियाविशेषणाचे विकार न मानतां साधित क्रियाविशेषणेंच मानावें हें चांगलें.

(आ) कित्येक वेळा विशेषणें क्रियाविशेषणाप्रमाणें क्रियापदाला लागतात, हीं मूळचीं विशेषणें जर आकारान्त असलीं तर त्यांचीं रूपेंहि लिंग वचन यांस अनुसरून बदलणारीं असतात; जसें:—रामा हें पुस्तक **चांगलें** वाचतो, तो ही पोथी **चांगली** वाचतो. दांडी तिरपी बसली, दांड्या तिरप्या बसल्या

टीपः—क्रियाविशेषण ज्याप्रमाणें क्रियापदाच्या [ किंवा विशेषण व क्रियाविशेषण यांच्या ] अर्थांत भर घालतें त्याप्रमाणे नामाच्या विभक्तिरूपांनीं व कित्येक कृदन्तांनीं सुद्धां क्रियेच्या अर्थांत भर टाकण्याचें कार्य होतें. विभक्तीचे अर्थ व कृदन्ताचे इतर उपयोग हे दोन धडे पुन्हा वाचून पहा, म्हणजे विभक्तिरूपें व कृदन्तें ही क्रियाविशेषणाचें कार्य कसें करतात तें समजून येईल.

## अभ्यास.

**(अ) खालील वाक्यांतील क्रियाविशेषणें ओळखून त्यांनीं क्रियापद, विशेषण व क्रियाविशेषण यांपैकीं कोणत्या शब्दांच्या अर्थांत भर टाकली आहे तें सांगा.**

[ १ ] कांहीं लोक बोलतांना फार जलद बोलतात व म्हणून त्यांचें बोलणें स्पष्ट ऐकूं येत नाहीं. [ २ ] दरसाल आम्हांला सरासरी वीस खंडी कापूस होतो. [ ३ ] अंमळ पुढें सरक आणि मग स्वस्थ नीज. [ ४ ] पूर्ण विकासलेल्या कमळांनीं तें सरोवर अत्यंत मनोहर दिसत होतें. [ ५ ] आतां मी पुन्हा कधींही त्याचें तोंड पाहणार नाहीं असें तो अधिकाधिक उच्च स्वरानें म्हणत व हातपाय आपटीत निघून गेला.

(आ) खालील वाक्यांतील जाड अक्षरांत लिहिलेल्या शब्दांपैकीं विशेषणें कोणतीं व क्रियाविशेषणें कोणतीं तें सांगा. व कारणें द्या.

मी तेथें एक **उंच** इमारत पाहिली. पक्षी **उंच** उडतात. भात **फार** वाढत आहे. मला **फार** गोंगाट आवडत नाहीं. **वाईट** मुलांची संगत धरूं नका. तूं फार **वाईट** वाचतोस. हा **व्यर्थ** खटाटोप बंद करा. तो **व्यर्थ** प्राणास मुकला. वानराच्या शेपट्या **लांब** असतात. तो **लांब** बसला. दोन **सरळ** रेषा काढा. कुत्रें **सरळ** घरांत शिरलें.

**धडा दुसरा.**

## क्रियाविशेषणांचें वर्गीकरण.

### क्रियाविशेषण वाक्यांत कोणतें कार्य करितें ?

क्रियाविशेषण हें क्रियापदानें दर्शविलेल्या क्रियेच्या अर्थांत भर घालतें ही गोष्ट आपण मागील धड्यांत पाहिलीच आहे. याखेरीज क्रियाविशेषण वाक्यांत दुसरें कांहीं कार्य करितें कीं काय तें पाहून या धड्यामध्यें आपल्याला क्रियाविशेषणाचें वर्गीकरण करावयाचें आहे.

(अ) **क्रियेच्या अर्थांत भर घालणें.** (हें आपण मागील धड्यांत पाहिलेंच आहे.)

(आ) कांहीं क्रियाविशेषणांचे योगानें क्रियेचें स्थळ, काळ, रीति, वगैरे बाबीं संबंधानें **प्रश्न विचारतां येतात**; जसें:—

(१) रामा **कोठें** जातो ? —स्थळ.

(२) रामा **केव्हां** येईल ? —काळ.

(३) खेकडे **कसे** धांवतात ? —रीति.

अशा क्रियाविशेषणास **प्रश्नार्थक क्रियाविशेषणें** असें म्हणतात.

(इ) कित्येक क्रियाविशेषणें संबंधीसर्वनामापासून झालेलीं असून तीं एक वाक्य दुसऱ्या वाक्याशीं **जोडण्याचें कार्य करितात.** अशा क्रियाविशेषणांना **संबंधी क्रियाविशेषणें** म्हणतात. उदाहरणें:—

[ १ ] तूं जेथें जाशील तेथें मी येईन.—स्थळ.

[ २ ] तुला जेव्हां फुरसत होईल तेव्हां तूं मला भेट.—काळ.

[ ३ ] तुला जसें बोलतां येईल तसें बोल; घाबरूं नको.—रीति.

वरील उदाहरणांमध्यें जेथें, जेव्हां व जसें या संबंधी क्रियाविशेषणांनीं कोणतीं वाक्यें जोडलीं आहेत तें सांगा.

क्रियाविशेषण जेव्हां केवळ क्रियेच्या किंवा विशेषण व क्रियाविशेषण यांच्या अर्थांत भर टाकण्याचें कार्य करतें, प्रश्न विचारण्याचें कार्य किंवा वाक्यें जोडण्याचें कार्य करीत नाहीं, तेव्हां त्याला **शुद्ध क्रियाविशेषण** असें म्हणतात.

**क्रियाविशेषणाचे याप्रमाणें ( १ ) शुद्ध ( २ ) प्रश्नार्थक व ( ३ ) संबंधी असे तीन प्रकार त्यांचेकडून वाक्यांत होणाऱ्या कार्यावरून होतात.**

**क्रियाविशेषणांनीं दर्शविलेल्या अर्थावरून त्याचे खालीलप्रमाणें प्रकार होतात.**

( १ ) **स्थलवाचकः**—येथें, तेथें, जेथें, कोठें, इकडे, तिकडे, जिकडे, कोणीकडे, जवळ, पुढें, मागें, वर, खालीं, बाहेर, आंत, मध्यें, इत्यादि.

( २ ) **कालवाचकः**—आतां, तेव्हां, जेव्हां, केव्हां, आज, उद्यां, परवा, काल, यंदा, गुदस्ता, दरसाल, दररोज, पूर्वी, नंतर, इत्यादि.

( ३ ) **रीतिवाचकः**—हळू, सावकाश, स्पष्ट, मोठ्यानें, दबत, दबत, गात, गात, अडखळत, इत्यादि.

( ४ ) **संख्यावाचक किंवा परिमाणवाचकः**—एकदां, दोनदां, पहिल्यानें, दुसऱ्यानें, प्रथम, फार, अंमळ, इत्यादि.

( ५ ) **संशयार्थकः**—कदाचित्, क्वचित्, बहुतकरून, बहुधा, इत्यादि.

( ६ ) **निश्चयार्थकः**—खरोखर, खचित, निःसंशय, मुळींच, अगदीं, इत्यादि.

( ७ ) **निषेधार्थकः**—न, ना.

## क्रियाविशेषणाचें व्याकरण करणें.

क्रियाविशेषणाचें व्याकरण करतांना त्यांची जाति व उपजाति सांगून वाक्यांतल्या कोणत्या शब्दाशीं त्याचा संबंध आहे तें सांगितलें म्हणजे

झाले; क्रियाविशेषणें हे एकंदरीत अविकारी शब्द असल्यामुळें त्यांचे विकार सांगण्याचें कारणच उरत नाहीं. नमुन्याकरितां म्हणून खालीं कांहीं क्रियाविशेषणांचें व्याकरण करून दाखविलें आहे.

(१) त्यानें पटकन एक उडी मारली.

पटकनः—शुद्ध रीतिदर्शक क्रियाविशेषण अव्यय, 'मारली' या क्रियापदाचें.

(२) तूं फार वाईट मुलगा आहेस.

फारः—शुद्ध परिमाणवाचक क्रियाविशेषण अव्यय, 'वाईट' या विशेषणाचें,

(३) तूं जेथें जाशील तेथें मी येईन.

जेथेंः—संबंधी स्थलवाचक क्रियाविशेषण अव्यय, 'जाशील' या क्रियापदाचें. हें 'तूं जेथें जाशील' आणि 'तेथें मी येईन' हीं दोन वाक्यें जोडतें.

(४) तूं अंमळ उशिरां आलास.

अंमळः—शुद्ध परिमाणवाचक क्रियाविशेषण अव्यय, 'उशिरां' या क्रियाविशेषणाचें.

## अभ्यास.

मागील धड्यांतील पहिल्या प्रश्नांत असलेल्या क्रियाविशेषणांचें व्याकरण करा.

---

## धडा तिसरा.

## उभान्वयी अव्ययें.

'ज्या अविकारी शब्दानें दोन वाक्यें (अथवा केव्हां केव्हां दोन शब्द) जोडण्याचें कार्य होतें त्याला उभयान्वयी अव्यय असें म्हणतात,' ही गोष्ट आपण व्याकरणप्रवेशिकेच्या पहिल्या पुस्तकांत पाहिलीच आहे. उभयान्वयी अव्ययाच्या या व्याख्येमध्यें पुढील दोन लक्षणांचा समावेश झाला आहे.

(१) जो शब्द उभयान्वयी अव्यय असतो तो अविकारी असतो.

(२) त्याचे योगानें दोन वाक्यें (केव्हां केव्हां शब्द) जोडण्याचें कार्य होतें.

**केवळ उभयान्वयी अव्ययेंच वाक्यसंयोगाचें कार्य करतात काय?**

खालील वाक्यांमध्यें वाक्यसंयोगाचें कार्य **कोणत्या शब्दांनीं** केलें आहे तें सांगा.

| | |
|---|---|
| (१) जो पुण्य करील **त्याला** स्वर्ग प्राप्त होईल. | या ठिकाणीं 'जो पुण्य करील' हें वाक्य 'त्याला स्वर्ग प्राप्त होईल' या वाक्याशीं **'जो' या संबंधी सर्वनामानें** जोडलें गेलें आहे. |
| (२) तुम्ही **जितकें** प्रेम स्वतःवर करतां तितकें देशावर केलें पाहिजे. | या ठिकाणीं 'तुम्ही जितकें प्रेम स्वतःवर करतां' हें वाक्य 'तितकें देशावर केलें पाहिजे' या वाक्याशीं **'जितकें' या संबंधी विशेषणानें** जोडलें गेलें आहे. |
| (३) **जेथें** तूं जाशील तेथें मीही येईन. | या ठिकाणीं 'जेथें तूं जाशील' हें वाक्य 'तेथें मीही येईन' या वाक्याशीं **जेथें या संबंधी क्रियाविशेषणानें** जोडलें गेलें आहे. |
| (४) मी त्याला ही गोष्ट सांगि-तली, **परंतु** त्यानें माझें ऐकलें नाहीं. | या ठिकाणीं 'मी त्याला ही गोष्ट सांगि-तली' हें वाक्य 'त्यानें माझें ऐकलें नाहीं.' या वाक्याशीं **'परंतु या उभ-यान्वयी अव्ययानें** जोडलें गेलें आहे. |

यावरून असें दिसून येतें कीं (१) संबंधी सर्वनामें, (२) संबंधी विशेषणें, (३) संबंधी क्रियाविशेषणें व (४) उभयान्वयी अव्ययें हे शब्द वाक्यसंयोगाचें कार्य करूं शकतात; मग त्यांचेमध्यें काय फरक आहे.

(१) संबंधी सर्वनाम वाक्यसंयोगाचें कार्य करितें हें खरें; परंतु तें विकारी असून दोन वाक्यांपैकीं एका वाक्याचा भाग बनून राहिलेलें असतें. (वरील उदाहरणांत 'जो' हा 'करील' या क्रियापदाचा कर्ता आहे.)

(२) संबंधी विशेषणही वाक्यसंयोगाचें कार्य करतें; परंतु तेंही विकारी असून दोन वाक्यांपैकीं एकाचा भाग बनून रहातें. (वरील उदाहरणांमध्यें 'जितकें' हें संबंधी विशेषण 'प्रेम' या नामाला लागलें आहे.)

(३) संबंधी क्रियाविशेषण वाक्यसंयोगाचें कार्य करतें व तें (बहुतकरून) अविकारीही असतें; परंतु तेंही एका वाक्याचा भाग बनून राहिलेलें असतें, वरील वाक्यामध्यें 'जेथें' हें संबंधी क्रियाविशेषण 'जाशील' या क्रियापदाला लागलें आहे.

(४) उभयान्वयी अव्यय वाक्यसंयोगाचें कार्य करितें, तें अविकारी असतें; व दोन्ही वाक्यांपैकीं एकाहि वाक्याचा भाग न बनतां दोन्ही वाक्यांचे बाहेर राहून तें वाक्यसंयोगाचें कार्य करितें.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे संबंधी सर्वनामें, संबंधी विशेषणें व संबंधी क्रियाविशेषणें हीं एका वाक्यांत राहून तें वाक्य दुसऱ्या वाक्याशीं जोडतात; परंतु उभयान्वयी अव्यय हें दोन्ही वाक्यांचे बाहेर राहून वाक्यसंयोगाचें कार्य करितें. याकरितां उभयान्वयी अव्ययाची व्याख्या आपण खालीलप्रमाणें केली पाहिजे.

**जो अविकारी शब्द वाक्याचे बाहेर राहून वाक्यसंयोगाचें कार्य करितो त्याला उभयान्वयी अव्यय असें म्हणतात.**

## अभ्यास.

**पुढील वाक्यांत वाक्यसंयोगाचें कार्य कोणत्या शब्दांनीं केलें आहे तें सांगा, व त्यांपैकीं उभयान्वयी अव्ययें कोणतीं तें ओळखा.**

(१) वाघ दबत दबत आला आणि झाडाशीं बांधलेल्या शेळीस उचलून लांब लांब उड्या मारीत निघून गेला. (२) जेथें जेथें धूर असतो, तेथें तेथें अग्नि असतो. (३) तूं माझ्या घरीं ये अथवा मी तुझ्या घरीं येईन. (४) आकाशांत पुष्कळ मेघ दिसतात; परंतु पावसाचें मात्र नांव नाहीं. (५) जो दुर्जनाशीं

मैत्री करता त्याचा अंतीं नाश होतो. ( ६ ) मला ज्ञान प्राप्त व्हावें म्हणून मी पुस्तकें वाचतों. ( ७ ) जेव्हां इतर मुलें खेळतात, तेव्हां तो अभ्यास करतो. ( ८ ) आज पाऊस पडेल; कारण उकडतें फार. ( ९ ) लोक त्यांना मान देतात; कारण त्यांचें आचरण शुद्ध आहे. ( १० ) आपण मला बोलाविलें म्हणून मी आलों. ( ११ ) जर धान्य पिकलें नसतें तर लोकांचे किती हाल झाले असते ? ( १२ ) शीळ वाजली कीं तुम्ही या. ( १३ ) दशरथानें कैकेयास वचन दिलें कीं मी तुला दोन वर देईन. ( १४ ) रामभाऊंना द्रव्य पाहिजे, पण मेहनत करणें नको. ( १५ ) शिक्षक येवोत किंवा न येवोत, आपण शाळेंत गेलें पाहिजे.

---

### धडा चवथा.

## उभयान्वयी अव्ययाचें वर्गीकरण.

उभयान्वयी अव्ययांचे समानत्वसूचक व गौणत्वसूचक उभयान्वयी अव्ययें असे दोन प्रकार होतात.

( १ ) जीं उभयान्वयी अव्ययें दोन समान वाक्यें जोडण्याचें कार्य करितात त्यांना **समानत्वसूचक उभयान्वयी अव्ययें** असें म्हणतात; जसें:—तो दहा वाजतां शाळेंत गेला, आणि चार वाजतां आला.

( २ ) जीं उभयान्वयी अव्ययें गौणवाक्य प्रधान वाक्याशीं जोडण्याचें कार्य करितात त्यांना **गौणत्वसूचक उभयान्वयी अव्ययें** असें म्हणतात; जसें:-मी नागपूरला पोहोंचलों म्हणजे तुला पत्र पाठवीन.

### समानत्वसूचक उभयान्वयी अव्ययें.

समानत्वसूचक उभयान्वयी अव्ययाचे समुच्चयबोधक, विकल्पबोधक, विरोधबोधक व परिणामबोधक असे चार प्रकार आहेत. त्यांचीं खालीं उदाहरणें दिलीं आहेत.

### समुच्चयबोधक.

[ १ ] गाडी निघून गेली आणि मी परतलों.
[ २ ] मुलांनीं खरें बोलावें व वडिलांची आज्ञा पाळावी.
[ ३ ] तो आला आणखी निघून गेला.

### विकल्पबोधक.

[ १ ] त्याला पत्र लिही किंवा तार कर.
[ २ ] विटीदांडू खेळ अथवा फिरावयास जा.
[ ३ ] तो येवो वा न येवो.
[ ४ ] तूं कन्या बोलानें येथून उठतोस कीं नाहीं!

### विरोधबोधक.

[ १ ] तो हुशार आहे, पण जरासा आळशी आहे.
[ २ ] मीं त्याला पत्र लिहिलें, परंतु त्यानें उत्तर पाठविलें नाहीं.
[ ३ ] मी तेथें जाईल, बाकी माझा फारसा उपयोग नाहीं.

### परिणामबोधक.

[ १ ] पाऊस, पडला, म्हणून शेत पिकलें.
[ २ ] तूं खोटें बोललास, सबब तुला ही शिक्षा झाली.

## गौणत्वसुचक उभयान्वयी अव्ययें.

यांचे कारणदर्शक, हेतुदर्शक, संकेतदर्शक, विरोधदर्शक व स्वरूप दर्शक, असे पांच भेद आहेत; त्यांचीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत.

### कारणदर्शक.

[ १ ] आम्ही आज येऊं शकलों नाहीं कारण आम्हांला महत्वाचें काम होतें.
[ २ ] तो भांडणार नाहीं कां कीं तो समजूतदार मुलगा आहे.

### हेतुदर्शक.

[ १ ] राष्ट्रसंस्थापनेच्या कार्यांत यश यावें म्हणून शिवरायानें अत्यंत कष्ट भोगले.
[ २ ] आपलें वृद्धपण सुखांत जावें म्हणून पुष्कळ लोक तरुणपणीं पैसा मिळवून ठेवतात.

### संकेतदर्शक.

[ १ ] जर तुमचें देशावर प्रेम असेल तर आपसांतील तंटे मिटवा.

[ २ ] शीळ वाजली कीं चट चट बाहेर या.

### विरोधदर्शक.

[ १ ] जरी कांहीं लोक व्याकरणशास्त्राचा अभ्यास करीत नाहींत तरी ते शुद्ध बोलतात.

### स्वरूपदर्शक.

[ १ ] मी पैसे देईन म्हणून तो म्हणाला.

[ २ ] तो विचारतो कीं चंद्राला पृथ्वीभोंवती प्रदक्षिणा करण्यास किती दिवस लागतात.

टीपः—गौणत्वसूचक उभयान्वयी अव्ययांपैकीं स्वरूपदर्शक उभयान्वयी अव्ययें प्रधान वाक्याशीं नामवाक्य जोडतात आणि बाकीचीं, क्रियाविशेषणवाक्यें प्रधान वाक्याशीं जोडतात.

---

## धडा पांचवा

## शब्दयोगी अव्ययें आणि केवलप्रयोगी अव्ययें

'आळसामुळें दारिद्र्य वाढतें.' 'मी रामासाठीं एक घड्याळ आणीन' 'मासे पाण्यामध्यें राहतात.' 'नागपूरापासून मुंबई किती लांब आहे ?' ह्या सर्व वाक्यांमध्यें **मुळें, साठीं, मध्यें,** व **पासून** हे शब्द विभक्तिप्रत्ययाप्रमाणें त्या त्या नामांना लागले आहेत. अशा शब्दांना शब्दयोगी अव्ययें असें म्हणतात, ही गोष्ट आपण व्याकरण-प्रवेशिकेच्या प्रथम पुस्तकांत पाहिलीच आहे.

### शब्दयोगी अव्ययें आणि विभक्तिप्रत्यय.

[ १ ] शब्दयोगी अव्ययें विभक्तिप्रत्ययाप्रमाणें नामांना लागून नामांचा वाक्यांतील इतर शब्दांशीं संबंध दाखविण्याचें विभक्तिप्रत्ययांचेंच कार्य करितात. वरील उदाहरणांतील पहिल्या वाक्यांत **मुळें** या शब्दयोगी अव्ययानें **आळस** या

नामाचा **वाढतें** या क्रियापदाशीं संबंध जोडला आहे; दुसऱ्या वाक्यांत **साठीं** या शब्दयोगी अव्ययानें **रामा** या नामाचा **आणीन** या क्रियापदाशीं संबंध जोडला आहे.

(१) विभक्तिप्रत्यय नामांना किंवा सर्वनामाना लागतांना जसें त्याचें सामान्य रूप होतें, त्याचप्रमाणें शब्दयोगी अव्ययें लागतांना सुध्दां सामान्यरूप होतें.

(२) विभक्तप्रत्यय व शब्दयोगी अव्ययें यांचे कार्यामध्यें इतकें साम्य आहे कीं त्यांचेमध्यें फरक तरी काय आहे, व विभक्तिप्रत्ययाना सुद्धां शब्दयोगी अव्ययें म्हणण्यास काय हरकत आहे, असा प्रश्न सहाजिक उत्पन्न होतो; परंतु त्याचे-मध्यें खालीं दाखविलेले फरक असल्यामुळें विभक्तिप्रत्ययाना शब्दयोगी अव्ययांचे सदरांत टाकणें योग्य दिसत नाहीं.

(१) विभक्तिप्रत्यय हे बहुधा एकाक्षरी असतात. व वाक्यांत त्यांचा स्वतंत्र रीतीनें केंव्हाही उपयोग होत नाहीं. परंतु शब्दयोगी अव्ययें एकाहून जास्त अक्ष-रांचीं बनलेलीं असून बऱ्याच शब्दयोगी अव्ययांचा वाक्यांत क्रियाविशेषणाप्र-माणें उपयोग होऊं शकतो हे खालील उदाहरणांवरून दिसून येईल.

| **शब्दयोगी अव्ययें.** | **क्रियाविशेषणें** |
|---|---|
| घरा**वर** कौलें आहेत. | तो **वर** आहे. |
| मासे पाण्या**मध्यें** राहतात. | **मध्यें** बोलूं नकोस. |
| टेबला**खालीं** पुस्तकें आहेत. | **खालीं** बस. |

(२) विभक्तिप्रत्यय हे कोणत्याही इतर शब्दापासून बनलेले नसतात; परंतु शब्दयोगी अव्ययें इतर शब्दांवरून साधलेलीं असतात. जसें—मुळें हे शब्द-योगी अव्यय 'मूळ' या नामावरून व मध्यें हें 'मध्य' या नामावरून साधलेलें आहे.

## सर्वच शब्दयोगी अव्ययें अविकारी असतात काय?

शब्दयोगी अव्ययें हीं नामाचा वाक्यातील इतर शब्दांशीं संबंध दाखवितात; शब्दयोगी अव्ययानें जेव्हां नामाचा क्रियापदाशीं संबंध जोडला जातो तेव्हा तें नाम व शब्दयोगी अव्यय मिळून क्रियाविशेषणाचें कार्य करितात. आता नामाचा वाक्यांतील दुसऱ्या एखाद्या नामाशींच शब्दयोगी अव्ययाचे योगानें संबंध जोडला गेला तर तें नाम आणि शब्दयोगी अव्यय मिळून दुसऱ्या नामाची व्याप्ति कमी करून विशेषणाचें कार्य करितात. अशा वेळीं शब्दयोगी अव्यय जर आकारान्त

असेल तर पुढील नामाचे लिंगवचनानुसार शब्दयोगी अव्ययाला विकार होतात. जसें:- रामासारखा मुलगा, रामासारखे मुलगे **घरावरचा** पोपट, **घरावरचे** कौल. इतर उदाहरणें —जोगा जोगता, पुरता, इत्यादि.

**टीप:**—ज्या शब्दयोगी अव्ययांचा क्रियाविशेषणांप्रमाणें स्वतंत्र उपयोग वाक्यांत होत असेल, किंवा जीं मूळचीं क्रियाविशेषणेंच असून नतर ज्यांचा शब्दयोगी अव्ययाप्रमाणेंच उपयोग होऊं लागला, त्यांना लिंगवचनादिकांचे विकार होत नाहींत; परतु ज्याचा विशेषणाप्रमाणें स्वतंत्र उपयोग वाक्यांत होत असेल, किंवा जीं मूळचीं विशेषणें असून नंतर ज्याचा शब्दयोगी अव्ययाप्रमणें उपयोग होऊं लागला अशा आकारान्त शब्दयोगी अव्ययांना लिंगवचनादिकांचे विकार होतात. असे शब्द विशेषण व शब्दयोगी अव्यय या दोहोंचें कार्य एकाच वाक्यांत एकदम करितात.

## शुद्ध शब्दयोगी अव्ययें.

**च, ही, ना, मात्र देखील, सुद्धां** हे शब्द मराठी भाषेमध्यें असे आहेत कीं त्यांना शब्दांच्या अठ जातींपैकीं कोणत्या जातींत घालावें याबद्दल व्याकरणकाराचें एकमत नाहीं कित्येकांचे मतें त्यांना क्रियाविशेषणें मानावें असें असून कित्येकजण त्यांना उभयान्वयी अव्ययें म्हणावें असें सांगतात. शब्दयोगी अव्ययाप्रमाणें हे शब्द नामांना तर लागतातच, परंतु इतर शब्दांनाही ते लागतात, आणि ज्या नामाला किंवा इतर शब्दाला ते लागतात त्याचे रूपांत कोणताही बदल होत नाहीं. आद्य व्याकरणकार दादोबा आणि 'शास्त्रीय व्याकरण' या पुस्तकाचे कर्ते के. दामले यांनीं **शुद्ध शब्दयोगी अव्ययें** हें नाव वरील शब्दांना दिलें आहे; आपणही त्यांना हेंच नाव देऊं

### अभ्यास.

(१) पुढील वाक्यांतील शब्दयोगी अव्ययें ओळखून तीं ज्या नामांना लागलीं असतील त्या नामांचा दुसऱ्या कोणत्या शब्दांशीं

**संबंध जोडला गेला तें सांगा व माहित असल्यास संबंधाचें नांवही सांगा.**

(१) पानिपतच्या रणभूमीवर अहमदशा अब्दालीचा पराभव करण्याकरितां सर्व मराठे सरदारांनीं मनापासून प्रयत्न केला; परंतु तो सिद्धिस गेला नाहीं. (२) सूर्याभोंवतीं जे ग्रह फिरतात त्या सर्वांमध्यें मंगळ हाच पृथ्वीच्या फार जवळ आहे. (३) गुरुत्वाकर्षणामुळें सर्व तारे आपापल्या कक्षांत नियमितपणें फिरतात. (४) परिश्रमावांचून विद्या नाहीं, विद्येशिवाय धन नाहीं; धनाखेरिज सुख नाहीं आणि सुखाविण आयुष्यामध्यें राम नाहीं; म्हणून मुलांनों, निरंतर परिश्रम करा. (५) सातापैकीं पाच मुलांकरितां मजजवळ तिकिटांसाठीं पैसे आहेत.

(२) (अ) **पुढील शब्दांचा शब्दयोगी अव्ययाप्रमाणें व क्रियाविशेषण अव्ययाप्रमाणें उपयोग करून दाखवाः**—पुढें, मागें, पलीकडे, पूर्वी, आड, जवळ, समोर, मागून, पुढून, पलीकडून.

(आ) **पुढील शब्दांचा शब्दयोगी अव्ययाप्रमाणे व क्रियाविशेषणाप्रमाणें उपयोग करून दाखवा.**—विरुद्ध, सारखा, निराळा, योग्य, पुढील, खालील, मागील, जवळील.

**(३) पुढील जोड्यांतील पहिल्या शब्दाचा नामाप्रमाणें आणि दुसऱ्या शब्दाचा शब्दयोगी अव्ययाप्रमाणें उपयोग करून दाखवा.** संबंध, संबंधीं,; विषय, विषयीं,; योग, योगें,; मध्य, मध्यें.

## केवलप्रयोगी अव्ययें.

जीं अव्ययें मनांत उत्पन्न होणारे आनंद, खेद, आश्चर्य वगैरे विकार दर्शवितात त्यांस केवलप्रयोगी अव्ययें असें म्हणतात, ही गोष्ट आपण व्याकरणप्रवेशिकेच्या प्रथम पुस्तकांत पाहिलीच आहे. या अव्ययांचा वाक्यांतील कोणत्याहि शब्दाशीं संबंध नसतो, म्हणजे तीं वाक्याच्या बाहेर राहतात व माहिती सांगतांना, प्रश्न विचारतांना, आज्ञा करतांना किंवा इच्छा प्रगट करतांना बोलणाराचे किंवा लेखकाचे मनांत उत्पन्न होणारे आनंद, दुःख वगैरे मनोविकार त्याचे योगानें दर्शविले जातात.

**हर्षद्योतकः**—अहाहा ! ओहो ! वाहवा ! वा ! आहा !

**शोकद्योतकः**—अरेरे ! हरहर ! शिवशिव ! हाय !

**भीतिद्योतकः**—अरे बापरे !

**तिरस्कारद्योतकः**—छी ! थू !

**संबोधनद्योतकः**—अरे ! अहो ! रे ! अग ! ए !

**टीपः**—केवलप्रयोगी अव्ययाचा ज्याप्रमाणें वाक्यांतील कोणत्याही शब्दाशीं संबंध नसतो त्याप्रमाणें संबोधन विभक्तींतील नामाचाही वाक्यांतील कोणत्याही शब्दाशीं संबंध नसतो.

## अभ्यास.

**वरील केवलप्रयोगी अव्ययांचा वाक्यांत उपयोग करा.**

---

# खंड आठवें.

## वाक्य-विचार.

### धडा तेरावा.

### वाक्य आणि त्याचे भाग.

माहिती सांगणें, माहिती विचारणें, आज्ञा करणें किंवा इच्छा प्रदर्शित करणें यांपैकीं एखादी गोष्ट जेव्हां शब्दांनीं केली जाते तेव्हां त्या शब्दास किंवा शब्दसमुच्चयास वाक्य असें म्हणतात ही गोष्ट आपण पूर्वी पाहिलीच आहे.

माहिती सांगण्याचें, विचारण्याचें, आज्ञा करण्याचें किंवा इच्छा प्रदर्शित करण्याचें काम क्रियापदामुळेंच होत असतें; जर क्रियापद वाक्यांत नसेल तर इतर शब्दांकडून हें काम कधींही व्हावयाचें नाहीं. म्हणून क्रियापद हा वाक्यांतील मुख्य शब्द होय. वाक्याचें वाक्यत्व हें क्रियापदावरच सर्वस्वीं अवलंबून आहे.

आतां क्रियापदाखेरीज जे अनेक शब्द वाक्यामध्यें येतात ते कोणत्या नात्यानें येतात तें आपणास या धड्यांत पहावयाचें आहे.

| | |
|---|---|
| (अ) [ १ ] उजाडलें. | हें क्रियापद अकर्तृक असल्यामुळें वाक्य पूर्ण होण्याकरितां कर्ता, कर्म यांची जरुरीच नाहीं. केवळ क्रियापदानें हें वाक्य पूर्ण झालें आहे. |
| [ २ ] **चांगलें** उजाडलें. | या ठिकाणीं **चांगलें** हा शब्द केवळ रीतिवाचक क्रियाविशेषण असून तो उजाडलें या क्रियापदावर अवलंबून आहे. |

[ ३ ] **सहा वाजतां** चांगलें उजाडलें.

या ठिकाणीं '**सहा वाजतां**' या शब्दसमुच्चयानें कालदर्शक क्रियाविशेषणाचें कार्य केलें असून तो ( शब्दसमुच्चय ) 'उजाडलें' या क्रियापदावरच अवलंबून आहे.

[ ४ ] **नागपूर स्टेशनवर** सहा वाजतां चांगलें उजाडलें.

या ठिकाणी '**नागपूर स्टेशनवर**' या शब्दसमुच्चयानें स्थलवाचक क्रियाविशेषणाचें कार्य केलें असून तो [ शब्दसमुच्चय ] 'उजाडलें' या क्रियापदावरच अवलंबून आहे.

**याप्रमाणें आपण इतर अकर्तृक क्रियापदें असलेल्या वाक्यांचें निरीक्षण केलें असतां आपल्याला असें आढळून येईल कीं क्रियापदाशिवाय जे इतर शब्द वाक्यांत आलेले असतील ते एक तर क्रियापदाचीं क्रियाविशेषणें असतील किंवा क्रियाविशेषणाप्रमाणें क्रियेचें स्थल, काल इत्यादि दाखवून क्रियापदावर अवलंबून राहिलेले असतील.**

[आ] [१] **मुलगा** धांवतो.

या ठिकाणीं 'धांवतो' हें क्रियापद अकर्मक असून त्याचा अर्थ पुरा होण्याकरितां ( **मुलगा** या ) कर्त्याची जरूरी आहे. म्हणून वाक्य पूर्ण होण्याकरितां कर्ता व क्रियापद या दोन शब्दांची जरूरी आहे.

आतां या वाक्यांत आणखी इतर शब्द आल्यास ते एक तर **मुलगा** या कर्त्यावर अवलंबून असलेले, किंवा **धांवतो** या क्रियापदावर अवलंबून असलेले या नात्यानेंच येतील.

[ २ ] मुलगा **दररोज** धांवतो.

या ठिकाणीं **दररोज** हा शब्द क्रियाविशेषण असून तो 'धावतो' या क्रियापदावर अवलंबून वाक्यात आलेला आहे.

( ३ ) मुलगा दररोज **सकाळीं सहा वाजतां** धांवतो.

या ठिकाणीं **सकाळीं सहा वाजतां** हा शब्दसमुच्चय कालदर्शक क्रियाविशेषणाप्रमाणें 'धावतो' या क्रियापदावर अवलंबून वाक्यांत आलेला आहे.

( ४ ) मुलगा दररोज सकाळीं सहा वाजतां **जोरानें** धावतो.

या ठिकाणीं **जोरानें** हें तृतीयान्त नाम रीतिदर्शक क्रियाविशेषणाप्रमाणें 'धांवतो' या क्रियापदावर अवलंबून वाक्यांत आलें आहे.

( ५ ) **एक** मुलगा दररोज सकाळीं सहा वाजतां जोरानें धावतो

या ठिकाणीं **एक** हा शब्द मुलगा या कर्त्याचें विशेषण असून तो 'मुलगा' या कर्त्यावर अवलंबून वाक्यांत आला आहे.

( ६ ) एक **सशक्त** मुलगा दररोज सकाळीं सहा वाजतां जोरानें धांवतो.

या ठिकाणीं **सशक्त** हें विशेषण 'मुलगा' या कर्त्यावर अवलंबून वाक्यांत आलें आहे.

( ७ ) **रामा नांवाचा** एक सशक्त मुलगा दररोज सकाळीं सहा वाजतां जोरानें धांवतो.

या ठिकाणीं '**रामा नांवाचा**' हा शब्दसमुच्चय विशेषणाप्रमाणें 'मुलगा' या कर्त्यावर अवलंबून वाक्यांत आला आहे.

( ८ ) **आमच्या शेजारीं राहणारा** रामा नांवाचा एक सशक्त मुलगा दररोज सकाळीं सहा वाजतां जोरने धांवतो.

या ठिकाणीं **आमच्या शेजारीं राहणारा** हा शब्दसमुच्चय विशेषणाप्रमाणे 'मुलगा' या कर्त्यावर अवलंबून वाक्यांत आला आहे.

**हें शेवटचें वाक्य चवदा शब्दांचें मिळून झालेलें आहे;** त्यांपैकीं '**मुलगा' हा कर्ता व 'धांवतो' हें क्रियापद हे** दोन मुख्य **शब्द असून** बाकीचे **सर्व शब्द** कर्ता किंवा क्रियापद यांवर **अवलंबून असलेले** म्हणजे त्यांच आश्रित **म्हणूनच केवळ आलेले आहेत;** त्यांपैकीं **कर्त्यावर**

अवलंबून असलेले कोणते व क्रियापदावर अवलंबून असलेले कोणते हें पुन्हा एकदा खालीं दाखविलें आहे.

( १ ) **कर्ता**:—मुलगा.
( २ ) **क्रियापद**:—धांवतो.
( ३ ) **कर्त्यावर अवलंबून असलेले शब्द**:—
[ १ ] आमच्या शेजारी राहणारा.
[ २ ] रामा नांवाचा.
[ ३ ] एक.
[ ४ ] सशक्त.
( ४ ) **क्रियापदावर अवलंबून असलेले शब्द**:—
[ १ ] दररोज.
[ २ ] सकाळीं सहा वाजतां.
[ ३ ] जोरानें.
( ५ ) मुलगा **पुस्तक** वाचतो. या वाक्यांतील 'वाचतो' हें क्रियापद सकर्मक असल्यामुळें त्याला कर्त्याखेरीज आणखी **पुस्तक** या कर्माचीही अर्थ पुरा होण्याकरितां जरूरी आहे.

अशा वाक्यांत कर्ता, कर्म व क्रियापद हे तीन मुख्य शब्द असतात. यांखेरीज इतर शब्द वाक्यांत असल्यास ते एक तर कर्त्यावर, किंवा कर्मावर, किंवा क्रियापदावर अवलंबून असलेले त्यांचे आश्रित या नात्यानेंच येतात. कर्ता व क्रियापद ह्यांवर अवलंबून असलेले शब्द वाक्यांत कसे येतात हें 'मुलगा धांवतो' या वाक्याचा विचार करीत असतांना आपण पाहिलेंच आहे. या वाक्यांत फक्त कर्मावरच अवलंबून असलेले शब्द आपण आणूं.

( १ ) मुलगा पुस्तक वाचतो.
( २ ) मुलगा **एक** पुस्तक वाचतो.
( ३ ) मुलगा **उषःकाल नांवाचें** एक पुस्तक वाचतो.

( ४ ) मुलगा उषःकाल नांवाचें, दोन रुपये किंमतीचें एक पुस्तक वाचतो.
( ५ ) मुलगा हरी नारायण आपटे यांनीं लिहिलेलें, उषःकाल नांवाचें दोन रुपये किंमतीचें एक पुस्तक वाचतो.

वरील वाक्यामध्यें कर्मावर अवलंबून असलेला एक एक नवीन शब्दसमुच्चय आला आहे.

शेवटच्या वाक्यामध्यें जरी एकंदर चवदा शब्द असले तरी त्यांतले कर्ता, कर्म व क्रियापद हे तीन मुख्य असून बाकी सर्व कर्मावर अवलंबून आहेत त्यांची विल्हेवारी खालीलप्रमाणें:—

( १ ) कर्ता:—मुलगा.
( २ ) क्रियापद:—वाचतो.
( ३ ) कर्म:—पुस्तक.
( ४ ) कर्त्यावर अवलंबून असलेले शब्द:—नाहींत.
( ५ ) क्रियापदावर अवलंबून असलेले शब्द:—नाहींत.
( ६ ) कर्मावर अवलंबून असलेले शब्द:—
( १ ) हरी नारायण आपटे यांनीं लिलिलेलें,
( २ ) दोन रुपये किंमतीचें,
( ३ ) उषःकाल नांवाचें.
( ४ ) एक

टीप:—याच वाक्यांत कर्ता व क्रियापद यांवर अवलंबून असलेले शब्द आणून शब्दसंख्या आणखी बरीच वाढवितां येईल.

( ६ ) रावण राजा होता. या वाक्यांत 'होता' हें क्रियापद अपूर्ण विधान अकर्मक असल्यामुळें त्याचा अर्थ पूर्ण होण्याकरितां 'रावण' या कर्त्याखेरीज राजा या विधेयपूरकाची जरूर आहे.

अशा वाक्यांत कर्ता, क्रियापद व विधेयपूरक हे शब्द मुख्य असतात. याखेरीज इतर शब्द अशा वाक्यांत आल्यास कर्ता, क्रियापद व विधेयपूरक यांपैकीं कशावर ना कशावर तरी अवलंबून असलेले या नात्यानेंच ते येतील. वरील वाक्यामध्यें 'पराक्रमी' 'लंकानगरीचा' वगैरे शब्द राजा या विधेयपूरकावर अवलंबून असलेले या नात्यानें सहज घालतां येतील.

( ड ) रामानें बिभीषणाला राजा केलें.

या वाक्यांत केलें हें क्रियापद अपूर्ण विधान सकर्मक असल्यामुळें कर्ता कर्म व विधेयपूरक यांचा अर्थ पूर्ण होण्यासाठीं जरूरी आहे.

अशा वाक्यांत कर्ता, कर्म पूरक व क्रियापद हे चार शब्द मुख्य असतात; याखेरीज आणखी शब्द वाक्यांत आणावयाचे असल्यास ते कर्ता, कर्म, विधेयपूरक किंवा क्रियापद यांपैकीं कशावर तरी अवलंबून असलेले या नात्यानेंच आणावे लागतील.

**या धड्यांत आपण काय शिकलों ?**

[ १ ] वाक्यार्थ पुरा करण्याचें काम क्रियापदाशिवाय होतच नसल्यामुळे क्रियापद हें वाक्यांतील अति हत्वाचा भाग आहे. प्रत्येक वाक्यांत क्रियापद हें असलेंच पाहिजे; क्रियापद नाहीं तर वाक्य नाहीं.

[ २ ] क्रियापदांना त्यांचा त्यांचा अर्थ पूर्ण होण्याकरितां कर्ता कर्म व पूरक यांची जरूरी असते, म्हणून हे शब्दही वाक्यांतील महत्वाचे भाग होत.

[ ३ ] कर्ता, कर्म, पूरक व क्रियापद यांखेरीज इतर शब्द वाक्यांत आल्यास ते यांपैकीं कशावर ना कशावर तरी अवलंबून असलेले या नात्यानेंच येतात.

## अभ्यास.

( १ ) पुढील वाक्यांत कर्त्यावर अवलंबून असलेल्या शब्दांची भर घाला.

सूर्यबिंब क्षितीजावर येऊं लागलें. [ २ ] सिंह अंद्रोक्लिसाचे अंगावर चाल करून आला [ ३ ] श्रीकृष्णानें कंसाचा वध केला. [ ४ ] तळें रमणीय होतें.

( २ ) कर्मावर अवलंबून असलेल्या शब्दांची पुढील वाक्यांत भर घाला.

[ १ ] आम्हीं गलबतें पाहिलीं. [ २ ] त्यानें घोडा विकला. [ ३ ] तूं बंगला पाहिलास काय ? [ ४ ] रामानें घोडा विकत घेतलें. [ ५ ] त्यानें गाणें म्हटलें. [ ६ ] गोविंदरावांनीं गोष्ट सांगितली. [ ७ ] मी शाई विकत घेतली. [ ८ ] तूं चहा घेतोस काय ?

**( ३ ) पुढील वाक्यांत क्रियापदावर अवलंबून असलेल्या शब्दांची भर घाला.**

चोरानें दागिन्यांची पेटी चोरली. [ २ ] घराला आग लागली ( ३ ) आमची परिक्षा सुरू होईल. ( ४ ) आम्ही क्रिकेट खेळलों. ( ५ ) शिपायानें चोराला पकडलें.

**( ४ ) पुढील वाक्यांत पूरकावर अवलंबून असलेल्या शब्दांची भर घाला.**

[ १ ] आंबा गोड निघाला. [ २ ] राम मुलगा आहे. [ ३ ] रामानें बिभीषणाला राजा केलें. [ ४ ] मी लेकरूं आहें

**( ५ ) कर्त्यावर अवलंबून असलेले शब्द किंवा शब्दसमूह कोणत्या जातीचे असतात ? क्रियापदावर अवलंबून असलेले शब्द कोणत्या जातीचें असतात ?**

**( ६ ) पुढील वाक्यांतील कर्ता, कर्म, पूरक व क्रियापद हीं ओळखून त्यांचेवर अवलंबून असलेले शब्द सांगा.**

( १ ) हिंदु जनतेस खुश ठेवून मुसलमानी राज्याचा पाया मजबूत करण्याचें धोरण अकबरानें स्वीकारिलें होतें. ( २ ) गोविंदाग्रजानें लिहिलेल्या सर्वच कविता हृदयंगम आहेत. ( ३ ) मोटारगाडींतून जाणारे श्रीमंत लोक रस्त्यानें पायीं येणाऱ्या जाणाऱ्या लोकांची पावसाळ्यांत मुळींच पर्वा करीत नाहींत. ( ४ ) प्राचीन काळच्या आर्यांचें वैभव पाश्चात्य लोकांस थक्क करून करून टाकणारें होतें. गुलामांना निर्दयतेनें वागविण्याची व बैल, गाडी, घोडा यांप्रमाणें त्यांना विकून टाकण्याची निंद्य चाल आजहि कित्येक राष्ट्रांत दिसून येते. ( ६ ) आपल्या कर्तबगारीनें व हुषारीनें उदयास आलेल्या पुरुषांमध्ये हैदरअल्लीची गणना होते.

---

## धडा दुसरा.

## शुद्ध वाक्य आणि मिश्र वाक्य.

कर्ता, कर्म, पूरक व त्यांचीं विशेषणें आणि क्रियापद व त्यांचीं क्रियाविशेषणें हीं वाक्याचीं निरनिराळीं अंगें आहेत ही गोष्ट आपण मागील धड्यांत पाहिलीच आहे.

( क ) खालील वाक्यांचें निरीक्षण करून क्रियापदांच्या कर्त्यांच्या ठिकाणीं कोणते शब्द आहेत तें सांगा.

| वाक्य. | कर्त्यांच्या ठिकाणीं असलेले शब्द. |
|---|---|
| ( १ ) राम | नाम. |
| ( २ ) तो पास झाला. | सर्वनाम. |
| ( ३ ) श्रीमंतांनीं उदार असावें. | विशेषण. ( नामाप्रमाणें उपयोग. ) |
| ( ४ ) पोहणें शरीर प्रकृतीस हितावह आहे. | नामकृदन्त. ( धातुसाधित नाम. ) |
| ( ५ ) तो घरीं आला हें फार चांगलें, झालें. | या वाक्यांतील 'झालें' या क्रियापदाचा कर्ता 'हें' हें दर्शकसर्वनाम आहे; परंतु तें सर्वनाम 'तो घरी आला' या वाक्या-बद्दल आलें असल्याकारणानें हें **वाक्यच** 'झालें' या क्रियापदाचा वास्तविक कर्ता आहे. |

### निरीक्षण.

[ १ ] वरील वाक्यांपैकीं पहिल्या चार वाक्यांत एक एकच क्रियापद आहे. अशा वाक्यास शुद्ध वाक्यें असें म्हणतात.

[ २ ] पांचव्या वाक्यांत. [ अ ] आला व झालें अशीं दोन क्रियापदें आहेत. [ आ ] 'तो घरीं आला' हें लहानसें वाक्यच झालें या क्रियापदाचा कर्ता आहे; अशा वाक्याला **गौणवाक्य** असें म्हणतात. [ इ ] हें फार चांगलें झालें' या राहिलेल्या वाक्याला **प्रधान वाक्य** असें म्हणतात. [ उ ] 'तो पास झाला हें फार चांगले झालें' या सबंध वाक्याला **मिश्रवाक्य** असें नांव आहे.

( ख ) खालील वाक्यांचें निरीक्षण करून क्रियापदाच्या कर्माच्या ठिकाणीं कोणते शब्द आले आहेत तें सांगा.

| | |
|---|---|
| [ १ ] मीं रामाला पाहिलें. | नाम. |
| [ २ ] मीं त्याला पाहिलें. | सर्वनाम. |
| [ ३ ] मीं श्रीमंतांना देवळांत पाहिलें | विशेषण, ( नामाप्रमाणें उपयोग. ) |
| [ ४ ] तूं कोंबड्याचें आरवणें ऐकलेंस काय ? | नामकृदन्त. |
| [ ५ ] रामा पास झाला असें तूं कोठें ऐकलेंस ? | या ठिकाणीं ' रामा पास झाला,' हें वाक्यच 'ऐकलेंस' या क्रियापदाचें, वास्तविक कर्म आहे. |

**निरीक्षण.**

[ १ ] पहिल्या चार वाक्यांत एक एक क्रियापद आहे, व तीं सर्व शुद्ध वाक्यें आहेत.

[ २ ] पांचव्या वाक्यांत. [ अ ] झाला व ऐकलेंस अशीं दोन क्रियापदें आहेत. [ आ ] ' रामा पास झाला ' हें लहानसें वाक्य ऐकलेंस या क्रियापदाचें कर्म असून तें **गौणवाक्य** आहे; [ इ ] ' असें तूं कोठें ऐकलेंस ' हें राहिलेलें वाक्य **प्रधानवाक्य** आहे. [ उ ] ' रामा पास झाला असें तूं कोठें ऐकलेंस ' हें संबंध वाक्य **मिश्रवाक्य** आहे.

( ग ) खालील वाक्यांत कर्त्यावर अवलंबून असलेले या नात्यानें कोणते शब्द आलेले आहेत तें सांगा.

| | |
|---|---|
| [ १ ] **चांगला** मुलगा पुस्तक वाचतो. | विशेषण. |
| [ २ ] **रामाचें** पुस्तक कोठें आहे ? | षष्ठ्यन्त नाम. |
| [ ३ ] **लिहावयाचें** टेबल कोणतें आहे ? | कृदन्त. |
| [ ४ ] **माझा** भाऊ **गोविंदा** पास झाला. | षष्ठ्यन्त सर्वनाम. उद्देशार्थी नाम ( गोविंदा. ) |
| **जो मनुष्य देवाला भीत नाहीं** तो सुखी असूं शकत नाहीं. | या वाक्यांत ' असूं शकत नाहीं ' क्रियापदाचा कर्ता तो हें सर्वनाम आहे. ' जो |

'मनुष्य देवाला भीत नाहीं' एवढें वाक्य कर्त्यावर अवलंबून आलें आहे.

[ २ ] पहिल्या चार वाक्यांत एक एक क्रियापद असून तीं सर्व शुद्ध वाक्यें आहेत.

[ ३ ] पांचव्या वाक्यांत (अ) दोन क्रियापदें आहेत, (आ) 'जो मनुष्य देवाला भीत नाहीं' एवढें वाक्य 'तो' या कर्मावर अवलंबून आलें आहे; हेंही गौणवाक्यच आहे. (ई) 'तो सुखी असूं शकत नाहीं.' हें राहिलेलें वाक्य प्रधानवाक्य आहे, (ऊ) 'जो मनुष्य देवाला भीत नाहीं तो सुखी असूं शकत नाहीं' हें सबंध वाक्य मिश्रवाक्य आहे,

(घ) खालील वाक्यांमध्यें क्रियापदावर अवलंबून कोणते शब्द आले आहेत तें सांगा.

(१) मी लवकर येईन. क्रियाविशेषण अव्यय.
(२) मी सोमवारीं येईन. विभक्त्यन्त नाम.
(३) तो चालतां चालतां पडला. क्रियाविशेषण कृदन्त.
(४) तूं माझ्या घरीं आलास, या ठिकाणीं 'तूं माझ्या घरीं आलास' म्हणजे मी तुझ्या घरीं येईन. हें वाक्य येईन या क्रियापदानें दर्शविलेल्या क्रियेची वेळ दाखवितें म्हणून हें वाक्यच क्रियाविशेषणाचे ठिकाणी आलें आहे असें म्हटलें पाहिजे.

## निरीक्षण.

(१) पहिल्या तीन वाक्यांत एक एक क्रियापद असून तीं शुद्ध वाक्यें आहेत.

(२) चवथ्या वाक्यांत [ अ ] दोन क्रियापदें आहेत. [ आ ] तूं माझ्या घरीं आलास हें वाक्य 'येईल' या क्रियापदावर अवलंबून आहे व हें गौण-वाक्य आहे. [ इ ] 'तुझ्या घरीं येईन' हें बाकीचें वाक्य प्रधानवाक्य आहे.

( उ ) 'तूं माझ्या घरीं आलास म्हणजे मी तुझ्या घरीं येईन' हें संबंध वाक्य मिश्रवाक्याचें उदाहरण आहे.

**या धड्यांत आपण काय शिकलों ?**

[ अ ] शुद्ध वाक्यांत फक्त एकच क्रियापद असतें.

[ आ ] मिश्रवाक्यांत ( १ ) दोन किंवा दोहोंहून जास्ती क्रियापदें असतात. ( २ ) त्यांतील एक वाक्य प्रधान असून बाकीचे गौण वाक्यें असतात; (३) गौणवाक्य हें फार तर मुख्य वाक्यांतील क्रियापदाचा कर्ता, कर्म, पूरक, किंवा क्रियाविशेषण असतें अथवा यांपैकीं कशावर तरी अवलंबून असतें.

टीपः—प्रधान वाक्य बोलणाराच्या मनांत असलेली मुख्य कल्पना व्यक्त करतें व गौणवाक्य बोलणाराचे मनांतील गौण कल्पना व्यक्त करतें.

## अभ्यास.

**खालील मिश्रवाक्यांतील प्रधान व गौण वाक्यें कोणतीं तें ओळखून गौणवाक्यानें कोणतें कार्य केलें आहे तें सांगा.**

[ क ] ( १ ) ईश्वरानें सर्वांस सुखी ठेवावें. हीच आमची इच्छा आहे. ( २ ) कोलंबसानें प्रथम अमेरिका खंड शोधून काढिलें हें खरें नव्हें. ( ३ ) हिंसा मुळींच करूं नये हें बौद्ध धर्माचें प्रमुख तत्व आहे. ( ४ ) पांडवांना लाक्षागृहांत जाळावें ही शकुनीचीच शक्कल होती. ( ५ ) आजन्म ब्रम्हचारी राहीन अशी भिष्माची प्रतिज्ञा होती.

( ख ) ( १ ) जपानी लोकांनीं लहान झाडांना फळें आणण्याची कला अवगत करून घेतली आहे असें म्हणतात. ( २ ) मला नेहमीं निद्रासुख लाभावें असें कुंभकर्णानें शंकरास म्हटलें. ( ३ ) पांडवांनीं दुर्योधनास विनवून म्हटलें कीं आम्हांला निदान पाच गांव तरी दे. ( ४ ) पानीपत येथें पुष्कळ घनघोर संग्राम झाले हें तुला कोणीं सांगितलें ? ( ५ ) शोकाचे भरांत धर्म अर्जुनास बोलला कीं गांडीव धनुष्य फेकून दे.

[ ग ] ( १ ) जो वीर यशवंती घोरपडीच्या साहाय्यानें किल्ल्यावर सरसर चढून गेला तोच तानाजी होय. ( २ ) ज्याच्या रथाला सात घोडे असून चरणरहित सारथी आहे त्या देवाचें नांव काय ? ( ३ ) जो जो प्रयत्न करावा तो तो यशस्वीच होतो. ( ४ ) ज्यानें संसाराला लाथ मारली तो लोकलज्जेची काय पर्वा करणार ? ( ५ ) जो धारातीर्थी पतन पावतो त्याला स्वर्ग प्राप्त होतो.

[ घ ] ( १ ) श्रियाळाचें चरित्र कोणाचेही अंगावर शहारे उत्पन्न करील इतकें हृदयद्रावक आहे. ( २ ) जेथें भाव तेथें देव. ( ३ ) गांव येईल तेव्हां आपण गाडींतून उतरूं. ( ४ ) लाल निशाण उभारलेलें दिसलें की एकदम हर हर महादेव करीत वर चढून या. ( ५ ) दुर्जनांच्या संगतीस राहूं नये, कारण त्यांची संगत नाशास कारण होते.

---

## धडा तिसरा.

## नामवाक्य, विशेषणवाक्य आणि क्रियाविशेषणवाक्य.

गौणवाक्य हें एक तर मुख्य वाक्यांतील क्रियापदाचा कर्ता, कर्म व पूरक अथवा क्रियाविशेषण असतें, किंवा यांपैकीं कशावर तरी अवलंबून असतें ही गोष्ट आपण मागच्या धड्यांत पाहिलीच आहे.

गौणवाक्याचे नामवाक्य, विशेषणवाक्य व क्रियाविशेषणवाक्य असे तीन प्रकार आहेत. त्यांचा लक्षण येणें प्रमाणें —

( १ ) जें गौणवाक्य मुख्य वाक्यांत क्रियापदाचा कर्ता, कर्म अथवा पूरक यांचे स्थानीं येऊन [ अथवा इतर रीतीनें ] नामाचें कार्य करितें त्या वाक्याला **नाममाक्य** असें म्हणतात; जसें:—

( १ ) कर्ता:—**त्यांनीं बैलगाडीनें जावें** असें माझें मत आहे,

( २ ) कर्म:—**आपापले धर्म पाळा** असें हिंदुधर्म सांगतो,

( ३ ) पूरक:—माझी इच्छा अशी आहे कीं **तूं ती धोतरजोडी नेसावी.**

( ४ ) दुसऱ्या नामाकडे उद्देश:—**ऑक्सिजन आणि हैड्रोजन या दोन वायुंपासून पाणी होतें** ही गोष्ट त्याला माहित नव्हती.

( २ ) जें गौणवाक्य एखाद्या नामाची व्याप्ति कमी करून विशेषणाचें कार्य करितें त्याला **विशेषणवाक्य** असें म्हणतात, जसें:—**जीं मुलें निरोगी असतात** तीं आनंदी राहतात.

( ३ ) जें गौणवाक्य क्रियाविशेषणाप्रमाणें क्रियापद, विशेशण किंवा क्रियाविशेषण यांच्या अर्थांत भर घालतें त्याल **क्रियाविशेषणवाक्य** असें म्हणतात, जसें:—

( अ ) आपण एवढी मेहेरबानी कराल तर माझें कार्य सुलभ होईल.
( क्रियापदाशीं संबंध )

( आ ) तोंडांत मावेल एवढाच घास घे. ( विशेषणाशीं संबंध. )

( इ ) तो जसें लिहितो, तसेंच तूंही लिही. ( क्रियाविशेषणाशीं संबंध. )

## अभ्यास.

**पुढील वाक्यांतील नामवाक्यें, विशेषणवाक्यें व क्रियाविशेषण-वाक्यें ओळखून त्यांचा प्रधानवाक्यांतील कोणत्या शब्दांशीं कोणता संबंध आहे तें सांगा.**

( १ ) पुणें शहर मराठी भाषेचें केंद्र आहे ही लोकांची समजूत खोटी नाहीं. ( २ ) शहाणपण वयावर अवलंबून असतें असें कांहीं लोक मानतात. ( ३ ) आज मनुष्यानें सृष्टीवर जें स्वामित्व प्रस्थापित केलें आहे तें केवळ बुद्धिसामर्थ्याच्या सहाय्यानेंच केलें आहे. ( ४ ) मोरोपंतांच्या काव्यांत लांब लांब समासांचीं फार उदाहरणें आहेत ही गोष्ट वर वर पाहणाराचेंही लक्षांत आल्यावाचून रहात नाहीं. ( ५ ) आमचे कार्यांत यश यावें म्हणून आमचे मित्र श्री लालुभाऊ फार परिश्रम करतात. ( ६ ) जर मनुष्यानें लोखंडाचें सहाय्य घेतलें नसतें तर आजची सुधारणा दिसली नसती. ( ७ ) ज्यांनीं ज्यांनीं आम्हांला मदत केली त्यांचे त्यांचे आम्ही आभारी आहों. ( ८ ) लोकांनीं आपल्याला चांगलें म्हणावें ही इच्छा मनुष्यमात्राचे ठिकाणीं दिसून येते. ( ९ ) कृष्ण शिष्टाईकरितां आले तेव्हां दुर्योधनानें त्यांचे म्हणणें मान्य केलें नाहीं.

## धडा चवथा.

## मिश्रवाक्य आणि संयुक्त वाक्य.

मिश्रवाक्यामध्यें दोन किंवा अधिक क्रियापदें असतात, त्यांमध्यें एक वाक्य प्रधान असून बाकीचीं वाक्यें गौण असतात; म्हणजे प्रधान वाक्याचें एक एक अंग या नात्यानें तीं प्रधान वाक्याशीं जोडलेलीं असतात या गोष्टी मागील दोन धड्यांमध्यें आपण स्पष्टपणें पाहिल्याच आहेत. आतां पुढील पानावरील वाक्यें पहा.

( १ ) मी बाजारांत गेलों आणि एक पेन्सील विकत आणली.
( २ ) रामा हुशार आहे. परंतु तो फार गर्विष्ठ आहे.
( ३ ) मला तुमें पुस्तक वापरावयास दे किंवा एक रुपया उसना दे.
( ४ ) रामानें अभ्यास केला नाहीं, म्हणून त्याला शिक्षा मिळाली.

## निरीक्षण.

( १ ) वरील वाक्यांकडे पाहिलें असतां प्रत्येकामध्यें दोन दोन क्रियापदें आहेत; मग हीं मिश्रवाक्याचींच उदाहरणें आहेत काय? हीं मिश्रवाक्यें असतील तर त्यांतील प्रधान वाक्य कोणतें व गौण वाक्यें कोणतें ?

( २ ) वरील वाक्यांपैकीं कोणत्याही वाक्यांत नामवाक्य, विशेषणवाक्य, किंवा क्रियाविशेषणवाक्य दिसत नाहीं; म्हणजे त्यामध्यें गौण वाक्य नाहीं.

( ३ ) वरील वाक्यांपैकीं प्रत्येक वाक्य दोन दोन लहान वाक्यांचें बनलें आहे, व तीं लहान वाक्यें गौण, प्रधान अशीं नसून तीं एकमेकांशीं समान आहेत.

( ४ ) अशा वाक्यांना संयुक्त वाक्यें असें म्हणतात. संयुक्त वाक्य हें दोन किंवा अधिक लहान वाक्यांचें बनलेलें असतें; व ज्या लहान वाक्यांचें मिळून संयुक्त वाक्य बनलेलें असतें तीं वाक्यें एकमेकांशीं समान असतात.

टीप:— [ १ ] संयुक्त वाक्यांतील समान वाक्यें एकमेकांशीं समानत्वसूचक उभयान्वयी अव्ययांनीं जोडलेलीं असतात.

[ २ ] मिश्र वाक्यांतील गौण वाक्यें प्रधान वाक्याशीं गौणत्वसूचक उभयान्वयी अव्ययें, संबंधी सर्वनामें, विशेषणें व क्रियाविशेषणें, यांपैकीं कोणत्या तरी शब्दानें जोडलेलीं असतात.

[ ३ ] एखाद्या मिश्र वाक्यामध्यें जेव्हां एकाच जातीचीं व प्रधानवाक्यांतील एकाच शब्दावर अवलंबून असलेलीं गौणवाक्यें 'आणि' 'व' इत्यादि समानत्व-सूचक उभयान्वयी अव्ययांनीं जोडलेलीं असतात. तेव्हां तींही एकमेकांशीं समान असतात. जसें.—रामा जेवला आणि शाळेंत गेला असें गणू म्हणतो. ज्यांनीं मला जन्म दिला व लहानाचे मोठे केलें त्यांना मी कधीं सोडूं ? जेव्हां पाऊस नुकताच पडून गेलेला असतो व सूर्य क्षितिजाजवळ प्रकाशत असतो तेव्हां इंद्रधनुष्य पडतें.

## अभ्यास.

(अ) खालील वाक्यांपैकीं संयुक्त वाक्यें कोणतीं व मिश्रवाक्यें कोणतीं तें ओळखा आणि मिश्रवाक्यांतील प्रधान व गौणवाक्यें कोणतीं तें सांगून गौणवाक्यांची जात ओळखा.

[१] तूं खोटें बोललास, सबब तुला शिक्षा केली पाहिजे. [२] त्या कुत्र्याला खावयास अन्न मिळेना, म्हणून तें मेलें [३] बापानें मुलाची धर वर केली, कां कीं त्यानें म्हातारपणीं सुख द्यावें. [४] पांडवांना लाक्षागृहांत जाळण्याचा दुर्योधनानें बेत केला होता; परंतु ईश्वरानेंच त्यांना वांचविलें. [५] त्यावेळीं मी घरीं असेन किंवा बागेंत असेन. [६] शत्रूच्या शस्त्रापासून संरक्षण व्हावें यास्तव योद्धे चिलखतें घालतात. [७] पाऊस थांबला तर मी येईन. [८] पांच वाजले कीं आमची शाळा सुटेल. [९] हिंमत असेल तर युद्धास तयार हो. [१०] मानें दररोज सकाळीं बागेंत यावें व दोन अश्रू गाळून परत जावें [११] आपल्याला पंख नाहींत म्हणून आपल्याला उडतां येत नाहीं. [१२] हें बक्षीस श्रीरामालाच मिळालें पाहिजे; कां कीं तो सर्वांहून हुशार आहे. [१३] मुनिजनांना होमहवनांत व्यत्यय होऊं नये म्हणून रामचंद्रानें खरदूषणादि राक्षसांना मारिलें [१४] मी त्याला निक्षून सांगेन कीं ही तुझीच चूक आहे.

(आ) (१) गौणत्वसूचक उभयान्वयी अव्ययांनीं जोडलेलीं पांच वाक्यें सांगा.

(२) समानत्वसूचक उभयान्वयी अव्ययांनीं जोडलेलीं पांच वाक्यें सांगा.

(३) संबंधी विशेषणांनीं जोडलेलीं पांच वाक्यें सांगा.

(४) संबंधी विशेषणांनीं जोडलेलीं पांच वाक्यें सांगा.

(४) संबंधी विशेषणांनीं जोडलेलीं पांच वाक्यें सांगा.

(५) समानत्वसूचक उभयान्वयी अव्ययांनीं जोडलेल्या परस्परांशीं समान अशा गौणवाक्यांचीं पांच उदाहरणें द्या.

### धडा पांचवा
## उद्देश्य आणि विधेय.

क्रियापद हा वाक्यांतील मुख्य शब्द असून क्रियापदाखेरीज वाक्यच होऊं शकत नाहीं, व क्रियापद ज्या प्रकारचें असेल त्यास अनुसरून

कर्ता, कर्म व पूरक हे शब्द वाक्याचे मुख्य घटक म्हणून वाक्यांत येऊन शिवाय कर्ता, कर्म व पूरक आणि क्रियापद यांवर अवलंबून असलेले या नात्यानें आणखीही इतर शब्द वाक्यांत येतात, या सर्व गोष्टी वाक्यविचाराच्या पहिल्या धड्यामध्यें आपण स्पष्टपणें पाहिल्याच आहेत.

क्रियापद हा वाक्यांतील मुख्य शब्द असण्याचें कारण हें आहे की त्याचेशिवाय वाक्यार्थच पुरा होत नाहीं वाक्याचे योगानें विधान करणें अथवा माहिती सांगणें, प्रश्न विचारणें, आज्ञा करणें व इच्छा प्रदर्शित करणें यांपैकीं जें कार्य होत असेल त्याप्रमाणें त्याला विधानार्थक, प्रश्नार्थक, आज्ञार्थक, किंवा इच्छाप्रदर्शक यांतून योग्य तें नांव देतात ही गोष्ट आपण या पुस्तकाचे आरंभीं पाहिलीच आहे.

नियमितपणें अभ्यास करणारा विद्यार्थी परीक्षेंत बहुतकरून नापास होत नाहीं.

या वाक्यांत नियमितपणें अभ्यास करणाऱ्या विद्यार्थीबद्दल तो 'परीक्षेंत बहुतकरून नापास होत नाहीं' हें विधान केलें. विद्यार्थ्याला उद्देशून म्हणजे त्याचेबद्दल माहिती सांगितली असल्यामुळें 'नियमितपणें अभ्यास करणारा विद्यार्थी' हें या वाक्यांतील उद्देश्य झालें, व 'परीक्षेंत बहुतकरून नापास होत नाहीं' हें या वाक्यांतील विधेय झालें.

नियमितपणें अभ्यास करणारा विद्यार्थी परीक्षेंत कधीं तरी नापास होतो काय ?

हें प्रश्नार्थक वाक्य असून नियमितपणें अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्याला उद्देशून म्हणजे त्याचेबद्दल माहिती विचारली असल्यामुळें 'नियमितपणें अभ्यास करणारा विद्यार्थी' हें या वाक्यांतील उद्देश्य झालें व 'परीक्षेंत कधींतरी नापास होतो काय' हा तो प्रश्न असल्यामुळें हें या वाक्यांतील विधेय झालें.

| | |
|---|---|
| नियमितपणें अभ्यास करणारा विद्यार्थी परीक्षेंत कधींही नापास न होवो. | या इच्छाप्रदर्शक वाक्याप्रमाणें नियमितपणें अभ्यास करणाऱ्याला उद्देशून म्हणजे त्याचेबद्दल इच्छा प्रदर्शित केली असल्यामुळें 'नियमितपणें अभ्यास करणारा विद्यार्थी' हें या वाक्यांतील उद्देश्य असून, 'परीक्षेंत कधींही नापास न होवो' हें विधेय आहे. |
| तूं एवढा घडा तयार कर. | या आज्ञार्थक वाक्यांत ज्याला उद्देशून आज्ञा केली आहे तो 'तूं' या शब्दानें दर्शविला गेला असल्यामुळें 'तूं' हें या वाक्यांतील उद्देश्य असून 'एवढा घडा तयार कर' हें विधेय आहे. |

**व्याख्या:**—( १ ) ज्याला उद्देशून किंवा ज्याचेबद्दल विधान केलें असेल किंवा प्रश्न विचारला असेल, किंवा आज्ञा केली असेल, किंवा इच्छा प्रदर्शित केली असेल तद्दर्शक शब्दाला किंवा शब्दसमुच्चयाला त्या वाक्यांतील **उद्देश्य** असें म्हणतात.

( २ ) उद्देशानें दर्शविलेल्या वस्तुस किंवा व्यक्तीस उद्देशून जें कांहीं विधान, प्रश्न, किंवा आज्ञा केली असेल, किंवा जी कांहीं इच्छा प्रदर्शित केली असेल तद्दर्शक शब्दाला किंवा शब्दसमुच्चयाला **विधेय** असें म्हणतात.

**टीप:**—( क ) कर्तृप्रधान वाक्यामध्यें कर्ता व त्यावर अवलंबून असलेले शब्द एवढें मिळून उद्देश्य बनलेलें असतें व बाकीचे सर्व शब्द मिळून विधेय बनलेलें असतें, यांचीं उदाहरणें वर आलींच आहेत.

( ख ) कर्मप्रधान वाक्यामध्यें कर्म व त्यावर अवलंबून असलेले शब्द मिळून उद्देश्य बनलेलें असतें; व बाकीचे शब्द मिळून उद्देश्य बनलेलें असतें, जसें:—माझ्यानें एवढा घडा एका दिवसांत सहज पाठ करवेल. या वाक्यांत 'एवढा घडा' हें उद्देश्य असून माझ्यानें एका दिवसांत सहज पाठ करवेल' हें विधेय आहे.

( ग ) भावप्रधान वाक्यांत उद्देशदर्शक शब्द स्वतंत्र नसून उद्देश्य वाक्यांतील क्रियापदाचे अर्थांतच येऊन जातें. अशा वाक्यांतील सर्व शब्दांचा विधेयामध्येंच

समावेश होतो, जसें:—आम्हाला नागपूरचे स्टेशनावर उतराइलें. या वाक्यांत उद्देश्य क्रियापदान्तर्गत असून सर्व शब्द मिळून विधेय दर्शवितात.

(४) उद्देश्यांतील मुख्य शब्दाला म्हणजे कर्तृप्रधान वाक्यांतील कर्त्याला व कर्मप्रधान वाक्यांतील कर्माला **मूळ उद्देश्य** अशी संज्ञा असून त्यावर अवलंबून असलेल्या शब्दांना **उद्देश्यविस्तार** असें म्हणतात.

(५) विधेयांतील मुख्य शब्दाला म्हणजे क्रियापदाला **मूळ विधेय** अशी संज्ञा आहे. क्रियाविशेषणाप्रमाणें क्रियापदाचे अर्थांत भर टाकणाऱ्या शब्दांना **उद्देश्यविस्तार** असें म्हणतात. क्रियापदाचा अर्थ पूर्ण होण्याकरितां कर्म किंवा पूरक यांची जरूरी असल्यास तेही शब्द विधेयाचे भाग मानले जातात.

**यांप्रमाणें वाक्याचे उद्देश्य आणि विधेय असे दोन भाग पडून पुन्हां त्यांचे (१) मूळ उद्देश्य व (२) उद्देश्यविस्तार, आणि (१) मूळ विधेय (२) कर्म (३) पूरक व (४) विधेय-विस्तार असे पोटविभाग पडतात. हे सर्व खालीं कोष्टकांत लिहून दाखविले आहेत**

| उद्देश्य. | | विधेय. | | | |
|---|---|---|---|---|---|
| मूळ उद्देश्य | उद्देश्यविस्तार | मूळ विधेय | कर्म | पूरक | विधेयविस्तार |
| | | | | | |

टीपः—कर्मप्रधान व भावप्रधान वाक्यांमध्यें कर्ता व त्यावर अवलंबून असलेल्या शब्दांना विधेयविस्तारांत घालण्याची चाल आहे.

वाक्याचे उद्देश्य विधेय व त्यांचे पुन्हां मूळ उद्देश्य, उद्देश्यविस्तार वगैरे भाग दाखविण्याच्या क्रियेला वाक्यपृथक्करण असे नांव आहे.

## अभ्यास.

खालील वाक्यांतील उद्देश्यें व विधेयें शोधून काढा.

(१) श्रीमंत लोक गरीब लोकांना तुच्छ मानतात. (२) मनमिळाऊ स्वभाव ईश्वरी देणगीच होय. (३) प्रवासाच्या श्रमानें थकून जाऊन आम्ही ती रात्र धर्मशाळेंत काढली. (४) बाळश्रीकृष्णानें दही, दूध नित्य चोरावें. (५) लहान मुलांनीं नाटकें पाहूं नये. (६) त्या दुखण्यानें हरीभाऊंच्या मुलांचे फार हाल झाले. (७) मोंगल राजांनी हिंदुस्थानांत अपरिमित ऐषआराम भोगिले. (८) ठग लोकांनीं रुमाल गळ्याभोंवतीं घालून गरीब वाटसरूंचे निर्दयतेनें प्राण घ्यावे. (९) प्रत्येकानें आपापलें कर्तव्य पाळावें

---

## धडा सहावा.

## वाक्यांतील शब्दरचना.

### पदक्रम.

कर्ता, कर्म, पूरक, व क्रियापद आणि त्यांवर अवलंबून येणारे वाक्यांतील इतर शब्द वाक्यांत कोणत्या क्रमानें येतात त्यासंबंधाचे ठोकळ नियम खालीं दिलें आहेत; ते कितपत खरे आहेत व त्यांना केव्हां केव्हां अपवाद येतात हें विद्यार्थ्यांनीं आपल्या वाचनांत येणाऱ्या पुस्तकांतील भाषेचें निरीक्षण करून ठरवावें.

(१) प्रथम कर्ता, नंतर कर्म, नंतर पूरक व शेवटीं क्रियापद या क्रमानें वाक्यांत शब्द येतात असे म्हणावयास हरकत नाहीं; जसें:—
पक्षी उडतात. मी आंबा खातों. रामा आजारी पडला. रामानें बिभिषणाला लंकाधिपति केलें.

( २ ) कर्ता, कर्म, पूरक व क्रियापद यांवर अवलंबून असलेले शब्द त्या त्या शब्दांच्या मागें येतात; जसें:—

**काळ्या** मांजरानें **लठ्ठ** उंदीर **चटकन** पकडला.

( ३ ) अवलंबी शब्दावरही दुसरे शब्द अवलंबून आले तर ते अवलंबी शब्दाच्याही मागें येतात जसें:—

मला **फार** गोड पदार्थ आवडत नाहींत.

( ४ ) विशेषणवाक्यें व संबंधी क्रियाविशेषणांनीं जोडलेलीं क्रियाविशेषणवाक्यें हीं वाक्यांत आलीं असतां त्यांची व्यवस्थाही दुसऱ्या व तिसऱ्या नियमाप्रमाणें होते; जसें:—

( १ ) **जेथें तुला जावयाचें असेल** तेथें जा.

( २ ) मी हें पुस्तक **ज्याला गरज असेल** त्याला देईन.

( ५ ) नामवाक्यें कर्तृस्थानीं आल्यास तीं वाक्याचे आरंभीच येतात, व कर्मस्थानीं आल्यास मात्र केव्हां क्रियापदापूर्वीं व केव्हां क्रियापदानंतर अशीं येतात; जसें:—

**कर्ता:**—[ १ ] **ज्ञान अनंत** आहे हें खरें आहे.

[ २ ] **तो नापास झाला** हें वाईट झालें.

**कर्म:**— [ १ ] रामभाऊंनीं **मी येतों** असें म्हटलें.

[ २ ] तो म्हणाला कीं **मी उद्यां येईन.**

**टीप:**—हे नियम सर्वस्वी पाळले जातातच असें नाहीं. बोलणाराचे अथवा लेखकाचे इच्छेप्रमाणें ज्या शब्दाला प्रसंगानुसार प्राधान्य द्यावयाचें असेल तो शब्द वाक्याचे आरंभीं ठेवला जातो; जसें:—गेला कोठें तो? कोठें गेला तो?

## अध्याहृत शब्द.

वाक्यांत कर्ता अथवा क्रियापद हीं जेव्हां संदर्भावरून सहज लक्षांत येण्यायोगीं असतील तेव्हां तीं वाक्यांतून गाळून टाकण्याचा प्रघात आहे. अशा रीतीनें गाळून टाकलेल्या शब्दाला **अध्याहृत शब्द** असें

म्हणतात. अध्याहृत शब्दांची खालीं उदाहरणें दिलीं आहेत त्यावरून **अध्याहार** ( गाळून टाकण्याची क्रिया ) कोठें कसा केला जातो तें समजून येईल.

अध्याहृत कर्ता

[ १ ] तुम्ही काल आलांत म्हणून ऐकलें.
[ २ ] असें म्हणतात कीं कान टाकल्याबरोबर सर्प तरुण होतो.
[ ३ ] त्याई त्याला खवखवें,
[ ४ ] एवढें काम कर आणि मग खेळावयास जा.
[ ५ ] यंदा पास झालास तर बरी गोष्ट आहे,

अध्याहृत कर्म.

( १ ) देवाने डोळे दिले असून तूं पहात नाहींस तेव्हां तुला काय म्हणावें ?
[ २ ] खाण्याकरितां जगूं नका; जगण्याकरितां खा.
[ ३ ] "हा आरसा कोणीं फोडला ?" रामानें फोडला."

अध्याहृत क्रियापद.

[ १ ] तुझें नांव काय ?
[ २ ] घरोघरीं मातीच्याच चुली.
[ ३ ] तूं अगदींच की रे वेडा.

## धातुरूपें आणि क्रियापदें यांची जुळणी.

कर्तरि प्रयोगांत क्रियापदाचें रूप कर्त्याच्या लिंगवचनपुरुषांस अनुसरून असतें व कर्मणिप्रयोगांत तें कर्माच्या लिंगवचनपुरुषांस अनुसरून असतें हें आपण प्रयोगविचारांत पाहिलेंच आहे. आतां एकच क्रियापद व भिन्न कर्ते किंवा कर्मे असलेल्या अशा निरनिराळ्या शुद्ध वाक्यांचा अर्थ एकाच संयुक्त वाक्यानें दर्शविला गेल्यास क्रियापद कोणत्या शब्दाच्या लिंगवचनपुरुषांस अनुसरून रहातें ? उदाहरणार्थः— **नाना शाळेंत गेला. मनी शाळेंत गेली.** हीं दोन शुद्ध वाक्यें एका ठिकाणीं केलीं असतां क्रियापदाची काय व्यवस्था होईल ?

"नाना आणि मनी शाळेंत—" या ठिकाणीं क्रियापद कोणतें ठेवावें ? गेला असें ठेवावें की गेली असें ठेवावें ? अशा प्रसंगीं दोन प्रकारचीं क्रियापदें घालण्याचा भाषेचा प्रघात दिसतोः—

[ १ ] नाना आणि मनी शाळेंत गेली, *
[ २ ] नाना आणि मनी शाळेंत गेलीं, किंवा
नाना आणि मनी हीं शाळेंत गेलीं. S

त्याचप्रमाणेंः— [ १ ] मनी आणि नाना शाळेंत गेला. *
मनी आणि नाना शाळेंत गेलीं. S किंवा
मनी आणि नाना हीं शाळेंत गेलीं. S

या उदाहरणांवरून आपल्याला असा नियम करण्यास हरकत नाहीं कीं तृतीयपुरुषी एकवचनी परंतु भिन्न लिंगी असलेले कर्ते कर्तरि वाक्यांत समुच्चय-बोधक उभयान्वयी अव्ययांनीं जोडले असतां क्रियापद एकतर शेवटच्या कर्त्याच्या लिंगवचनपुरुषांस अनुसरून असतें किंवा तृतीय पुरुषी नपुंसकलिंगी अनेकवचनी असतें; व अशा वेळीं 'हीं' हें, सर्वनाम कर्त्याचे ठिकाणीं घालतात किंवा तें अध्याहृतही ठेवतात.

## अभ्यास.

खालील वाक्यांतील कर्त्यांचे लिंगवचनपुरुष कोणते आहेत. ते कोणत्या उभयान्वयी अव्ययानें जोडले आहेत आणि क्रियापदाचे लिंगवचनपुरुष कसे आहेत तें पहा.

अ.
( १ ) रामा आणि कृष्णा फिरावयास गेले.
( २ ) रामा आणि कृष्णा हे फिरावयास गेले.
( ३ ) मनी आणि गोदी शाळेंत गेल्या.
( ४ ) मनी आणि गोदू ह्या शाळेंत गेल्या.

आ.
( १ ) मी, तूं आणि कृष्णा येथेंच खेळूं.
( २ ) तूं मी आणि कृष्णा येथेंच खेळूं.
( ३ ) तूं कृष्णा आणि मी येथेंच खेळूं.
( ४ ) कृष्णा, तूं आणि मी येथेंच खेळूं.

---

* हीं संयुक्त वाक्यें आहेत S हीं शुद्ध वाक्यें आहेत.

(१) तूं आणि तुझे वडील उद्यां मुंबईस पोहोंचाल.
(२) तुझे वडील आणि तूं उद्यां मुंबईस पोहोंचाल.
(३) तूं आणि मनी उद्यां मुंबईस पोहोंचाल.
(४) मनी आणि तूं उद्यां मुंबईस पोहोंचाल.

(१) रामा किंवा गोविंदा बाजारांत गेला.
(२) रामा किंवा त्याचे मित्र तेथें नव्हते.
(३) रामा अथवा मी बाजारांत जाईल.
(४) मी अथवा रामा बाजारांत जाईल.
(५) तूं अथवा तुझा मुलगा आला म्हणजे मी निघेन.
(६) नाना किंवा मनी माझें टेबल पुसून ठेवतील.

## प्रश्न.

(१) कर्तरि वाक्यांत समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययांनीं जोडलेले कर्ते (अ) समान लिंगवचनपुरुषांचे असतां क्रियापदाचें रूप कसें असतें? (आ) प्रथम पुरुषी, द्वितीयपुरुषी व तृतीयपुरुषी कसें असतें? (इ) द्वितीयपुरुषी व तृतीय-पुरुषी असतां कसें असतें?

कर्तरि वाक्यांत असमान लिंगवचनपुरुषांचे कर्ते विकल्पबोधक उभयान्वयी अव्ययांनीं जोडले असतां क्रियापदाचे लिंगवचनपुरुष कशास अनुसरून असतात?

(२) कर्मणि वाक्यामध्यें निरनिराळीं कर्में घेऊन तीं समुच्चयबोधक अथवा विकल्पबोधक उभयान्वयी अव्ययांनीं जोडून क्रियापदाचे रूपावर काय परिणाम होतो तो पहा; वरील नियम कर्मणि वाक्यांतही कितपत लागू पडतात तें सांगा.

---

## धडा सातवा.

## विरामचिन्हें.

विरामचिन्हांचा उपयोग भाषेमध्यें घोटाळा, अर्थविपर्यास, दुर्बोधता, व अनिश्चितपणा हीं उत्पन्न होऊं नयेत हा होय, व म्हणून ज्या ज्या ठिकाणीं अशा प्रकारची अडचण उत्पन्न होण्याचा संभव असेल त्या त्या ठिकाणीं योग्य तें विरामचिन्ह घालून ती नाहींशी केली पाहिजे.

'विराम' म्हणजे थांबणें. हा वाटोळा बोलतांना कांहीं शब्द एक-दम म्हणून झाल्यावर कमी जास्ती वेळ थांबून घालविला जातो; परंतु लिहीतांना मात्र हा वेळ दाखवितां येत नाहीं. म्हणून हा वेळ दाखविण्या-करितां निरनिराळया चिन्हांचा लेखी भाषेमध्यें उपयोग करावा लागतो. सर्वांत कमी वेळ दाखविणारें चिन्ह स्वल्पविराम (,) हें असून सर्वांत जास्ती वेळ दाखविणारें चिन्ह पूर्णविराम (.) हें होय, अर्धविराम (;) चिन्हाचे योगानें स्वल्पविरामापेक्षां अधिक वेळ व पूर्णविरामा-पेक्षा कमी वेळ दाखविला जातो. चिन्हांचा उपयोग कसा करावा हें पुढील उदाहरणांच्या निरीक्षणानें कळून येईल.

स्वल्पविरामः—(,)

(१) यौवन, संपत्ति, प्रभुत्व व अविवेक यांपैकीं एक एक कारण देखील मनुष्याच्या नाशास पुरे आहे.

(२) असे मनोहर, आल्हाददायक व प्रशांत स्थळ पाहून आमचे मनास फार आनंद वाटला.

(३) मोठमोठीं भोजनालयें, नाचरंग करण्याचे प्रशस्त दिवाणखाने, क्रिकेट, टेनिस वगैरे खेळ खेळण्याच्या जागा, सुंदर बागबगीचे, स्नानगृहें व पोहण्याचे मोठमोठे हौद, व्यायामगृहें, दवाखाने वगैरे सोयी या बोटीवर असतात.

(४) आम्हीं वृक्षांचीं फळें खाल्लीं, ओढ्याचें स्वच्छ पाणी प्यालों, थोडा वेळ इकडे तिकडे उड्या मारल्या व एका विस्तीर्ण वृक्षाच्या छायेंत स्वस्थ झोंपलों.

निरीक्षणः—पहिल्या वाक्यांत नामें, दुसऱ्या वाक्यांत विशेषणें, तिसऱ्या वाक्यांत विशेषणसहित नामें व चवथ्या वाक्यांत लहान लहान वाक्यें स्वल्प-विरामानें जोडलेलीं आहेत. वाक्यांतील समान दर्जाचे दोन शब्दसमूह जोडण्या-करितां आणि, किंवा इ. उभयान्वयी अव्ययांचा उपयोग करितात. परंतु तीन अथवा तिहींहून अधिक असे वाक्यांतील समान दर्जाचे शब्द किंवा शब्दसमूह अथवा वाक्यें जोडावयाचीं असल्यास उभयान्वयी अव्यय शेवटच्या जोडीकरितां राखून ठेवून स्वल्पविरामाचा इतरत्र उपयोग करितात.

( १ ) महाराज, मी अपराधी आहें.
( २ ) हा लक्ष्मणा ! हे सीते ! धांव.

निरीक्षणः—संबोधन विभक्तींतील शब्दापुढें स्वल्पविराम किंवा उद्गारवाचक चिन्ह असतें.

## अर्धविरामः—[ ; ]

( १ ) तेव्हां गोपाळरावांनीं मुनसफ कोर्टांत उमेदवारी पतकरिली; परंतु त्यांच्या मानी व हुशार स्वभावाला ही खटपट रुचण्यासारखी नव्हती.

( २ ) मुंबईसारखें अफाट व नानातऱ्हेच्या मौजेच्या व उपयुक्त वस्तूंनीं भरलेलें शहर पाहून, विष्णूस हें पाहूं का तें पाहूं असें होऊन गेलें, व त्यानें प्रश्न विचारून विचारून आपल्या वडिलांस वेडावून सोडलें.

निरीक्षणः—संयुक्त वाक्यांतील समान वाक्यें मोठमोठीं असल्यास त्यांचेमध्यें अर्धविराम चिन्ह येतें; परंतु तीं लहान असलीं तर स्वल्पविरामही घालतात; जसें:—मी त्याचे घरीं गेलों होतों, पण तो घरीं नव्हता.

## पूर्णविराम [ . ]

( १ ) कृष्णानें पांडवांना अनेक संकटांतून सोडवून वेळोवेळीं जें साह्य केलें तें जर केलें नसतें, तर पांडवांचा विजय होता ना.

( २ ) आतां तुम्ही जा.

निरीक्षण:—

**वाक्य पूर्ण झालें म्हणजे विधानार्थक अथवा आज्ञार्थक वाक्यांचे शेवटीं पूर्णविराम योजतात.**

## प्रश्नचिन्हः— [ ? ]

आपलें नांव काय ? आंब्यास मोहोर केव्हां येतो ? मूर्खांचें समाधान ब्रम्हदेव तरी करूं शकेल काय ?

**निरीक्षणः—प्रश्नार्थक वाक्यांचे शेवटीं प्रश्नचिन्ह योजतात.**

टीपः—'तो घरीं आहे' हें वाक्य बोलण्याच्या रीतीवरून विधानार्थक अथवा प्रश्नार्थक असूं शके. परंतु लेखी भाषेमध्यें हा भेद कसा दाखवावा ? तो दाखविण्याकरितां लेखी भाषेमध्यें प्रश्नार्थक वाक्यांचे शेवटीं प्रश्नचिन्हाचा उपयोग करितात; जसें:—

तो घरीं आहे, ( विधानार्थक ) तो घरीं आहे ?. ( प्रश्नार्थक )

### उद्गारवाचक (!)

(१) अहाहा! किती मनोहर हा देखावा!

(२) अबब! केवढा भयंकर साप हा!

(३) अरेरे! बिचाऱ्यास पोटभर अन्नही मिळत नाहीं!

(४) हरहर! तसल्या प्रसंगांत त्याची काय दुर्दशा झाली असेल!

**निरीक्षणः—केवलप्रयोगी अव्ययापुढें, व मनांतील आनंद, भीति, दुःख, आश्चर्य, इत्यादि विकार ज्या शब्दबरोबर किंवा वाक्याबरोबर बोलणाराचे मनांत उत्पन्न होत असतील त्या शब्दांपुढें अथवा वाक्यांपुढें उद्गारवाचक चिन्ह योजतात.**

### अवतरण चिन्हः—(" ")

(अ) [१] रावणानें म्हटलें कीं "मी लंकानगरीचा राजा आहें. सगळे देव माझ्या बंदीखान्यांत आहेत.

[२] "एक तर निष्पांडवी पृथ्वी करीन, नाहींतर धारातीर्थी देह ठेवीन." असे शब्द भीष्माच्या तोंडून निघाले.

**निरीक्षणः— दुसऱ्याचे शब्द जसेच्या तसे वाक्यांत लिहावयाचे असतां ते शब्द अगोदर [ " ] हें चिन्ह ठेवून लिहितात, व त्यांचे शवटीं [ " ] अशा तऱ्हेचें चिन्ह लिहितात.**

(आ) [१] "सूतपुत्र" हा शब्द कर्णाचे मनास झोंबला.

"वृत्ती" या शब्दांत किती जोडाक्षरें आहेत?

**निरीक्षणः—एखाद्या शब्दाच्या अर्थाकडून लक्ष काढून तें त्याच्या स्वरूपाकडे वाचकांनीं लावावें अशी लेखकाची इच्छा असल्यास तो शब्द अवतरण चिन्हांत लिहिण्याचा प्रघात आहे.**

### अभ्यास.

**(आ) खालील वाक्यांत योग्य विरामचिन्हांचा योग्य जागीं उपयोग करा.**

(१) वयानें विद्येनें ज्ञानानें व अनुभवानें आपण मजपेक्षां श्रेष्ठ आहात.

(२) अरेरे त्यानें माझा घात करण्यास प्रवृत्त व्हावेंना.

(३) दशरथाला राम लक्ष्मण भरत व शत्रुघ्न असे चार पुत्र होते परंतु मृत्युसमयीं एकही जवळ नसल्यामुळें त्यानें राम राम म्हणत प्राण सोडला.

[ ४ ] भीम चवताळून म्हणाला कौरवाधमा तुझ्या भाषणाचें उत्तर मी युद्धामध्यें हृदयभेदक बाणांनींच देईन.

[ ५ ] स्वतंत्र झाल्याबरोबर भीम म्हणाला येथल्या येथें, शत्रूंना ठार करून टाकतों मग धर्मराज तूं खुशाल पृथ्वीचें राज्य कर.

[ ६ ] वनास जाण्यापूर्वी धृतराष्ट्र भीष्म द्रोण विदुर वगैरे सर्वांचा निरोप घेऊन धर्मराज म्हणाला ईश्वराच्या दयेनें वनवास संपल्यावर मी आपल्या पायांचें दर्शन घेण्यास पुनः परत येईन.

[ ७ ] आतांपर्यंत कष्टानें आवरून धरलेल्या भीमसेनाचा क्रोध अनावर झाला व तो त्वेषानें म्हणाला अरे सहदेवा जा वराचसा अग्नि घेऊन ये म्हणजे द्यूत खेळून आपली पतिव्रता भार्या शत्रूचे स्वाधीन करणाऱ्या धर्मांचे हात जाळून टाकतों परंतु धर्मराज द्यूत खेळला तो द्रव्यलोभानें खेळला नसून क्षात्रधर्मास जागूनच खेळला ह्या अर्थी असें अशुभ बोलणें ठीक नव्हे असें सांगून अर्जुनानें त्याला कसाबसा आवरला.

[ आ ] पुढील वाक्यांचे अर्थांत काय फरक आहे तो सांगा.

[ १ ] तो एवढा मोठा असून त्याला कांहीं समजत नाहीं.

[ २ ] तो एवढा मोठा असून त्याला कांहीं समजत नाहीं !

[ ३ ] तो एवढा मोठा असून त्याला कांहीं समजत नाहीं,

---

# खंड नववें. व्युत्पत्तिविचार.

## प्रकरण पहिलें

—: १ :—

### प्रत्ययघटीत, उपसर्गघटीत व अभ्यस्त शब्द.

### धडा पहिला.

### सिद्ध शब्द आणि साधित शब्द.

जे धातू भाषेमध्यें मूळचेच असतात म्हणजे भाषेंतील दुसऱ्या कोणत्याहि शब्दापासून झालेले नसतात त्यांस सिद्ध धातू असें नांव असून जे भाषेंतील इतर शब्दांवरून साधलेले किंवा बनलेले असतात त्यांस साधित धातू असें म्हणतात, ही गोष्ट आपण क्रियापद प्रकरणांत पाहिलीच आहे.

धातूंचे ज्याप्रमाणें सिद्ध आणि साधित असे दोन प्रकार व्युत्पत्ति-वरून होतात त्याप्रमाणें नामें, विशेषणें, क्रियाविशेषणें, शब्दयोगी अव्ययें व उभान्वी अव्ययें या शब्दांचेही सिद्ध आणि साधित असे दोन वर्ग होऊं शकतात.

कोणताही शब्द भाषेंत मूळचाच असेल म्हणजे तो त्याच भाषें-तल्या दुसऱ्या एखाद्या शब्दापासून बनलेला नसेल तर त्याला सिद्ध शब्द असें आपण नांव देऊं; परंतु तोच जर दुसऱ्या एखाद्या शब्दा-पासून बनलेला असेल तर त्याला आपण साधित शब्द असें नांव देऊं.

या धड्यांत साधित शब्द कसे बनतात तें आपल्याला पहावयाचें आहे.

खालील वाक्यांत जाड अक्षरांत लिहिलेले शब्द साधित शब्द आहेत ते कोणत्या इतर शब्दांपासून बनले आहेत व कोणत्या रितीनें बनले आहेत तें सांगा.

| | |
|---|---|
| शत्रूंचा पराजय झाला,<br>भीष्म आमरण ब्रम्हचारी राहिला.<br>चार उपदिशांचीं नांवें सांगा. | या ठिकाणचे साधित शब्द जय, मरण व दिशा या शब्दांपासून बनलेले आहेत; मूळ शब्दांचे मागें परा, आ व उप हीं अक्षरें अनुक्रम लागून ते बनलेले आहेत. परा, आ व उप यांना उपसर्ग असें म्हणतात. |
| त्याच्या नीचतेचा मना संताप आला.<br>गुणवान् पुरुष उपाशीं मरत नाहींत.<br>या शब्दांतील अन्त्य स्वर कोणता? | या ठिकाणचे साधित शब्द नीच, गुण व अन्त या शब्दांपासून बनलेले आहेत; मूळ शब्दांचे पुढें ता, वान् आणि य हीं अक्षरें अनुक्रमें येऊन ते बनलेले आहेत. ता, वान् व य हे प्रत्यय आहेत. |
| तो भीतीनें थरथर कांपतो.<br>तो कधींकधीं इकडे येतो.<br>पैसा मधोमध ठेव. | या ठिकाणचे साधित शब्द एकाच शब्दाची द्विरुक्ति होऊन झालेले आहेत. |
| पांडवांनीं वनवास पत्करिला.<br>गजानन आमचे विघ्न हरण करो.<br>चंद्रप्रकाश आनंद देतो. | या ठिकाणचे साधित शब्द दोन मूळ शब्दांचा संयोग होऊन झालेले आहेत. यांना सामासिक शब्द असें म्हणतात. |

या प्रकारें मूळ शब्दापासून चार रीतींनीं साधित शब्द बनवितां येतात.

[१] मूळ शब्दामागें कांहीं अक्षरें घालून. ( शब्दांच्या मागें येणाऱ्या अक्षरांना उपसर्ग असें म्हणतात ) [ २ ] मूळ शब्दाचे पुढें कांहीं अक्षरें घालून. ( शब्दाच्या पुढें येणाऱ्या अक्षरांना प्रत्यय असें म्हणतात. ) [ ३ ] शब्दांची द्विरुक्ति करून. [ ४ ] दोन अथवा अधिक शब्दांचा एका शब्दांत संयोग करून

व्याख्या:-(१) मूळ शब्दाचे मागें उपसर्ग लागून बनलेल्या साधित शब्दांना उपसर्गघटित शब्द असें म्हणतात.

(२) मूळ शब्दाला पुढें प्रत्यय लागून बनलेल्या साधित शब्दांना प्रत्यय-घटित शब्द असें म्हणतात.

(३) मूळ शब्दाची द्विरुक्ति होऊन बनलेल्या साधित शब्दांना अभ्यस्त शब्द असें म्हणतात.

(४) दोन अथवा अधिक शब्दांचा संयोग झालेल्या साधित शब्दांना सामासिक शब्द असें म्हणतात.

## अभ्यास.

**(१) खालील उपसर्गघटित शब्दांतील उपसर्ग व ते ज्या मूळ शब्दाला लागले असतील ते शब्द ओळख.**

सुकाळ, सुवास, दुर्गुण, दुष्कर्म, अनुकरण, अनुताप, विस्मृति, वियोग, सुभाषित, अनुक्रमणिका, पराक्रम, परिश्रम, परिपूर्ण, पराभव, उद्भव, उत्क्रांति, अवकृपा, अवकळा, संगति, संयोग, प्रगति, अधिपति, अध्यात्म, आभार, उपवन, नियमन, निर्बंध, निर्लज्ज, निर्धन, प्रतिकार, प्रतिक्रिया, अभिनंदन, अभिवृद्धि, अधःपतन, अधोमुख, अंतर्धान पुनर्विवाह, सज्जन.

**(२) अधि, अनु, अप, अभि, अव, आ, उत्, उप, दुस्, नि, निस्, परा, परि, प्र, प्रति, वि, सम्, सु हे उपसर्ग मागें येऊन साधिलेल्या शब्दांची तीन तीन उदाहरणें शोधून काढा.**

**(३) खालीं साधित नामें, विशेषणें व अव्ययें दिलीं आहेत तीं कोणत्या मूळ शब्दावरून साधलीं आहेत व मूळ शब्दाला कोणता प्रत्यय लागून साधलेलीं आहेत तें ओळखा.**

### साधित नामें.

**(१) नामांवरून साधलेलीं:—**गाडीवाला, नगरकर, वाचीप, पाथरवट, नावाडी, सेवी, दलाली, शेती, नोकरी, झाडू, गरजू, पिसारा, वाफारा, फुलारी, उखळी, रामजी, संभाजी, अंमलदार, माणुसकी, तोंडवळा, नागाडी रोपटें, इत्यादि.

**(२) विशेषणांवरून साधलेलीं:—**भलाई, गोडी, आंबटपणा, तुरटी, थंडावा, ओलावा.

(३) धातूंवरून साधलेलीं:—घोंवणें, दळण, धुलाई, खाणावळ, चूक, लूट, तूट, मेळ, मोज, ठेवा, ठोका, चढाई, उधळ्या, उचल्या, लुटारू, फंदीखाळ, चढाव, उतार, इत्यादि.

(४) अव्ययांवरून साधलेलीं:—लखलखाट, वरखाल, (मला वरखाल पडून, होत नाहीं.) बरोबर, (तो माझी बरोबर करतो.)

## साधित विशेषणें.

नामांवरून साधलेलीं:—कृपाळू, झोपाळू, कागदी, गुलाबी, महेश्वरी, हिंदुस्थानी, तेलकट, गुळचट, प्रमाणशीर, मळकट, सोनेरी, मासळेवाईक, लाजिरवाणें, ढोलस.

सर्वनामांवरून साधलेलीं:—कोणता, कसा, कसला

विशेषणांवरून साधलेलीं:—आठवा, विसावा, लहानसा, लांबट, हिरवट, बोलका, काळसर, वेडसर, एकेरी, दुहेरी, लालवट.

धातूंवरून साधलेलीं:—उघडा, सुटा, लढाऊ, भिजलेला, टिकाऊ, फाटका, बोलका, जळका, भांडखोर, उडता (पक्षी) धांवता, रांगता, वसकट, लिहावयाचें, लिहिलेलें,

अव्ययांवरून साधलेलीं:—येथील, पुढील, मुळमुळीत, भुसभुशीत, मागला, पुढला, वरचा.

## साधित अव्ययें.

नामांवरून साधलेलीं:—क्षणभर, दिवसभर, क्षणोक्षणीं, पाठोपाठ, रातोरात, दररोज, दरघडी, मुळें, कारणें, मध्यें.

सर्वनामांवरून साधलेलीं:—असें, तेव्हां, जेथें.

विशेषणांवरून साधलेलीं:—एकदां, शंभरदां, एकवार, एकवार, पुष्कळदां पहिल्यानें, मधल्यानें, इतक्यांत.

धातूंवरून साधलेलीं:—बसतां, बसतांना, बसून, बसत, बसावयास,

अव्ययांवरून साधलेलीं:—पुढेंपुढें, वरून, खालून पुढून, मागून, दुरून.

---

## धडा दुसरा.

### मराठी भाषेंत रूढ असलेले संस्कृत शब्द.

गद्य मराठी भाषेचें सध्या जें स्वरूप आहे, त्याहून शंभर वर्षांपूर्वी तें भिन्न होतें. म्हणजे मराठी भाषा आज ज्या प्रकारें बोलली व लिहिली जात आहे त्या प्रकारें ती शंभर वर्षांपूर्वी बोलली व लिहिली जात नव्हे, जुन्या काळीं लिहिलेली एखादी ऐतिहासिक बखर चाळून पाहिली असतां ही गोष्ट सहज लक्षांत येईल. शंभर वर्षांपूर्वीं मराठी भाषेचें जें स्वरूप होतें त्यापेक्षां दोनशें वर्षांपूर्वीं तिचें स्वरूप निराळेंच होतें. ज्ञानेश्वर हे मराठीभाषेंतले फार जुने कवि होते. त्यांचे वेळीं म्हणजे सुमारें सातशें वर्षांपूर्वी मराठी भाषेचें स्वरूप कसें होतें याची कल्पना ज्ञानेश्वरांच्या कांहीं ओव्या वाचल्यानें सहज येईल. ज्ञानेश्वराचे वेळचे मराठी भाषेंत फरक होत होत तिला सध्याचें स्वरूप प्राप्त झालें आहे.

ज्ञानेश्वरांचे पूर्वी सुमारें पांचशे वर्षें अगोदर मराठी भाषेला अस्तित्वच नव्हतें असें दिसतें. त्यावेळीं प्राकृत भाषा महाराष्ट्रामध्यें बोलली जात असे. यावरून असें म्हणण्यास हरकत नाहीं, कीं मराठी भाषा ही प्राकृत भाषेपासुनच बनलेली आहे. प्राकृत भाषा ही सुद्धां मुळची नसून ती संस्कृत भाषेपासुनच बनली आहे असें भाषाशास्त्रवेत्ते म्हणतात. संस्कृत भाषा मात्र दुसऱ्या कोणत्या भाषेपासून बनली असावी याचा भाषाशास्त्रवेत्त्यांना पत्ता लागलेला नाहीं.

याप्रमाणें मराठी भाषा हीं प्राकृतभाषेच्याद्वारा संस्कृत भाषेपासून उत्पन्न झालेली आहे; आणि आपले धार्मिक ग्रंथ संस्कृत भाषेमध्यें लिहिलें असल्यामुळें आपल्या धर्मांतील सर्व विद्वान लोक पूर्वी संस्कृत भाषेचा अभ्यास करणारे असत. यामुळें आपल्या मराठी भाषेमध्यें पुष्कळ संस्कृत शब्द आढळून येतात. मुसलमान लोकांचा अम्मल या देशावर स्थापित झाल्यापासून आरबी व फारशी भाषा बोलणारांचें मराठी भाषा बोलणारांशीं दळणवळण सुरू झालें. त्यामुळें व मुख्यतः त्यावेळीं त्या राजभाषा असल्यामुळें मराठी भाषेमध्यें फारशी व आरबी भाषेंतील बऱ्याच शब्दांचा * प्रवेश झाला.

---

*(१) फारशी भाषेंतुन मराठी भाषेंत आलेले कांहीं शब्द :—

गुन्हेगार, रोजगार, मेहेरबान, कलमदान, नेकी, खुली, दुरुस्ती, दोस्ती, बादशाही, फकिरी, खानगी, जनावर, हरामखोर, हलालखोर, दस्तैवज, शहाजादा, कारखाना, किताबखाना, दौलतखाना, अहमदाबाद, इत्यादि.

**इंग्रज लोकांचा अंमल** महाराष्ट्रावर सुरू झाल्यापासून इंग्रजी भाषेंतीलही कित्येक शब्द मराठी भाषेंत आले आहेत. जसें:—स्टेशन, पोस्ट, कार्ड, मास्तर, तिकीट, टेबल, नंबर, कमिश्नर, गव्हर्नर, इत्यादि.

महाराष्ट्राच्या सभोंवार असलेल्या प्रांतांतून चालणाऱ्या भाषा ज्या **गुजराथी, हिंदी व कानडी** त्यांतीलही कित्येक शब्द व वाक्प्रचार मराठींत आढळून येतात.

याप्रमाणें मराठी भाषेंतील कांहीं शब्द आरबी, फारशी, इंग्रजी कानडी, गुजराथी, हिंदी, वगैरे भाषांतून जरी आलेले असले तरी तीमध्यें संस्कृत शब्दांचाच विशेष भरणा आहे. म्हणून आपण संस्कृत शब्दांच्या व्युत्पत्तीचाच या धड्यामध्यें विचार करूं.

एकाच सिद्ध शब्दापासून त्याला निरनिराळे प्रत्यय लावून त्यापासून अनेक शब्द संस्कृत भाषेमध्यें साधले जातात; जसें:—कृ हा संस्कृतमधला एक धातु असून त्याचा अर्थ 'करणें' असा आहे, या एकाच धातूपासून **कर्ता, कर्म, कार्य, करणीय कृत्य, कर्तृत्व, कर्तव्य, कृत्रिम, क्रिया, कारण, करण, कर, उपकार, विकृति, अनुकरण, उपकर्ता, दुष्कर्म, सुकर,** हे व या सारखे आणखी कितीतरी शब्द बनवितां येतात. यांपैकीं उपसर्ग-घटित शब्दांतला उपसर्ग कोणता व मूळ शब्द कोणता हें आपल्याला सहज ओळखतां येईल. परंतु कृ धातूला कोणता प्रत्यय लागून व तो प्रत्यय लागतांना कृ धातूचे रूपामध्यें कसकसा फरक होऊन '**कर्ता, कर्म, कर्तव्य**' इत्यादि शब्द बनले हें मात्र ज्यांनीं संस्कृत भाषेच्या व्याकरणाचा अभ्यास केला नाहीं त्यांना सांगतां येणें कठीण आहे. परंतु ज्याला कृ धातूचा अर्थ माहिती असेल त्याला **कर्म, कर्ता, कर्तव्य,** वगैरे शब्द कृ धातूपासून बनले आहेत हें ते शब्द व कृ धातु या दोहोंचे स्वरूपामध्यें व अर्थामध्यें असलेल्या साम्यावरून सहज सांगतां येईल. इतकें आपल्याला अंदाजानें ओळखतां आलें म्हणजे पुरे आहे.

---

[१] आरबी भाषेंतून आलेले:—नजर, हकीम, मालक, मजबूत, लायक, राजी, काजी, तहसील तपशील, तसदी, मुसाफर, मोबदला, दरसाल, इस्लाम, मुत्सद्दी, इत्यादि. यांपैकीं कांहीं शब्द जसेच्या तसे आले आहेत व कांहीं मूळ शब्दांपासून अपभ्रंश होऊन आलेले आहेत.

खालीं कांहीं मूळ संस्कृत धातू व त्यांचेपासून झालेले निरनिराळे शब्द ह्यांचे पुढें दिले आहेत; त्यांचेमध्यें अर्थ व स्वरूप यांचे बाबतींत किती साम्य आहे तें पहा.

कथ् ( सांगणें ):—कथा, कथन, कथनीय, कथित.
गम् ( जाणें ):—गति, गमन, गम्य, गमनीय, अनुग, गन्ता.
दृश् ( पहाणें ): – दृष्टि, दर्शन, दर्शनीय, दृश्य, द्रष्टा, दर्शक, प्रदर्शन अदृष्ट, आदर्श.
वच् ( बोलणें ):—वाचा, वचन, उक्ति, वक्ता, वक्तृत्व, उक्त, वक्र.
दा ( देणें ):—दाता, दान, दत्त, देय, दातृत्व.
ज्ञा ( जाणणें ):—ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय, ज्ञातव्य, जिज्ञासा, विज्ञापना.
रम् ( रमणें ):—रमा, राम, रमणीय, रम्य, रममाण, विराम, रत, अनुरत.
भुज् ( भोजन करणें ):—भोजन, भोजनीय, भोक्ता भोग, भुक्त, बुभुक्षित.
स्तु ( स्तवणें ):—स्तुति, स्तोत्र, स्तवन, स्तुत्य, स्तवनीय, स्तुत, स्तव.
वृध् ( वाढणें ):—वृद्ध, वृद्धि, वार्धक्य, वर्धनीय, संवर्धन.
जन् ( उत्पन्न होणें ):—जन्म, जनक, जननी, जनिता, जाति, जात, जातक.
श्रु (ऐकणें):—श्रोता, श्रुति, श्रुत, श्रवण, श्राव्य श्रवणीय, श्रोत्र, (श्रोत्रेंद्रिय)
भाष् ( बोलणें ):—भाषा, भाषण, भाषित, संभाषण, भाष्य, (शांकरभाष्य)
बुध ( जाणणें ):—बुद्धि, बोध, बोधक.
भू ( होणें, असणें ):—भवन, भविष्य, भाव, भव, भूत, विभूति, भावना, भवितव्य, भूमि.

## अभ्यास.

(१) खालील संस्कृत धातूंपासून साधलेले तुम्हाला माहित असतील तितके शब्द सांगाः—

| | | |
|---|---|---|
| भक्ष् [ खाणें. ] | पूज् [ पूजा करणें. ] | निन्द् [ निंदा करणें. ] |
| पा [ पिणें. ] | गै [ गाणें. ] | बन्ध [ बांधणें. ] |
| नश् [ नाश पावणें ] | नी [ नेणें ] | नम् [ नमस्कार करणें. ] |
| नंद् [ आनंद पावणें. ] | वर्ष् [ पाऊस पडणें ] | त्यज् [ टाकून देणें. ] |
| मुच् [ मोकळा करणें. ] | शी [ निजणें. ] | लभ् [ मिळणें. ] |

रच् [ रचणें ] चुर् [ चोरणें ]. स्पृश् [ शिवणें ].
स्मृ [ आठवण करणें ]. धृ [ धारण करणें ]. ध्यै [ ध्यान करणें ].

(२) खालील साधित शब्दांपैकीं बहुतेक शब्द तुमच्या वाचनांत (विशेषतः कवितांतून) येऊन गेलेले आहेत; ते कोणत्या मूळ शब्दांपासून बनले असावे तें सांगा.

पांडव, कौरव, राघव, यादव, वासुदेव, नैषध, वैदर्भ, सौभद्र, सौमित्र, कौशिक, पौलस्त्य, पार्थ, धार्तराष्ट्र, गांगेय, राधेय, कौंतेय, द्रौपदेय.

पार्वती, जानकी, जान्हवी, भैमी, ( दमयंती ), वैदेही, ( सीता ), वैदर्भी, ( दमयन्ती ), द्रौपदी.

सौख्य, धैर्य, कौमार्य, पातिव्रत्य, चारित्र्य, सौभाग्य, (सुभग-चांगलें नशीब;) सौजन्य, तारुण्य, पावित्र्य, चापल्य, काठिण्य, दार्ढ्य, साफल्य, मालिन्य, गांभीर्य, बाल्य, शैथिल्य, वैगुण्य, नैपुण्य, क्रौर्य, चौर्य, सौंदर्य, कौटिल्य, औदार्य, कार्पण्य, मार्दव.

पौर्वात्य, पाश्चिमात्य, दाक्षिणात्य, सार्वभौम, शैव, वैष्णव, शैल, ऐतिहासिक, भौगोलिक, बौद्धिक, शारीरिक, मानसिक, धार्मिक, वैवाहिक, कौटुंबिक, नैतिक, औद्योगिक, ऐहिक, ( इह-येथें ), पारलौकिक, वैदिक, सैनिक.

(३) 'धनवान्' हा शब्द 'धन' शब्दाला 'वान्' [ संस्कृत 'वत्' ] हा प्रत्यय लागून झाला आहे. याप्रमाणें वान् प्रत्यय लागून झालेल्या साधित शब्दांचीं दहा उदाहरणें द्या.

(४) 'त्व' प्रत्यय [ प्रभुत्व ], लागून झालेलीं दहा भाववाचक नामें सांगा.

(५) 'धर्म' या नांवापासून जसें धर्मी हें नांव बनलें त्या प्रकारचीं आणखी उदाहरणें सांगा.

# प्रकरण दुसरें.

## समासविचार.

### धडा पहिला.

### समास म्हणजे काय?

खालीं डाव्या व उजव्या बाजूला लिहिलेल्या वाक्यांची तुलना करा.

| | |
|---|---|
| गजाननाला माझा नमस्कार असो. | गजाचें आनन [ तोंड ] आहे ज्याला त्याला [ गणपति नांवाच्या देवाला ] माझा नमस्कार असो. |
| मला साखरभात आवडतो. | मला साखर घालून केलेला भात आवडतो. |
| रामलक्ष्मण वनांत गेले. | राम आणि लक्ष्मण वनांत गेले. |
| तो राजगृहीं गेला. | तो राजाच्या गृहीं गेला. |

### निरीक्षण.

[ १ ] दोन्हीं बाजूंच्या वाक्यांचा अर्थ एकच आहे.

[ २ ] डाव्या बाजूच्या वाक्यांत जाड अक्षरांत लिहिलेल्या एकेच शब्दानें जेवढा अर्थ व्यक्त झाला आहे तेवढाच अर्थ व्यक्त करण्यासाठीं उजव्या बाजूच्या वाक्यांत पुष्कळ शब्द घालावे लागले आहेत.

[ ३ ] गज आणि आनन या दोन शब्दांत असलेला संबंध व्यक्त करून दाखविण्यासाठीं (गजा) 'चें आहे, ज्याला' हे शब्द उजव्या बाजूच्या वाक्यांत घालावे लागले आहेत. परंतु डाव्या बाजूच्या वाक्यांत या शब्दांचा लोप करून गज आणि आनन या दोन शब्दांमिळून गजानन असा एक शब्द केला आहे.

[ ४ ] याचप्रमाणें साखर आणि भात, राम आणि लक्ष्मण, राज आणि गृह या शब्दांमध्यें असलेले संबंध दाखविण्याकरितां उजव्या बाजूच्या वाक्यांत जे शब्द व प्रत्यय घातले आहेत त्यांचा डाव्या बाजूच्या वाक्य लोप होऊन साखरभात, रामलक्ष्मण राजगृह, असा एक एक शब्द झाला आहे.

(१) गजानन, साखरभात, रामलक्ष्मण, राजगृह अशा शब्दांना सामासिक शब्द असें नांव व्याकरणकारांनी दिलें आहे.

व्याख्या:-(१) दोन किंवा अधिक शब्दांमध्यें असलेला संबंध दाखविणाऱ्या शब्दांचा किंवा प्रत्ययांचा लोप होऊन त्या दोन किंवा अधिक शब्दांमिळून जेव्हां एकच शब्द बनतो तेव्हां त्या शब्दांचा समास झाला असें म्हणतात व त्या एका शब्दाला सामासिक शब्द असें म्हणतात.

(२) सामासिक शब्द ज्या दोन किंवा अधिक शब्दांमिळून बनलेला असतो त्या शब्दांना त्या समासांतील पदें असें म्हणतात.

उदा:—गजानन या सामासिक शब्दांतील गज आणि आनन हीं पदें होत. राजगृह यांतील राज आणि गृह, रामलक्ष्मण यांतील राम आणि लक्ष्मण हीं पदें होत.

राजगृह म्हणजे काय? राजा कीं गृह?
साखरभात म्हणजे काय ? साखर कीं भात?
रामलक्ष्मण म्हणजे काय ? राम कीं लक्ष्मण?
गजानन म्हणजे काय ? गज कीं आनन ?

राजगृह हें एक प्रकारचें घर आहे. तें साधें घर नसून राजाचें घर आहे. राजगृह या समासांत गृह हें मुख्य पद असून राज हें गौणपद आहे.

साखरभात हा एक प्रकारचा भात आहे. तो साधा भात नसून साखर घालून विशेष प्रकारें बनविलेला असा भात आहे. साखरभात या समासांतील प्रधान पद किंवा मुख्य पद भात हें असून साखर हें गौण पद आहे.

रामलक्ष्मण म्हणजे राम आणि लक्ष्मण दोघेही. रामलक्ष्मण या समासांमध्यें राम आणि लक्ष्मण हीं दोन्ही पदें मुख्यच आहेत.

गजानन म्हणजे कांहीं एक प्रकारचा गज म्हणजे हत्ती नाहीं. किंवा तें एक प्रकारचें आनन म्हणजे तोंडहि नव्हे. हत्तीचें तोंड ज्याला आहे तो म्हणजे गणपति नांवाचा देव असा गजानन शब्दाचा अर्थ आहे. गजानन या समासांतील गज आणि आनन हीं दोनही पदें गौण आहेत.

याप्रमाणें ( १ ) एक पद प्रधान असलेले, ( २ ) दोन्ही पदें प्रधान असलेले व ( ३ ) दोन्ही पदें गौण असलेले असे समासाचे तीन प्रकार होतात.

राजगृह व साखरभात या समासांत गृह आणि भात हीं पदें अनुक्रमें प्रधान आहेत, राजगृह यांतील राज हें पहिलें पद असून गृह हें दुसरें पद आहे, साखरभात यांतील साखर हें पहिलें पद असून भात हें दुसरें पद आहे. अशा समासांना तत्पुरुष समास असें म्हणतात.

व्याख्याः—( १ ) ज्या समासांतील एक पद प्रधान असून तें प्रायः दुसरें असतें त्या समासाला तत्पुरुष समास असें म्हणतात. जसें:—राजगृह, वनदेवता, जलबिंदु. महस्वाक्षर.

( २ ) ज्या समासांतील दोन्ही पदें मुख्य असतात त्या समासाला द्वंद्व समास असें म्हणतात, जसें:—रामलक्ष्मण, आईबापें, राधाकृष्ण.

( ३ ) ज्या समासांतील दोन्ही पदें गौण असतात त्या समासाला बहुव्रीहि समास असें म्हणतात. जसें:—गजानन, नीलकंठ, गरूडवाहन.

टीपः—या सामासिक शब्दांनीं समासांतील पदांनीं दर्शविलेल्या वस्तुचा बोध न होतां निराळयाच वस्तुचा बोध होतो.

| | |
|---|---|
| प्रत्येकानें यथाशक्ति दान करावें. | यांत यथाशक्ति या सबंध समासाला क्रियाविशेषणाचा अर्थ असून यथा (प्रमाणें ) हें मुख्य पद आहे. |
| भीष्म आमरण ब्रम्हचारी राहिला. | यांत आमरण या सबंध समासाला क्रियाविशेषणाचा अर्थ असून आ ( पर्यंत ) हें मुख्य पद आहे. |

यथाशक्ति, आमरण अशा समासांना अव्ययीभाव समास असें म्हणतात,

व्याख्याः—ज्या समासांतील पाहिलें पद प्रायः प्रधान असून सबंध सामासिक शब्दाला क्रियाविशेषणाचा अर्थ असतो त्या समासाला अव्ययीभाव समास असें म्हणतात.

## अभ्यास.

**खालील सामासिक शब्दांतील पदें ओळखून कोणतें पद प्रधान आहे तें सांगा.**

सृष्टिसौंदर्य, पशुपक्षी, दशमुख, वसंतोत्सव, शीतकाल, रामसीता, रघुकुल, लंबोदर, यथाशक्ति, स्वर्गारोहण, रामलक्ष्मण, गजानन, भालचंद्र, गुणावगुण, जलनिधि, मदांध, यतिवेष, नीलवर्ण, अनुरूप, मदमत्त, सूक्ष्मदृष्टि, जयापजय, ब्रह्माविष्णुमहेश.

### धडा दुसरा.

## विभक्तितत्पपुरुष व कर्मधारय समास.

तत्पुरुष समासांत दोन पदें असून त्यांतील एक मुख्य असतें, व तें प्रायः दुसरें असतें ही गोष्ट आपण मागील धड्यांत पाहिली. खालीं डाव्या व उजव्या बाजूला असलेल्या तत्पुरुषसमासाच्या उदाहरणांमध्यें काय फरक आहे तो सांगा.

| | |
|---|---|
| नील असें आकाश तें **नीलाकाश.** | जलाचा बिंदु तो **जलबिंदु.** |
| घनाप्रमाणें ( ढगाप्रमाणें ) श्याम ( काळा ) तो **घनश्याम.** | चोरापासुन भय तें **चोरभय.** |
| | कष्टानें साध्य तें **कष्टसाध्य.** |
| | वनांत वास तो **वनवास.** |
| भव ( संसार ) हाच कोणी एक सागर तो **भवसागर.** | रामास अर्पण तें **रामार्पण.** |

### निरीक्षण.

( १ ) दोन्ही **बाजूंच्या समासांतील** एक पद प्रधान असुन तें दुसरें आहे.

( २ ) डाव्या **बाजूच्या समासांतील** गौणपद हें एका उदाहरणामध्यें [ नीलाकाश ] मुख्य पदाचें **विशेषण** असुन दुसऱ्या दोन उदाहरणांमध्यें गौणपदाची मुख्य पदाला उपमा दिलेली आहे. अशा समासांना कर्मधारय समास असें म्हणतात.

( ३ ) उजव्या **बाजूच्या** समासांतील गौणपदाचा मुख्य पदाशीं असलेला संबंध गौण पदाची कोणती तरी विभक्ति करून दाखविला गेला आहे. अशा समासाला विभक्तितत्पुरुष समास असें म्हणतात.

व्याख्याः—[ १ ] ज्या तत्पुरुष समासांत गौणपद मुख्यपदाचें विशेषण असतें किंवा गौणपदाची मुख्य पदाला उपमा दिलेली असते त्याला कर्मधारय समास म्हणतात.

[ २ ] ज्या तत्पुरुष समासांत गौणपदाचा मुख्य पदाशीं असलेला संबंध विभक्तीचे योगानें दर्शविला जातो त्याला विभक्तितत्पुरुष समास असे म्हणतात; व ज्या विभक्तीनें तो संबंध दर्शविला असेल त्या विभक्तीचें त्या समासाला नांव देतात.

जसें:—जलबिंदु या समासांत जल या पदाचा बिंदु या पदाशीं असलेला संबंध जलाचा अशी षष्ठि विभक्ति करून दाखविला गेला; म्हणून जलबिंदु हें षष्ठितत्पुरुष समासाचें उदाहरण होय.

टीपः—जलबिंदु या समासांत जल आणि बिंदु अशीं दोन पदें आहेत. या पदांतील संबंध व्यक्त करावयाचा असल्यास 'जलाचा बिंदु" असें म्हणावें लागेल. समासाच्या पदांतील असलेला संबंध उघड करून दाखावणें या क्रियेला "विग्रह करणें" असें नांव आहे.

## अभ्यास.

[ १ ] खालीं विभक्तितत्पुरुष व कर्मधारय समासांचे विग्रह करून दाखविले आहेत त्याप्रमाणें त्यांचे पुढें दिलेल्या सामासिक शब्दांचे विग्रह करून दाखवा.

| सामासिक शब्द | विग्रह | समासाचें नांव. | अधिक उदाहरणें |
|---|---|---|---|
| बुधजन. | बुध असे जन ते बुधजन | कर्मधारय. | अल्पोपाय, ऱ्हस्वाक्षर, घोरवन, नीलकमळ, |
| द्विजदंड. | द्विजास दंड तो द्विजदंड | द्वितीया तत्पुरुष. | ग्रामप्राप्त. |
| कष्टसाध्य. | कष्टानें साध्य तें कष्टसाध्य. | तृतीया तत्पुरुष. | गुणहीन, कृष्णकृत, ईश्वरनिर्मित. |
| रामार्पण. | रामास अर्पण तें रामार्पण. | चतुर्थी तत्पुरुष. | कर्णकटु, परोपदेश, परपीडा. |
| चोरभय. | चोरापासून भय तें चोरभय. | पंचमी तत्पुरुष. | व्याघ्रभय, रोगमुक्त पंकोद्भित. |
| जलबिंदु | जलाचा बिंदु तो जलबिंदु. | षष्ठि तत्पुरुष. | रामसेवा, राष्ट्रहित, जनककन्या, दशरथनंदन. |
| वनवास. | वनांत वास तो वनवास. | सप्तमी तत्पुरुष. | रणशूर, क्रीडारत, कार्यतत्पर. |

(२) पुढील सामासिक शब्दांचे विग्रह करून समासांची नांवें सांगा.

| | | | |
|---|---|---|---|
| धनसंपन्न. | रत्नमाला. | सेवातत्पर. | अग्निभय. |
| दानशूर. | शौर्यहीन. | पोळपाट. | कुलोत्पन्न. |
| प्रेमान्ध. | जन्मान्ध. | मज्जनक. | स्वतात. |
| घरकोंबडा. | दीर्घोद्योग. | सदुपदेश. | सुजनवाक्य. |
| कार्यदक्ष. | मुखकमल. [मुख हेंच कोणी कमल] | | देवालय. |
| धर्मरत. | गीतामृत. [गीता हेंच कोणी अमृत] | | रविप्रभा. |
| पदवंदन. | कमलमुख. [कमलासारखें मुख] | | रघुश्रेष्ठ. |

(३) पुढील अर्थाचे सामासिक शब्द तयार करा व समासांचीं नांवें सांगा.

नखाचें अग्र, दयेचा घन, जन्मापासून दरिद्री, नृपानें रक्षित, मुनींत श्रेष्ठ, कृपानें संपन्न, हित असा उपदेश, कृष्णाची उपासना, जनकाची कुमारी, अश्रूंचे बिंदू, सूर्यानें प्रकाशित, मुख हाच कोणी चंद्र.

(४) दुसऱ्या आणि तिसऱ्या प्रश्नांत आलेल्या सामासिक शब्दांचा वाक्यांत उपयोग करून दाखवा.

(५) भाषांतर या शब्दाचा मूळचा अर्थ दुसरी भाषा असा असून त्याचा विग्रह अन्य (म्ह० दुसरी) अशी भाषा तें भाषांतर' असा करतात; हें अर्थातच कर्मधारय समासाचें उदाहरण आहे. याप्रमाणें खालील समासांचे विग्रह करा.

ग्रामान्तर, देशान्तर, वेषान्तर, स्थलान्तर, कालान्तर, ग्रहान्तर.

### धडा तिसरा.

## द्विगु, नञ्तत्पुरुष, उपपदतत्पुरुष, व अलुक् समास.

तत्पुरुष समासांतील गौणपद मुख्य पदाचें विशेषण असलें म्हणजे त्या समासाला कर्मधारय समास असें म्हणतात, ही गोष्ट आपण मागील धड्यांत पाहिली. पुढील पानावरील कोष्टकामध्यें कर्मधारय समासाचे दोन विशेष प्रकार दिले आहेत त्यांचें निरीक्षण करा.

| सामासिक शब्द. | विग्रह. | निरीक्षण. |
|---|---|---|
| त्रिभुवन. | त्रि म्हणजे तीन भुवनांचा समुदाय. | (१) या सामासिक शब्दांतील गौणपद संख्याविशेषण आहे. |
| पंचपाळें. | पांच पाळ्यांचा समुदाय | (२) सर्व समासाचा अर्थ समुदायवाचक आहे. अशा समासांना द्विगुसमास असें म्हणतात. |
| पंचारती. | पांच आरत्यांचा समुदाय. | |
| अविचार, | अ म्हणजे नव्हे जो विचार. | (१) गौणपद नकारवाचक आहे. |
| अरक्षित. | नव्हे जें रक्षित. | (२) अशा समासांना नञ् तत्पुरुषसमास असें म्हणतात. |
| अज्ञान. | नव्हे जें ज्ञान. | |
| अनादर [अन्+आदर] | नव्हे जो आदर. | |
| अनिष्ट. [अन्+इष्ट] | नव्हे जें इष्ट. | |

**व्याख्या:—( १ ) तत्पुरुष समासांतील गौणपद संख्याविशेषण असल्यास त्या समासाला द्विगु समास असें म्हणतात.**

**( २ ) तत्पुरुष समासांतील गौणपद नकारवाचक असल्यास त्या समासाला नञ्तत्पुरुष समास असें म्हणतात.**

तत्पुरुष समासांतील गौणपदाचा मुख्य पदाशीं असलेला संबंध विभक्तीनें दाखविला जात असेल तर त्या समासाला विभक्तितत्पुरुष समास म्हणतात हेंही आपण मागील धड्यांत पाहिलें आहे. पुढील कोष्टकामध्यें विभक्तितत्पुरुष समासाचे दोन विशेष प्रकार दिले आहेत त्यांचे निरीक्षण करा.

| सामासिक शब्द. | विग्रह. | निरीक्षण. |
|---|---|---|
| युधिष्ठिर | युधि (म्ह. युद्धांत) स्थिर तो युधि ही संस्कृतमध्यें युध् या शब्दाची सप्तमी आहे. | खरें पाहिलें असतां युधिष्ठिर व पंकेरुह यांस सप्तमी तत्पुरुष व परस्मैपद हा चतुर्थी तत्पुरुष समजावयास हरकत नाहीं परंतु या समासांमध्यें विभक्ति प्रत्ययांचा लोप झालेला नाहीं. अशा समासास अलुक् समास असें म्हणतात. |
| पंकेरुह | पंके (म्ह. पंकांत) रुह (म्ह वाढणारें) तें पंकेरुह. पंके ही संस्कृतमध्यें पंक या शब्दाची सप्तमी विभक्ति आहे. | |
| परस्मैपद | परस्मै (म्ह. दुसऱ्याकरितां) पद परस्मै ही संस्कृतामध्यें पर या शब्दाची चतुर्थी विभक्ति आहे. | |
| ग्रंथकार | ग्रंथ करणारा तो ग्रंथकार. | या उदाहरणांत प्रधानपद कृदन्त म्हणजे धातुसाधित आहे अशा समासास उपपदतत्पुरुष समास असें म्हणतात. |
| आगलाव्या | आग लावणारा तो आगलाव्या. | |
| मोळीविक्या | मोळी विकणारा तो मोळीविक्या. | |

व्याख्याः—(१) ज्या समासांतील गौण पदाला लागणाऱ्या विभक्तिप्रत्ययाचा लोप झालेला नसतो त्या समासाला अलुक् समास असें म्हणतात.

(२) ज्या समासांतील प्रधानपद धातुसाधित असतें त्या समासाला उपपदतत्पुरुष समास असें म्हणतात.

## अभ्यास.

(१) पुढील समासांतील विग्रह करून समासांचीं नांवें सांगा, व कारणें द्या.

अविश्वास. लांकूडतोड्या. टीकाकार. मर्मभेदी
अनर्थ (अन्+अर्थ). अस्पष्ट सरसिज (सरसि=तळ्यांत, ज=जन्मलेलें).
बाजारपारखी. कर्तरिप्रयोग. काळघोटया. अनीति.
नवरात्र. अनास्था. सामान्य. सप्ताह.

(२) पुढील अर्थांचे सामासिक शब्द तयार करा.

अंबु ( म्हणजे पाणी ) देतो तो. नव्हे जो भव तो. नव्हते जे उदार ते नव्हे जें योग्य तें. नाहीं जें पसंत तें, भू (पृथ्वी) ला पावतो तो. वनांत चरणारा (चालणारा) तो. गाई राखतो तो. लाकूड तोडतो तो. हाव खातो तो दोनदां जन्मलेला तो.

[ ३ ] पहिल्या व दुसऱ्या प्रश्नांतील सामासिक शब्दांचा वाक्यांत उपयोग करा.

## धडा चवथा.

## बहुव्रीहि समास.

ज्या समासांतील दोन्हीं पदें गौण असून सबंध समासाला दोन्हीं पदांपैकीं एकाचाही अर्थ नसून तिसऱ्याच एखाद्या वस्तूचा अर्थ असतो त्या समासाला बहुव्रीहि समास म्हणतात. ही गोष्ट आपण पहिल्या धड्यांत पाहिलीच आहे.

खालील कोष्टकामध्यें बहुव्रीहि समासाचे विग्रह करून दाखविले आहेत. त्यामध्यें सामासिक शब्दांतील पदांच्या कोणत्या विभक्ति आहेत तें पहा.

| सामासिक शब्द | विग्रह. | पहिल्या पदाची विभक्ति | दुसऱ्या पदाची विभक्ति |
|---|---|---|---|
| १ जितेंद्रिय | जित आहेत इंद्रियें ज्यानें तो जितेंद्रिय. | प्रथमा | प्रथमा. |
| २ लंबोदर. | लंब आहे उदर ज्याचें तो लंबोदर (गणपति) | प्रथमा | प्रथमा. |
| ३ दशमुख. | दश आहेत मुखें ज्याला तो दशमुख (रावण) | प्रथमा. | प्रथमा. |
| ४ गजानन. | गजाचें आहे आनन ज्याला तो गजानन. | षष्ठी | प्रथमा. |
| ५ भालचंद्र. | भालीं आहे चंद्र ज्याच्या तो भालचंद्र (म्ह शंकर) | सप्तमी. | प्रथमा |
| ६ चक्रपाणि. | चक्र आहे पाणींत (हातांत) ज्याच्या तो चक्रपाणी. (विष्णु) | प्रथमा. | सप्तमी. |

वरील कोष्टकांत पहिल्या तीन उदाहरणांमध्यें विग्रह करतांना दोन्ही पदांच्या समान म्हणजे सारख्या विभक्ति आहेत, अशा बहुव्रीहि समासास **समानाधिकरण बहुव्रीहि** असें नांव आहे.

शेवटच्या तीन उदाहरणांमध्यें विग्रह करतांना दोन्ही पदांच्या विभक्ति सारख्या नसून त्या भिन्न भिन्न आहेत. हीं **व्यधिकरण बहुव्रीहि** समासाचीं उदाहरणें होत.

व्याख्याः-[ १ ] ज्या बहुव्रीहि समासाला विग्रह करतांना समासांतील पदांच्या समान विभक्ति योजाव्या लागतात त्या बहुव्रीहि समासाला समानाधिकरण बहुव्रीहि असें म्हणतात.

[ २ ] ज्या बहुव्रीहि समासाचा विग्रह करतांना समासांतील पदांच्या भिन्न विभक्ति योजाव्या लागतात त्या बहुव्रीहि समासाला व्यधिकरण बहुव्रीहि असें म्हणतात.

## अभ्यास.

[ ३ ] खालीं कांहीं सामासिक शब्दांचें विग्रह दिले आहत. त्यावरून सामासिक शब्द सांगा. व ते कोणत्या बहुव्रीहि समासाचीं उदाहरणें आहेत तेंही सांगा.

( १ ) एक आहे दन्त ज्याला तो.
( २ ) त्यक्त ( टाकलेलीं )आहेत आयुधें ज्यानें तो.
( ३ ) शूल आहे पाणींत ज्याच्या तो.
( ४ ) मान हेंच आहे धन ज्याचें तो.
( ५ ) अष्ट आहेत भुजा (हात) जिला ती.
( ६ ) मंद आहे भाग्य ज्याचें तो.
( ७ ) पद्म आहे नाभीवर ज्याच्या तो.
( ८ ) कमला प्रमाणें आहेत नेत्र ज्याचें तो.
( ९ ) वक्र आहे तुंड ( तोंड ) ज्याचें तो.
( १० ) कलह आहे प्रिय ज्याला तो.

[ ११ ] नील आहे कंठ ज्याचा तो.
[ १२ ] लंब आहेत कर्ण ज्याचे तो.
[ १३ ] सहस्र आहेत कर ( किरण ) ज्याला तो.
[ १४ ] चंद्र आहे मौलीवर ( डोक्यावर ) ज्याच्या तो.
[ १५ ] भक्ति आहे प्रिय ज्याला तो.
[ १६ ] चंड ( प्रखर ) आहेत अंशु ( किरण ) ज्याचे तो

( २ ) पुढील बहुव्रीहि समासांचे विग्रह करून ते समानाधिकरण बहुव्रीहि आहेत की व्यधिकरण बहुव्रीहि आहेत ते सांगा.

( १ ) दीर्घबहु. ( २ ) नादप्रिय. ( ३ ) चंद्रशेखर.
( ४ ) श्यामवर्ण. ( ५ ) दुजमजी. ( ६ ) मंदबुद्धि
( ७ ) भग्नहृदय. ( ८ ) त्रिनयन. ( ९ ) हृतदर्प.
( १० ) गानप्रिय. ( ११ ) लोकमान्या. ( १२ ) लोकटांग्या.
( १३ ) हिमांशु. ( १४ ) स्वान्त. ( १५ ) व्यंजनान्त.
( १६ ) भावप्रधान. ( १७ ) धर्मांदि. ( १८ ) कमलनयना.
( १९ ) कोमलांगी. ( २० ) कृष्णाभिम्न. ( २१ ) पीतांबर.

---

## नञ्बहुव्रीहि आणि सहबहुव्रीहि समास.

ज्या समासांतील दोन्ही पदें गौण असून संबंध समासाला दोन्ही पदांनीं दर्शविलेल्या अर्थाव्यतिरिक्त निराळाच अर्थ असतो त्या समासाला बहुव्रीहि समास असें म्हणतात, ही गोष्ट आपण मागील धड्यांत पाहिलीच आहे, त्याचे बहुव्रीहि समासाचे दोन विशेष प्रकार दिले आहेत, त्यांचें निरीक्षण करा,

| सामासिक शब्द. | विग्रह. | निरीक्षण. |
|---|---|---|
| (१) अनंत (अन्+अंत) | अ म्ह. नाहीं ज्याला अंत तो अनंत | या बहुव्रीहि समासांतील पहिलें पद नकारार्थक आहे. अशा समासांना नञ् बहुव्रीहि समास असें म्हणतात. |
| (२) अपार. | अ म्ह. नाहीं ज्याला पार तो अपार | |
| (३) अनुपम (अन्+उपमा) | नाहीं ज्याला उपमा ते अनुपम ( सुख ) | |
| (१) सवत्स. | वत्सासहित ती सवत्स ( गाय ) | या बहुव्रीहि समासांतील पहिलें पद सहित या अर्थाचें आहे अशा समासांना सह-बहुव्रीहि समास असें म्हणतात. |
| (२) साकार. | आकारासहित तो साकार ( परमेश्वर ) | |
| (३) सप्रेम. | प्रेमासहित तो सप्रेम. (नमस्कार ). | |

व्याख्याः—[ १ ] ज्या बहुव्रीहि समासाचें एक पद नकारार्थक असतें त्या बहुव्रीहि समासाला नञ् बहुव्रीहि समास असें म्हणतात.

[२] ज्या बहुव्रीहि समासाचें एक पद सहित या अर्थाचें असतें त्या समासाला सहबहुव्रीहि समास असें म्हणतात.

## अभ्यास.

[ १ ] खालीं सहबहुव्रीहि व नञ्बहुव्रीहि समासांचीं उदाहरणें दिलीं आहेत; त्यांचा विग्रह करा.

सहबहुव्रीहि—सकाम, ससैन्य, सविस्तर, सप्रभाण, सविध, सकुटुंब, सरस, साभिनय, सधन.

नञ्बहुव्रीहि—अनिद्य, अनादि, अनाम, अव्यय, अकर्मक, अकर्तृक, अतुल अकंटक, अमर्याद, असार, अनन्य.

[ २ ] वरील शब्दांचा वाक्यांत उपयोग करून दाखवा.

## तत्पुरुष समास व बहुव्रीहि समास.

एकच सामासिक शब्द निरनिराळ्या वाक्यांत; त्यांच्या होणाऱ्या अर्थावरून तत्पुरुष अथवा बहुव्रीहि समास होऊं शकतो. अमुक एक,

शब्द तत्पुरुष समास आहे कीं बहुव्रीहि आहे हें ओळखण्याकरितां त्यांतील पदें कशीं आहेत तें पाहिलें पाहिजे. एक प्रधान व एक पद गौण असेल तर तो तत्पुरुष समास असतो आणि दोन्ही पदें गौण असतील तर त्याला बहुव्रीहि समास असें नांव दिलें पाहिजे. खालील वाक्यांत एकाच शब्दाचा तत्पुरुष व बहुव्रीहि समासाप्रमाणें उपयोग करून दाखविला आहे.

**तत्पुरुष.**

त्याचें अज्ञान पाहून आम्हाला हंसें कोसळलें.

गतवैभवाच्या निव्वळ गोष्टी सांगून काय उपयोग ?

गौरवर्ण व कृष्णवर्ण यांजमध्यें कितो अंतर आहे ?

रावणाला दशाननें कशीं प्राप्त झालीं हें तुला माहित आहे काय ?

जितशत्रू वर मान काढूं नये म्हणून प्रत्येक जेत्या राष्ट्राची खटपट असते.

मुलांनो, कोणत्या पक्षाला नीलकंठ असतो ?

हें न्यस्तायुध कोणाचें असावें बरें ?

त्या ठिकाणीं वृक्षांच्या गलितपर्णांचे थरांवर थर पडले होते.

देवीला अष्टभुजा फारच शोभा देतात.

मंदबुद्धीला घृताची उपमा देतात.

**बहुव्रीहि.**

तो अद्यापि अज्ञान मूल आहे

गतवैभव बनलों मी मित्रा.

इंग्लंडांतील लोक गौरवर्ण असून आफ्रिकेंतील लोक कृष्णवर्ण आहेत.

दशाननानें खडतर तपश्चर्या करून शंकरास प्रसन्न केलें.

जितशत्रू इंद्रजिताने रावणाचें समाधान केलें.

त्या नीलकंठास आमचा नमस्कार असो.

धर्मराजानें न्यस्तायुध 'संचिपाहिजे समज' असें म्हटलें.

गलितपर्ण वृक्ष पाहून कोणाचें मन प्रसन्न होईल ?

आम्ही अष्टभुजा देवीची उपासना करतों.

गणू मंदबुद्धि आहे.

टीप — तत्पुरुष किंवा बहुव्रीही समासांचा विग्रह करतांना कधीं कधीं दोन पदांशिवाय आणखी एखादें पद घालावें लागतें. अशा समासांना मध्यमपदलोपी तत्पुरुष किंवा मध्यमपदलोपी बहुव्रीही अशीं नावें देतात; जसें :—(१) साखरेनें युक्त असा तो साखरभात. ( मध्यमपदलोपी तत्पुरुष ) (२) मेघाच्या वर्णाप्रमाणें आहे वर्ण ज्याचा तो मेघवर्ण. (मध्यमपदलोपी बहुव्रीहि. )

अभ्यास.

**कांहीं मध्यमपदलोपी समासांचीं उदाहरण दिलीं आहेत. त्याचे विग्रह करून कोणत्या पदाचा समासामध्यें लोप झाला तें सांगा.**

आलुवोंह, बटाटाभात, हरिणाक्षी, मेघनाद, गजगति, परंतुरामायण, आगगाडी, ताकभात, पुरणपोळी, विद्युत्प्रभ, बाईलबुद्धि, मनोजय, चुलतामामा.

---

## धडा सातवा.

## द्वंद्व आणि अव्ययीभाव समास.

ज्या समासांतील दोन्ही अथवा अधिक पदें प्रधान असतात त्या समासास द्वंद्व समास असें म्हणतात; जसें:—रामलक्ष्मण म्हणजे राम आणि लक्ष्मण.

द्वंद्व समासाचे **इतरेतर द्वंद्व, वैकल्पिक** द्वंद्व आणि **समाहार द्वंद्व** असे तीन उपभेद मानिले आहेत.

(१) ज्या द्वंद्व समासांतील पदें विग्रह करतांना आणि व या समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययांनीं जोडलीं जातात त्यास इतरेतर द्वंद्व असें म्हणतात; **जसें:-रामलक्ष्मण, कौरवपांडव, लक्ष्मीनारायण, ब्रह्माविष्णुमहेश.**

(२) ज्या द्वंद्व समासांतील पदें विग्रह करतांना किंवा, अथवा या विकल्पबोधक उभयान्वयी अव्ययांनीं जोडलीं जातात त्यास वैकल्पिक द्वंद्व असें म्हणतात; जसें:—सत्य किंवा असत्य सत्यासत्य; पापपुण्य, पांचसहा.

(३) ज्या द्वंद्व समासांत पदांनीं दर्शविलेल्या वस्तूंचाच केवळ बोध होत नसून त्यांच्यासारख्या इतर वस्तूंचाही सामासिक शब्दाच्या अर्थांत समावेश होतो त्याला समाहार द्वंद्व असें म्हणतात; जसें:-भाजीभाकरी याचा विग्रह भाजी

आणि भाकरी असा न होतां, भाजी,भाकरी आणि त्याच प्रकारच्या इतर वस्तु असा होतो,इतर उदाहरणें:–आंथरूणपांघरूण;शेतमळा; घर दार;कोळीमाळी.

अव्ययीभाव समासांतील प्रथम पद प्रायः अव्यय असून. सबंध समासाला क्रियाविशेषणाचा अर्थ येतो ही गोष्ट आपण समासप्रकरणाच्या पहिल्या धड्यांत पाहिलीच आहे. खाली कांहीं अव्ययीभाव समासांचे विग्रह करून दाखविले आहेत.

| विग्रह. | सामासिक शब्द. |
|---|---|
| मरणापर्यंत | आमरण, ( आ म्ह. पर्यंत ) |
| जन्मा पासून | आजन्म ( आ म्ह. पासून ) |
| प्रत्येक दिवशीं | दररोज. |
| दर घटकेला | घडिघडी. |
| दर महिन्याला | दरमहा. |

## अभ्यास.

(क) पुढील अर्थांचे सामासिक शब्द सांगा व समास ओळखा.

[१] वैश्य आणि शुद्र. [२] सुख अथवा दुःख [३] बहीण आणि भाऊ [४] घर, दार, वगैरे. [५] सुंठ आणि साखर. [६] तीन अथवा चार. [७] खरे आणि खोटें. [८) लाकूड, फाटा वगैरे. [९] विटी आणि दांडू. [१०] एक आणि तीस [११] पथ्य अथवा अपथ्य. [१२] जीव, जंतु वगैरे.

(ख) पुढील समासांचे विग्रह करून नांवें सांगा.

[१] सातवा आठवा. [२] केरकचरा [३] दहीभात. [४] आडमुडुप. [५] राग द्वेष. [६] नकुलसहदेव. [७] मानपान. [८] सुरासुर. [९] आकाशपाताळ. [१०] कोळीमाळी. [११] देवदानव. [१२]पांच पन्नास.

(ग) पुढील अव्ययीभाव समासांचे विग्रह करा.

यथाशक्ति, आकर्ण, अनुरूप, बरहुकूम, दरशेकडा, दरमहा, यथामति,

## समास सोडविणें.

समास कसे सोडवावे त्याचा नमुना म्हणून खालील कवितांतील कांहीं सामासिक शब्दांचे विग्रह करून दाखविले आहेत.

[ १ ] पितामह वदे तथा, "प्रबळ तूं पृथानंदना !
रमेश गमे सारथी चतुर वागवी स्यंदना,
स्वयें गतवयस्क मी सरस वीर तूं रे नवा,
भिडे रणधुरंधरा जय घडो तुला वा न वा,"—वामनपंडित.

**पृथानंदन** ( पृथा+नंदन ) पृथेचा नंदन, पृथानंदन ( षष्ठितत्पुरुष समास. )
**रमेश** ( रमा+ईश ) रमेचा ईश. रमेश ( षष्ठितत्पुरुष समास. )
**गतवयस्क** ( गत+वयस् ) गत(गेलेलें) आहे वय ज्याचें तो गतवयस्क( बहुव्रीहि स. )
**सरस** ( स+रस ) रसासहित, सरस ( नव्या रसाचा, ) सहबहुव्रीहि समास.
**रणधुरंधर** ( रण+धुर्+धर ) रणाचा धुर् ( धुरा जूं ) रणधुर( षष्ठितत्पुरुष )
रणधुर् धरतो तो रणधुरंधर ( उपपदतत्पुरुष. )

१ सदाश्रितपदा, सदाशिवमनोविनोदास्पदा,
स्वदासवशमानसा, कलिमलांतका, कामदा,
सदान्यजनसद्गुणा, प्रशमितामितासन्मदा,
मशारदि नंदनाचुप्रभा नमस्ते सदा.

**सदाश्रितपदा** ( सत्+आश्रित+पद )
सत् म्हणजे चांगल्या लोकांनी आश्रित तें सदाश्रित ( तृ. त. स. )
सदाश्रित आहेत पदें ज्याचीं तो सदाश्रितपद ( बहुव्रीहि स. )
**सदाशिवमनोविनोदास्पद** ( सदाशिव+मनस्+विनोद+आस्पाद )
सदाशिवाचें मनस्, सदाशिवमनस् ( ष. त. स. )
सदाशिवमनाचा विनोद, सदाशिवमनोविनोद ( ष. त. स. )
सदाशिवमनोविनोदाचें आस्पद ( ठिकाण ), सदाशिवमनोविनोदास्पद( ष. त. स. )
**स्वदासवशमानस** ( स्व+दास+वश+मानस )
स्व म्ह. आपला दास, स्वदास, कर्मधारय समास.
स्वदासाच्या वश ,स्वदासवश ( च. त. स )
स्वदासवश आहे मानस ज्याचें तो स्वदासवशमानस (बहुव्रीहि समास)
**कलिमलांतक** ( कलि+मल+अंतक )
कलीचा मळ तो कलिमल ( कलियुगांतील पाप. ) ( ष. त. स. )
कलिमलाचा अंतक तो कलिमलांतक ( ष. त. स. )

कामद [ काम+द ]

काम [ इच्छित वस्तु ] जो देतो तो कामद. [ उपपद तत्पुरुष स. ]

वदान्यदूजनसद्गुरु [ वदान्य+जन+सत्+गुरु ]

वदान्य [ म्ह. उदार ] जन, वदान्यजन, [ क. धा. स. ]

सत् [ चांगला ] गुरु, सद्गुरु. [ क. धा. स. ]

वदान्यजनांचा सद्गुरु, वदान्यजनसद्गुरु. [ ष. त. स. ]

प्रशमितामितासन्मद [ प्रशमित+अ+मित+सत् मद ]

नव्हते जे मित [ मोजलेले ] ते अमित. [म्ह. अगणित ] [ नञ्तत्पुरुष ]

नव्हते जे सत् ते असत् [नञ्तत्पुरुष समास ]

अमित असत् अमितासत् [ क. धा. स. ]

अमितासतांचा मद अमितासन्मद [ ष. त. स. ]

प्रशमित [म्ह. शांत केलेला] आहे अमितासन्मद ज्यानें तो प्रशमितामितासन्मद

गदारिदरनंदकांबुजधर [ गदा+अरि+दर+नंदक +अंबु+ज+धर ]

अंबु ( म्ह पाणी पासून जन्मलेलें अंबुज म्ह. कमल. (उपपद .त. स, )
गदा आणि अरि ( सुदर्शन चक्र ) आणि दर ( शंख ) आणि नंदक या नांवाचें ( खड्ग ) आणि अंबुज, गदारिदरनंदकांबुजधर, ( द्वंद्व समास. )

गदारिदरनंदकांबुज धारण करतो तो गदारिदरनंदकांबुजधर. ( उपपद त स. )

## परिशिष्ट पहिलें.

### कवितेंतील व्याकरणविशेष

मराठी पद्य भाषेंतील शब्दांच्या जाती आठच असल्या तरी त्यांना विकार मात्र भिन्न प्रकारें भिन्न नियमांनीं होतात. या नियमांपैकीं कांहीं नियम खालीं उदाहरणासहित दिले आहेत. तसलींच इतर उदाहरणें विद्यार्थ्यांनीं कवितांतून शोधून काढावीं, व त्यांशिवाय इतर नियम त्यांना आढळून आल्यास तेही त्यांनीं लक्षात ठेवावें.

### नामांचें विकरण.

नामांना लिंग, वचन व विभक्ति असे तीन प्रकारांचे विकार होतात, गद्य भाषेंतील नामांना लिंग व वचन या विकारांचे बाबतींत जे नियम लागू आहेत तेच कवितेंतील भाषेच्या नामांना बहुतेक लागू

पडतात; परंतु गद्य भाषेंत नामांना जे विभक्तिप्रत्यय लागतात त्यांशिवाय आणखी कांहीं निराळे प्रत्यय कवितेंत नामांना लागतात; त्यांचें खालीं विवरण केलें आहे.

**प्रथमाः**—गद्य भाषेंत शब्दांचें मूळ रूपच प्रथमेच्या एकवचनीं येतें; परंतु कवितेमध्यें ऊ, ओ, हे प्रत्ययही मूळ रूपाला प्रथमा विभक्तित कधीं कधीं लावलेले दिसून येतात, जसें:—

(१) देह जावो अथवा राहो। पांडुरंगीं दृढ भावो। तुकाराम.

(२) नाना जाती पुष्पमाळा। गणित नाहीं परिमळा।
नैवेद्य तांबूलादि सोहळा। करूनि पुजिला नारदू॥ १॥
मुक्तेश्वर, हरिश्चंद्राख्यान.

**तृतीयाः**—गद्य भाषेमध्यें या विभक्तीचे एकवचनीं नें, शीं, व अनेकवचनीं नीं, शीं, हे प्रत्यय आहेत; परंतु कवितेमध्यें याशिवाय एकवचनीं एं व अनेकवचनी ईं, हीं, हेही प्रत्यय कित्येक ठिकाणीं लागतात; जसें:—

(१) बापरे तुज राजेंद्रें कथिलें आतां करूं नको उशिर। मोरोपंत.

(२) ऐसा तो गुण कोणता खलजनीं नाहींच जो निंदिला। वामन.

पुष्पांहीं पल्लवांहीं विविध तरुवरां सर्वदा भूषवी जो। कृ. शा. चिपळूणकर.

**चतुर्थीः**—गद्य भाषेंत या विभक्तीचे स, ला, व स, ला, ना हे प्रत्यय आहेत; कवितेमध्यें याशिवाय तें हा प्रत्यय उभयवचनीं लागतो. जसें:—

(१) मळे मिळेना पय वासुरांतें। आश्चर्य वाटे गगनीं सुरांतें। वामन.

(२) वदवत नसे परिमितें सांग सख्या तूं तदीय माहिम्यातें। मोरोपंत.

**पंचमीः**—ऊन, हून हे पंचमी विभक्तीचे गद्य भाषेंतील प्रत्यय आहेत; कवितेमध्यें याच प्रत्ययांचीं हुनी, हूनि, हुनीं, हूनिं, अशीं रूपें वृत्ताच्या सोईकरितां केलेलीं दिसून येतात; जसें:—

(१) कथसुरभि या भव्या स्वजनांहुनी वाटतो। मोरोपंत.

(२) मोठें राजशिराहुनी बहु असतें काय दासकापद तें। मोरोपंत

**षष्ठीः**—या विभक्तीचे चा, ची, चें, चे, च्या, चीं, हे प्रत्यय गद्य भाषेंतील असून कवितेमध्येंही तेच आहेत. च्या या रूपाऐवजीं चिया, चीया अशीं रूपें वृत्ताच्या सोईकरितां कवितेमध्यें घालतात; जसें:—

व्या. हि. पु. २८

( २ ) समर्थांचिया घरचें श्वान । त्यास सर्वही देती मान । व्यंकटेशस्तोत्र.

( ३ ) तूं जाणोसि मनमोहना । मी आतां न ठेवीं आपुल्या प्राणा ।
माझीयां विशाळ्या राजीवनयना । मनरंजना श्रीहरी ॥-श्रीधर.

सप्तमीः—या विभक्तिचे त व ई हे गद्य भाषेंतील प्रत्यय आहेत यांपैकीं त हा प्रत्यय सगळ्या नामांना लागतो व ई हा प्रत्यय फक्त कांहीं थोड्याशा नामांना लागतो; परंतु कवितेमध्यें ई हा प्रत्यय वाटेल त्या नामाला लागून शिवाय आं हा प्रत्ययही लागलेला आढळतो. जसें:—

( १ ) पटुत्व सकलेंद्रियीं, मनुजता, सुवंशीं जनीं । - मोरोपंत.

( २ ) मूर्वे हळूच धरिला कलहंस पायीं ।- रघुनाथ पंडीत.

( ३ ) उत्तर म्हणे नको गे पायां पडतों वृहन्नडे सोड ।- मोरोपंत.

( ४ ) गुंफी सत्कुसुमें शिरीं सुरुचिरा माळा गळां अर्पुनी ।- मोरोपंत.

## विशेषणांचे विकार.

गद्य मराठी भाषेंत आकारान्त विशेषणांखेरिज इतर विशेषणांना विकार होत नाहींत; आकारान्त विशेषणाला मात्र पुढील नामाचे लिंग वचनाप्रमाणें विकार होतात व पुढील नामाला विभक्तिप्रत्यय अथवा शब्दयोगी अव्यय लागलें असतां आकरान्त विशेणषाचें सामान्यरूप होतें. कवितेमध्यें कोणत्याही विशेषणाला त्याचे पुढील नामाच्या लिंगवचनविभक्तीस अनुसरून ( संस्कृत भाषेंतील नियमास अनुसरून ) विकार होतात, जसें:—

( १ ) जावें न क्षुधितें त्वा येउनियां आमुच्या अगारा या ।- मोरोपंत.

( २ ) अत्युच्चीं पाहिं थोरहो विघडतो हा बोल आहे खरा ।- कृ. शा. चि.

( ३ ) स्तब्ध होति लिखितें जशिं चित्रें । वेणुच्या ध्वनिरसींचि विचित्रें ।वामन

( ४ ) माझे कुळींचीं दैवतें । पाहों जातां असंख्यातें ।- तुकाराम.

( ५ ) कृष्णासि कृष्णपद सक्तिविशारदानें ।-
तें स्वर्गपुष्प दिधलें मुनिनारदानें ।- वामन.

## धातूंचें विकरण.

गद्य भाषेंत धातूंना जे आख्याताचे व कृदन्ताचे प्रत्यय लागतात तेच कवितेंतील भाषेंत लागतात; मात्र वृत्ताच्या सोईकरितां कवी ऱ्हस्वदीर्घामध्यें फरक करितात. यांचीं उदाहरणें कोणत्याही दहा बारा कविता वाचल्या असतां दिसून येतील.

### अभ्यास.

[ १ ] भाषेंमध्यें ई आख्यातानें विशेषेंकरून रीतिभूतकाळाचा व क्वचित वर्तमान काळाचा अर्थ दर्शविला जातो. परंतु कवितेमध्यें वर्तमान, भूत, भविष्य यापैकीं कोणताही अर्थ ई आख्यातानें दर्शविण्याची चाल आहे. केवळ संदर्भावरून ई आख्याताचा अर्थ कवितेंत ओळखावा लागतो. ई आख्यातानें कवितेमध्यें दर्शविल्या जाणाऱ्या निरनिराळया अर्थांचीं कांहीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत.

#### वर्तमानकाळ.

( १ ) कांहीं गोड फुलें सदा विहरती स्वर्गांगनांच्या शिरीं ।– गोविंदाग्रज
( २ ) महापुरें झाडें जाती तेथें लव्हाळे राहती । – तुकाराम,
( ३ ) मन्मतिदरींत न शिरे कामतगज विवेकहरि जागे । — मोरोपंत

#### भूतकाळ.

( १ ) कौशिक अनुगांसि म्हणे सोडा हो धेनु ही चला हांका । – मोरोपंत.
( २ ) नेता बळेंचि धांवत येउनि ती मुनिपुढें उभी राहे ।
आणूनि लोचनीं जळ बहुदीनसें मुखाकडे पाहे ॥ १ ॥ – मोरोपंत.
( ३ ) कोणि जन विकी तुळिता तराजे । - रघुनाथपंडित.
[ या ठिकाणीं विकी या ई आख्यातानें विकीत होता असा अपूर्ण भूतकाळाचा अर्थ दर्शविला आहे. ]

[ २ ] गद्यभाषेमध्यें द्वितीय पुरुषी एकवचनी आज्ञार्थ दर्शविण्याकरितां बोल चाल, ये, जा हीं रूपें वापरतात; परंतु कवितेमध्यें बोलें, चालें, येईं जाईं अशीं रूपेंही आढळून येतात. जसें:—

( १ ) तोडीं मस्तक पडो चरणीं या । – वामन.

(२) तया इंद्रा करी घरीं। अथवा तयाचे शेजारीं।
नांदे जो तेजोनिधी भारी। त्याही वरी राजसे ॥१॥—रघुनाथपंडित.

(३) भिडे रणधुरंधरा जय घडो सुखें वा न वा।—वामनपंडित.

[३] धातुला प्रत्यय लावण्यापूर्वी ज. हें अक्षर लागलेलें कवितेमध्यें आढळून येतें. जसें:—

नित्य पोटीं वडवाग्नि पेट घेतो। सागरानें तो काय सांगिजेतो *।
रघुनाथपंडित.

[४] ऊनकृदन्तातील ऊन या प्रत्ययामध्यें वृत्ताच्या सोईकरितां कवि ऊनि, ऊनी, आनी, ऊनियां ओनियां. असे निरनिराळे फेरफार करितात.

## कवींचें निरंकुशत्व.

गद्य भाषेतील विकरणापेक्षां कवितेतील शब्दाचें विकरण निराळें असतें हें वरील उदाहरणांवरून दिसून येईल, असे होण्याला दोन कारणें आहेत. पहिलें कारण म्हटलें म्हणजे कवितेतील भाषा जुनी असते व नवीन कविपुष्कळ आपल्या कवितेमध्यें त्या भाषेचें अनुकरण करितात हें होय, आणि दुसरें कारण असें आहे कीं. वृत्त जमविण्याकरितां कवींनी शब्दाचे रूपामध्यें थोडाबहुत फेरफार करावा लागतो, ही सवलत जर कवींनीं घेतली नसती तर निरनिराळ्या वृत्तांत कविता रचणें त्यांना कठीण झालें असतें अशा प्रकारची जी सवलत कवी लोक घेतात तिला " कवींचें निरंकुशत्व " असें नांव आहे,

## परिशिष्ट.

### मराठी भाषेतील ऱ्हस्वदीर्घप्रकरण.

**इकार अथवा उकार ऱ्हस्व कोठें लिहावा आणि दीर्घ कोठें लिहावा?**

वरील प्रश्नाचे उत्तर देण्याकरितां विवेचनाच्या सोईचे दृष्टीनें मूळ शब्द व सामान्यरूपें असे शब्दांचे दोन विभाग करूं.

* हीं जुन्या मराठी भाषेतील कर्मणि व भावी रूपें आहेत.

(१) पुढील मूळ शब्दांच्या अंत्याक्षरांचें निरीक्षण करा.

| उदाहरणें. | निरीक्षण व नियम. |
| --- | --- |
| आई, गणू, कुरळी, भाऊ, पेरू, पोळी, सासू, खिलपी, मोहरी. | [१] मूळ शब्दांचे अन्त्य इकार अथवा उकार दीर्घ असतात. |

अपवादः—[१]-जे शब्द संस्कृतमधुन मराठींत आले आहेत, परंतु अद्यापि मराठी भाषेंत पूर्णपणें रुळले नाहींत ते मात्र या नियमास अपवाद आहेत, जसेंः—रवि, मति, बुद्धि, कवि, इत्यादि.

टीपः— एकाक्षरी शब्द अर्थातच दीर्घ लिहितात; जसेंः—मी, तूं तीं, जी, की, पू, रू, इत्यादि.

(२) शुद्ध मराठी किंवा परभाषेंतुन आलेल्या परंतु मराठी भाषेंत पूर्णपणें रूळलेल्या शब्दांचें उपान्त्याक्षर ऱ्हस्व किंवा दीर्घ केव्हां असावें हें खालील कोष्टकावरून दिसून येईल.

| उदाहरणें. | निरीक्षण. | नियम. |
| --- | --- | --- |
| गूळ, तीळ, भीक, फूल, मूळ, दऊत, फकीर, विहीर, कणीक, मुंगूस, वकील, गरीब, बारीक, शागीट, बाईट, वीक, फीर, मीठ, नीच, शीण, | [१] हे सर्व शब्द अकारान्त आहेत. [२] यांचें उपान्त्याक्षर दीर्घ आहे. | [२] अकारान्त मूळशब्दांचे उपान्त्य इकार व उकार दीर्घ असतात. |
| हिरा, मुळा, विडा, पिळी, बाकिली, सुरी, निळी, उवो, भिकू, बिनू, बिरें. | [१] हे सर्व शब्द अनकारान्त आहेत, म्हणजे यांचा अन्त्य स्वर अ नसुन दुसरा कोणता तरी आहे. [२] यांचें उपान्त्याक्षर ऱ्हस्व आहे. | [३] अनकारान्त मूळ शब्दांचे उपान्त्य इकार व उकार ऱ्हस्व असतात. |

(३) उपोपान्त्य अथवा उपान्त्याचे मागील स्वर ऱ्हस्व लिहावें किंवा दीर्घ लिहावे हें पुढील कोष्टकावरून लक्षात येईल.

| उदाहरणें. | निरीक्षण व नियम |
| --- | --- |
| चिलीम, गुडाखू, रुमाल, सुरई, जुलूम, कुलूप, सुतळी, भुयार, ठिसूळ, सुतार, सुमार. | (४) मूळ शब्दांचे उपोपान्त्य म्हणजे उपान्त्याचे मागील इकार अथवा उकार ऱ्हस्व असतात. |
| भिकारीण, सुतारीण, शिकवणी, मिरवणूक, सुरुवात, कुटाळकी, निववणाश, हिरवट, हुकमत, कुरापत, हिकमत, खिरापत. | (५) शब्दांचे उपोपान्त्य स्वराचे मागील इकार व उकार ऱ्हस्व असतात. |

अकारान्त शब्दाचे उपान्त्य इकार आणि उकार दीर्घ असतात हे आपण पहिल्या नियमांत पाहिलें व त्या नियमाला मराठी भाषेंत अजून पूर्णपणें रुळले नाहीत असे संस्कृत शब्द अपवाद असतात असेंही आपण पाहिलें. याशिवाय दुसरा एक अपवाद आहे. तो खालील कोष्टकावरून दिसून येईल.

| उदाहरणें. | निरीक्षण. | नियम. |
| --- | --- | --- |
| भिंत, चिंच, सुरुंग, उंच, खिंड, गुंड, भिस्त, गुच्छ, शिस्त. | (१) हे सर्व शब्द अकारान्त आहेत.<br>(२) त्याचे अन्त्य क्षर एकतर जोडाक्षर आहे किंवा उपान्त्य स्वरावर अनुस्वार आहे.<br>(३) यांचा उपान्त्य इकार किंवा उकार ऱ्हस्व आहे. | (६) शब्द अकारान्त असूनही जर त्याचें अन्त्याक्षर जोडाक्षर असेल तर, किंवा उपान्त्य स्वरावर अनुस्वार असेल तर त्याचे उपान्त्य इकार व उकार ऱ्हस्व असतात. |

अभ्यस्त शब्दांतील इकार व उकार कसे असतात तें खालील कोष्टकावरून दिसून येईल.

| उदाहरणें. | निरीक्षण व नियम. |
| --- | --- |
| झुळझुळ, कुरकुर, तुरतुरु, भिरभिर, पटपुट, मुळमुळ, गुणगुण, भुरभुर, टुरटुर, किरकिर हुरहुर, दुडदुड. | ( ७ ) अभ्यस्त अनुकरणवाचक शब्दांतील अन्त्य व उपान्त्य अक्षरें ऱ्हस्व असतात. |

## नामांचें सामान्यरूप होतांना त्यांचे उपान्त्य स्वरामध्यें होणारे फेरफार.

नामाचे सामान्यरूप आकारांत, वाकारान्त, याकारान्त, ईकारान्त वगैरे रीतींनीं होते हें आपण विभक्तिप्रकरणांत पाहिलेंच आहे. नामाचें सामान्यरूप होतांना त्याचे उपान्त्य स्वरामध्येंही फेरफार होत असतो हा फेरफार कसा होतो हें खालील उदाहरणांवरून दिसून येईल.

| मूळरूप. | सामान्यरूप. |
| --- | --- |
| फूल, मूल, तीर, विहीर, धूर, तूप, तीळ, मशीद. चूक, चूल, पूर, मीठ. | फुलांत, मुलाने, तिरावर, विहिरींत, धुरामुळ, तुपाशीं, तिळाचें, मशिदींत, चुकीबद्दल, चुलींत, पुरांत, मिठांत. |

### निरीक्षण व नियम.

(१) नामाचे सामान्यरूपाचा अन्त्य स्वर नेहमीं दीर्घ असतो.

(२) मूळ शब्दांतील उपान्त्य स्वर जरी दीर्घ असला तरी सामान्यरूप होते वेळीं तो ऱ्हस्व होतो.

टीपः-( १ ) घातनामुळां प्रत्यय लागतेवेळीं मूळ धातूचा उपान्त्य स्वर दीर्घ असला तरी ऱ्हस्व होतो, जसें:—ऊठ, उठतो; निज, निजला; फीर फिरेल; शीक, शिके.

( २ ) सर्वनामाचे सामान्यरूपाचा मात्र अन्त्य स्वर दीर्घच असतो असें म्हणतां येत नाहीं पान ७५, ७६ मध्यें सर्वनामें चालवून दाखविलीं आहेत त्यांच्या सामान्यरूपाच्या अन्त्य स्वराचें निरीक्षण केलें असतां हें स्पष्टपणें कळून येईल.

## अभ्यास.

( १ ) प्रत्येक नियमाचीं दहा दहा उदाहरणें द्या.

( २ ) पुढील शब्द चुकीचे असतील तर ते दुरुस्त करून लिहा व कारणें सांगाः—हींवाळा, कोकीळा, माणुस, शीरकाव, टिकोटाने, विहीरी-तून, गुरव, उकीरडा, सोवुद, कोयींबिरींची, उशीरानें बुडो, उंद. इंदीर,

( ३ ) पुढील नामांना विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्ययें लावून तीं लिहा.

कपि, कुलूप, वीट, बूट, टिकीट, काळवीट, परीट, सुतारीण, कोलीत, पीठ तूर, चाबूक, गरीब, महमूद, ताबूत, सईस, चूल, तीळ, नशीब,

( ४ ) वरील नियमांचे कांहीं अपवाद तुमच्या वाचनांत आ असल्यास त्यांची यादी करा.